KÂVYASANGRAHA. 51. 1587

# THE MAHÂBHÂRATA

OF

# S'UBHÂNANDA.

## 6. BHIS'MAPARVA.

*EDITED WITH*

NOTES, PREFACE AND APPENDICES

BY

BÂLKRISHNA ANANT BHIDE, B. A.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS.

Bombay.

1905.

*Price 14 Annas.*

काव्यसंग्रह. ५१.

श्रीशुभानंदस्वामिकृत

# महाभारत.

## ६. भीष्मपर्व.

उत्सव सर्वस्वाचें पर्वचि हें पर्व भीष्मनांवाचें ।
गीतार्थामृतरससर अमृतपदप्रद रुचे मना वाचे. ॥

हें

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.

यांनीं

एका हस्तलिखित प्रतीच्या आधारें शुद्ध करून आणि टीपा, प्रस्तावना
व परिशिष्टें जोडून तयार केलें,

तें

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

१९०५.

किंमत १४ आणे.

**सूचना.**—या पर्वाचीं पहिलीं ५६ पानें पूर्वीच्या संपादकांनीं तयार केलीं होतीं. हें पर्व तयार करण्याच्या कामीं रा० रा० बाळकृष्ण सीताराम जोशी (मुरूड-जंजिरा) यांनीं आम्हांस वेळोवेळीं जी मदत केली, तीबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

# प्रस्तावना.



१. काव्यसंग्रहग्रंथमालेंतून मुक्तेश्वरी पहिलीं चार भारतपर्वें व शुभानंदी उद्योगपर्व हीं प्रसिद्ध झाल्यावर कांहीं विद्वान् हितचिंतकांनीं अशी सूचना केली कीं, जरी मुक्तेश्वराचीं पुढील पर्वें मिळत नाहींत, तरी शुभानंदाचीं किंवा त्याच्यासारख्याच दुसऱ्या चांगल्या कवींचीं पुढील पर्वें उपलब्ध असल्यास त्यांचा या मालेंत संग्रह करून, संपूर्ण अठरा पर्वांचें ओवीबद्ध चक्रीभारत प्रसिद्ध करावें. ही सूचना आम्हांस पसंत पडून, तसें करण्याचें मुक्रर करण्यांत आलें. त्या संकल्पानुरूपच आज आम्ही शुभानंदकवीचें भीष्मपर्व महाराष्ट्रीयांस सादर करीत आहों.

२. हें पर्व छापतांना आम्हीं एका हस्तलिखित प्रतीचें जरी शक्य तेवढें साहाय्य घेतलें आहे, तरी यास मुख्य आधार कै० माधव चंद्रोबांच्या सर्वसंग्रहांतील प्रतीचाच आहे. सर्वसंग्रहांतील प्रतींत कवीचें नांव सुभानन्त असें आहे व आमच्याजवळील हस्तलिखित प्रतींत कांहीं ठिकाणीं सुभानन्त, तर कांहीं ठिकाणीं सुबानन्त असें आहे. काव्यसंग्रहांतील ओवीबद्ध उद्योगपर्व ज्या हस्तलिखित प्रतीवरून छापिलें आहे, तींत शुभानंद असें कविनाम आहे. परंतु शुभानंद व सुभानंत (किंवा सुबानंत) यांचें कुळ, कुलदेवता, कुलस्वामिनी, मातृनाम, राहण्याचा प्रान्त, गुरुनाम, रचनापद्धति वगैरे बाबतींत पूर्ण मेळ असल्यामुळें हीं दोन्हीं नांवें एकाच व्यक्तीचीं होत, असें उद्योगपर्वाच्या प्रस्तावनेंत नमूद करण्यांत आलेंच आहे. यासंबंधें आम्हांला आतां येथें इतकेंच सांगावयाचें आहे कीं उद्योगपर्वांत जरी सर्वत्र कविनाम शुभानंद असें आहे, तरी एके ठिकाणीं तें शुभानंत[1] असेंही आढळतें, व त्या ठिकाणीं 'त' हा वर्ण यमकाला अवश्य असल्यामुळें, तो लेखकप्रमादानें पडला नसून, कवीनें जाणून बुजून लिहिला आहे, हेंही उघड आहे. यावरून उद्योगपर्वाचा कर्ता शुभानंद तोच शुभानंत हें अगदीं निःसंशय सिद्ध होतें. बहुधा कवीचें खरें नांव शुभानंद असून, त्याचे लोकव्यवहारांत शुभानन्त, सुभानन्त किंवा सुबानन्त असे उच्चार होत असावेत, असें वाटतें. आम्हीं पूर्व वहिवाटीस धरून, शुभानंद असेंच कविनाम या पर्वांत कायम ठेविलें आहे.

३. आमच्याजवळील भीष्मपर्वाची हस्तलिखित पोथी व सर्वसंग्रहांतील प्रत यांत इतका कांहीं चमत्कारिक व ठळक फरक आहे कीं, त्याविषयीं येथें दोन शब्द लिहिणें

---

१. इतिश्री उद्योगपर्वटीका प्राकृत । कर्ता भोक्ता श्रीअनंत । निमित्त एक शुभानंत । कृपा समर्थ विश्वंभराची. ॥ २।१४८.

अवश्य वाटतें. दोन प्रतींतील ही तफावत चांगली लक्ष्यांत यावी म्हणून या पर्वाला एक परिशिष्ट जोडिलें आहे. (परिशिष्ट २ रें पहा.) त्यावरून हें सहज लक्ष्यांत येईल कीं मंगलाचरण, गीतेच्या ७-१८ अध्यायांवरील समपद्यटीका, कौरवदळाचें वर्णन, कांहीं संकुलयुद्धें, शरपंजरीं पडलेल्या भीष्माचें व कृष्णाचें संभाषण वगैरे कांहीं प्रकरणींच्या ओव्यांत दोन्ही प्रतींमध्यें अगदीं अक्षरशः तंतोतंत मेळ आहे. पण बभ्रीची उत्पत्ति, युद्धभूमिनिश्चय, बळरामाची ब्रह्महत्या, गजशवांनीं झालेला लंकानाश, वगैरे प्रकरणांत पांच पांच दहा दहा ओव्या जुळतात, परंतु इतरांत स्पष्ट भेद दिसून येतो. अर्जुनाचें कपिध्वजत्व, परशुरामचरित्र, शिखंडीजन्म, कृष्णाचें अर्जुनसारथ्य वगैरे कथानकांत शेंकडा फार तर पांच ओव्या अक्षरशः जमतील, पण बाकीच्या ९५ अगदींच स्वतंत्र! कथाभागांत मात्र बहुशः फरक आढळत नाहीं. गीतेच्या पहिल्या सहा अध्यायांवरील टीका दोन्ही प्रतींत अगदीं स्वतंत्र आहेत. हस्तलिखित प्रतींतील गीतेच्या पहिल्या अध्यायावरील टीका समपद्यही नाहीं, कारण तींत एकेका श्लोकाला तीन तीन चार चारही ओव्या लागल्या आहेत. कित्येक विषय एका प्रतींत आहेत, तर दुसरींत नाहींत; कित्येकांचा एकींत संक्षेप, तर दुसरींत विस्तार! कांहीं कांहीं वर्णनें मागेंपुढेंही झालीं आहेत. छापील प्रतींत दुर्गास्तव गीतेपूर्वी आहे, तर हस्तलिखित प्रतींत तो गीतेनंतर आहे! असा या दोन प्रतींत फरक कां आढळतो किंवा शुभानंदाला आपली पहिली कृती फिरविण्याचें काय प्रयोजन पडलें होतें, हें जाणण्यास आज कांहींच साधन उपलब्ध नाहीं.

४. शुभानंदाचा काळ ठरविण्यास कांहींच चांगलेंसें निश्चयात्मक साधन नाहीं, असें उद्योगपर्वाच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. परंतु या प्रश्नाचा स्पष्टपणें निकाल लावण्याला हल्लीं आमच्या संग्रहीं असलेली भीष्मपर्वाची हस्तलिखित प्रत अगदीं पुरेशी आहे. या प्रतींतील शेवटच्या अध्यायाचा उपसंहार फारच महत्वाचा आहे व त्याचा सबंध उतारा आम्हीं प्रस्तुत ग्रंथाच्या अखेरीला टीपेंत दिला आहे. त्यांत पर्वलेखसमासीच्या काळाविषयीं अशा दोन ओव्या आहेतः—गौराष्ट्रदेशामाजारी। गोकर्णपंचक्रोशाभितरीं। शके सोळाशें अठ्यायशी उपरी। मास सप्त लोटले. ॥... व्यय संवत्सर आश्विनमासीं। मंदवार शुद्ध प्रतिपदेदिवशीं। पूर्ण केलें भीष्मपर्वासीं। देवालयीं कलशाच्या. ॥ शकांक, संवत्सरनाम, मास, वार, पक्ष व तिथी यासंबंधें येथें दिलेला काळ अगदीं सुसंबद्ध व निर्दोष आहे. यावरून शुभानंदानें भीष्मपर्वाची समाप्ति शके १६८८, व्ययनाम संवत्सर, शनिवार आश्विन शु० १, किंवा इ० स० १७६६, आक्टोबर तारीख ४ रोजीं केली असें स्पष्ट होतें. तेव्हां हा कवि नाझरेकर श्रीधर (इ० स० १६७८–१७२८) यांच्या मागून झाला व महिपति (इ० स०

१७१५–१७९०) आणि मोरोपंत (इ० स० १७१९–१७९४) यांचा समकालीन होता, हें उघड आहे. तेव्हां उद्योगपर्वाच्या प्रस्तावनेंत अनुमान केल्याप्रमाणें हा कवि खिस्तिशकाच्या अठराव्या शतकांत होऊन गेला, हें अगदीं निःसंशय ठाम होत आहे.

५. वरील कलमांत निर्दिष्ट केलेल्या उपसंहारावरून शुभानंदाच्या कुळगोतासंबंधेंही बरीच माहिती मिळते. शुभानंदाची जन्मभूमि गौराष्ट्रांत (=गोवेंप्रांतांत) गोकर्णा-पासून सुमारें पांचकोशांच्या अंतरावर असणारें 'अंकवला' ऊर्फ अंकोलें नांवाचें ठिकाण होय. हा कवि कौंडिण्यगोत्री असून, याचें उपनांव 'पिकळा' (?) असें होतें. मांगीश ही याची कुळदेवता. याच्या पित्याचें नांव अनंत मांगिरीश. याच्या आईचें नांव जानकी व ती 'बोर्यकारभारकर' (?) यांची मुलगी. विश्वंभरगुरुकृपेनें शुभानंदास ज्ञान प्राप्त झालें. प्रत्येक अध्यायांत गुरुभक्तिद्योतक उपसंहारात्मक दोन ओव्या छापील प्रतींत आढळतात, परंतु त्या तशा प्रत्येक अध्यायांत हस्तलिखित प्रतींत आढळत नाहींत.

६. भीष्मपर्वाच्या छापील प्रतींत ३३ अध्याय आहेत, परंतु हस्तलिखित प्रतींत ३१ च आहेत. हस्तलिखित प्रतींत२९व्या अध्यायांत दहाव्या दिवसाचें युद्ध समाप्त होऊन त्यांत भीष्म पतम पावले. पुढें त्याच अध्यायांत एक अठरा ओव्यांचा उपसंहार आहे. यांत शुभानंदानें महाभारताचें, व त्यांतल्या त्यांत विशेषतः भीष्मपर्वाचें माहात्म्य सांगून, प्राकृत–मराठी–भाषेची अभिमानपूर्वक तरफदारी केली आहे. या उपसंहा-राचा सबंध उतारा ग्रंथाच्या शेवटीं तिसऱ्या परिशिष्टांत घेतला आहे. त्यावरून शु-भानंदाचें मराठीवरील प्रेम, संतांविषयीं पूज्यभाव, निस्पृहता, हरिकीर्तनाची आवड व भगवद्भक्तिपरायणत्व हीं स्पष्ट होत आहेत.

७. शुभानंद हा मोठा संस्कृत पंडित होता असें नाहीं; किंबहुना त्यानें संस्कृ-ताचें अध्ययन शास्त्रोक्त पद्धतीनें केलें होतें, असेंसुद्धां वाटत नाहीं. मात्र त्यानें संस्कृतपुराणग्रंथ बरेच वाचले असल्यामुळें व वेदांतविषयाचीही माहिती कांहीं वाचून व तोंडोतोंडीं बरीच झाली असल्यामुळें, साधारण संस्कृत श्लोकांतील मुख्य मुख्य शब्द ऐकून एकंदर मतलबाचा धूर्तपणें अंदाज करण्याची शक्ति त्याचे अंगीं आली होती असें वाटतें. हें अनुमान करण्यास उद्योगपर्वांत फारशी जागा नव्हती; परंतु भीष्मपर्वांत शुभानंदानें भगवद्गीतेची समपद्य टीका देण्याची प्रतिज्ञा केल्यामुळें, हें रहस्य उघडकीस आलें आहे. हें आम्हीं भीष्मपर्वाध्याय १९ किंवा गीताध्याय १४ पासून दाखविण्याचा टीपांत मधून मधून प्रयत्न केला आहे. मूळ गीता व शुभानंदी टीका ह्या संगतीं वाचून वाचकांनीं यासंबंधें आपली खात्री करून घ्यावी.

८. शुभानंदाची कवीच्या नात्यानें योग्यता लहानसहान नाहीं. याची रचना

अगदीं साधी, सरळ व बाळबोध आहे. त्यांत त्यानें शब्दाचें अवडंबर कोठेंही केलें नाहीं. मुक्तेश्वराप्रमाणें संस्कृत शब्द खचून भरले नाहींत किंवा लांब लांब समासांनांही जागा दिली नाहीं. शुभानंदाची भाषा मधून मधून अलंकारिक आहे खरी, परंतु मुक्तेश्वराप्रमाणें उपमारूपकांची याच्या ग्रंथांत रेलचेल आढळत नाहीं; शिवाय मुक्तेश्वराप्रमाणें शुभानंदाची प्रतिभा व कल्पना अत्यंत जाज्वल होती असेंही दिसत नाहीं. शुभानंदाचीं वर्णनें विस्तृत व पाल्हाळिक असतात, तरी पण तीं कंटाळवाणीं होत नाहींत, कारण त्याच्या वाणींत प्रसादगुण निःसंशय आहे. शुभानंदाच्या वाक्यरचनेंत कित्येक वेळां कांहीं चमत्कारिकपणा व शैथिल्य हीं आढळून येतात. याचें एक ढोबळ उदाहरण म्हणजे त्याची कर्मणिप्रयोगाची ठेवण होय. जेथें आपण कर्मणिप्रयोगांत तृतीयान्त कर्तृपद योजतों, त्या ठिकाणीं शुभानंद कधीं कधीं प्रथमान्तपदच वापरितो. उ०: 'राधासती पाळिलें मातें' (उद्यो० ४२।४०), 'राधा करविलें पयःपान' (उद्यो० ४१:३१), 'कुंती श्रीकृष्ण पाहिला' (उद्यो० ३१।४२), 'पृथा दिधलें आलिंगन' (उद्यो० ३१।४२), 'अर्जुन उपदेशूनि श्रीपती। पुढें कैसें केलें रणक्षितीं।' (भीष्म० २४।१२), 'सवेंचि तो वीर द्रौणी । श्रीकृष्ण विंधिला सत्तरीं बाणीं।' (भीष्म० २९।२५), 'मग क्रोधें आवेशें रावण । अर्जुनधनुष्यें विभांडलीं॥' (भीष्म० ३०।१५), 'ऐकतां मग पांडुनन्दन । स्थाणुकेश्वरीं रक्षिला.॥' (भीष्म० ३३।२१६).

९ अखेर बहुश्रुत वाचकवृंदास एवढीच विनंति आहे कीं,

पूर्णं कुरु न्यूनगुणं भवेद्यत्,
क्षमस्व यच्च स्खलितं ममात्र; ।
भ्रमोह्ययं मानुषधर्म एव,
क्षमा पुनः केवलदिव्यचिन्हम्. ॥

मुरूड-जंजिरा.
८ जानेवारी १९०५.

काव्यसंग्रहकार.

| अध्याय. | विषय. | ग्रंथसंख्या. | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| | नरथवर्णन, अर्जुनरथस्थकृष्णवर्णन (१०४–११२); तुंबलयुद्ध (११३–१२०); कौरवांस अपशकुन (१२१–१२६); शिखंडीचें बुजविणें करून अर्जुनाचें भीष्माशीं लढणें व सूर्यास्तीं कृष्णस्तव करीत करीत भीष्माचें रथाखालीं पडणें (१२७–१५०); भीष्मशरपंजर, कौरवपांडवांचा शोक, कृष्णधर्मादिक भीष्मास भेटतात (१५१–१६१); भीष्म उशी व पाणी मागतो, दुर्योधनाची फजीती, अर्जुन भीष्माला बाणांची उशी व भोगावतीचें पाणी देतो (१६२–१७७); भीष्मकृत पांडवप्रशंसा व दुर्योधनास उपदेश (१७८–१८२); भीष्मकर्णसंवाद (१८३–१९०); भीष्मकृष्णसंवाद (१९१–१९९); भीष्ममाहात्म्य (२००–२०३); भीष्मपतन ऐकल्यावर धृतराष्ट्रगांधारींचा शोक, व त्याचें विदुरसंजयकृत समाधान (२०४–२१२); उत्तरायणांत प्राण सोडण्याचा निश्चय करून भीष्माचें शरपंजरशयन (२१३–२१८); पर्वमाहात्म्य व उपसंहार (२१९–२२६). ... ... ... ... ... ... | २२६ | ११८– |


ऐकूण ग्रंथसंख्या २२८७

# परिशिष्टें.


| परिशिष्टांक. | विषय. | पृष्ठांक. |
|---|---|---|
| १ | शुद्धाशुद्ध, अधिक टीपा, पाठभेद वगैरेंचें परिशिष्ट ... ... ... | १–३ |
| २ | छापील प्रत व एक हस्तलिखित प्रत यांतील तफावतीचें परिशिष्ट... | ४–८ |
| ३ | हस्तलिखित प्रतींतील उतारा... ... ... ... ... ... | ९ |

# शुभानंदकृत भीष्मपर्वाची विषयानुक्रमणिका.


| अध्याय. | विषय. | ग्रंथसंख्या. | पृष्ठांक. |
| --- | --- | --- | --- |
| १ | मंगलाचरण (ओव्या, १–२०); संजयशिष्टाई, कृष्णशिष्टाई, कौरवपांडवांचें युद्धार्थ कुरुक्षेत्रीं येणें (२१–४१); युद्धभूमिनिश्चय व कृषीवलाची गोष्ट (४२–६१); भीमपुत्र बभ्री याचा इतिहास (६२–९२). ... ... ... ... ... | ९२ | १–६ |
| २ | अर्जुनाच्या कपिध्वजत्वाचें कारण (१–७३). ... ... | ७३ | ६–९ |
| ३ | दुर्योधनाचा उलूकहस्तें पांडवांस मर्मभेदक निरोप व त्यास पांडवांचें उत्तर (१–१२); बभ्रीचें पाताळाहून येणें, प्रत्येकाचें वर्मावर बाण मारण्याचें त्याचें कौशल्य, युद्धांत जो पक्ष कमी पडेल त्याच्या तर्फे लढण्याचा त्याचा निश्चय, त्यामुळें कृष्णाला पडलेली चिंता, व शेवटीं कृष्णाच्या युक्तीनें भीमहस्तें बभ्रीचें हनन (१३–४१); बळरामाचें साहाय्य दुर्योधनास पचूं नये म्हणून कृष्णाचा पेंच, बळरामाची ब्रह्महत्या, भूप्रदक्षिणा करून पापक्षालन करण्याचा त्यास व्यासांचा उपदेश (४२–६०); भूप्रदक्षिणा करून परत येईपर्यंत दुर्योधनाचें रक्षण करण्याविषयीं बळरामाची भीष्मादिकांस ताकीद व बळरामाचें भूप्रदक्षिणार्थ गमन (६१–७६); संजयास दिव्यदृष्टिदान (७७–८९). | ८९ | ९–१४ |
| ४ | पांडवांची युद्धाची तयारी (१–८); अर्जुनरथवर्णन(९–१७); कृष्णाच्या अर्जुनसारथ्याचें कथानक (१८–१०४); कौरवदळवर्णन (१०५–११३); अर्जुनाचा रणोत्साह (११४–१२१). | १२१ | १४–२१ |
| ५ | पांडवसैन्यरचना (१–१०); कौरवदळरचना व तत्पक्षीय राजे (११–२७); युद्धारंभीं भीष्माचें भाषण (२८–४५); युयुत्सूचें पांडवांकडे आगमन (४६–४९); युद्धारंभ, शिखंडीस धरण्याविषयीं दुर्योधनाची सैनिकांस आज्ञा, भीष्म हयात आहे तोंवर युद्धांत न जाण्याची कर्णाची प्रतिज्ञा, कौरवांस अपशकुन व पांडवांस शुभ शकुन (५०–६१); अर्जुनकृत दुर्गास्तव, तिचें दर्शन व वरप्रदान (६२–६७); अर्जुनाची युद्धार्थ तयारी व गीताप्रस्ताव (६८–७५). ... ... ... ... ... | ७५ | २१–२५ |


D

| अध्याय. | विषय. | ग्रंथसंख्या. | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| ६ | गीतेच्या पहिल्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ५८ | २५–२८ |
| ७ | गीतेच्या दुसऱ्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ७७ | २८–३३ |
| ८ | गीतेच्या तिसऱ्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ४७ | ३३–३५ |
| ९ | गीतेच्या चवथ्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ४४ | ३५–३८ |
| १० | गीतेच्या पांचव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ३१ | ३८–३९ |
| ११ | गीतेच्या सहाव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ४९ | ३९–४२ |
| १२ | गीतेच्या सातव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ३२ | ४२–४४ |
| १३ | गीतेच्या आठव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ३१ | ४४–४५ |
| १४ | गीतेच्या नवव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ३६ | ४६–४७ |
| १५ | गीतेच्या दाहाव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ४४ | ४८–५० |
| १६ | गीतेच्या अकराव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ५८ | ५०–५३ |
| १७ | गीतेच्या बाराव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | २२ | ५३–५४ |
| १८ | गीतेच्या तेराव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ३८ | ५४–५६ |
| १९ | गीतेच्या चवदाव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | २९ | ५६–५८ |
| २० | गीतेच्या पंधराव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | २२ | ५८–५९ |
| २१ | गीतेच्या सोळाव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | २६ | ५९–६१ |
| २२ | गीतेच्या सतराव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ३० | ६१–६२ |
| २३ | गीतेच्या अठराव्या अध्यायाची समपद्य टीका. ... ... | ८१ | ६२–६७ |
| २४ | गीतामाहात्म्य (१–११); पांडवांचें भीष्मादिकांच्या भेटीस जाणें व त्यांची कौरवसेनेकडून निर्भत्सना, भीष्मादिकांचें पांडवांस आश्वासन (१२–३७); संकुलयुद्ध, प्रथमदिनसमाप्ति (३८–१०१). ... ... ... ... ... ... ... | १०१ | ६७–७२ |
| २५ | धर्माची जयाविषयीं चिंता व कृष्णानें केलेलें त्याचें समाधान (१–४); द्वितीयदिनयुद्धारंभ, भीष्मार्जुनयुद्ध (५–२४), द्रोणधृष्टद्युम्नयुद्ध (२५–२९), भीमकलिंगयुद्ध (३०–३९) संकुलयुद्ध (४०–५६). ... ... ... ... ... ... ... | ५६ | ७३–७५ |
| २६ | तृतीयदिनयुद्धारंभ (१–६), दुर्योधनाचें भीष्मास लागेसें भाषण (७–१०), भीष्माचें युद्धलाघव (११–१५), भीष्मार्जुनयुद्ध (१६–२६), भीमाचा पराक्रम (२७–३३), रणांगणांतील भीष्मार्जुनांचा संवाद (३४–४३), भीमधृष्टद्युम्न व द्रोण यांचें युद्ध, द्वितीयदिनसमाप्ति (४४–५२); मारुतिमंदोदरीसंवाद, मंदोदरीनें केलेला नरनारायणांचा उपहास (५३–६९). ... | ६९ | ७६–७९ |

| अध्याय. | विषय. | ग्रंथसंख्या. | पृष्ठांक. |
| --- | --- | --- | --- |
| २७ | चतुर्थदिनारंभ (१–४), मंदोदरीनें केलेला उपहास मारुतिमुखें ऐकिल्यावरून कृष्णाची नैर्ऋत्येस गजप्रेतें भिरकावण्याची भीमास आज्ञा (५–१२); तुंबल संकुलयुद्ध (१३–२७); द्रोणद्रुपदयुद्ध (२८–३४); निरनिराळीं द्वंद्वयुद्धें (३५–५३); भीमाचा पराक्रम (५४–६५); भीष्मार्जुनयुद्ध (६६–७२); भीम व दुर्योधन यांचें मल्लयुद्ध, दुर्योधनाची दुर्दशा व भीष्मानें केलेली त्याची सुटका (७३–१०१). ... ... ... ... | १०१ | ७९–८५ |
| २८ | दुर्योधन व भीष्म यांचें चतुर्थदिनरात्रीं झालेलें संभाषण (१–८); गजप्रेतांनीं लंकेचा नाश, बिभीषण व मंदोदरी यांची तारांबळ, मंदोदरीचें कृष्णास शरण येऊन करुणा भाकणें (९–३०); पंचमदिनारंभ, नैर्ऋत्येस गजप्रेतें न टाकण्याची कृष्णाची भीमास आज्ञा (३१–३४); तुंबलयुद्ध (३५–५३); दुर्योधनभीष्मसंवाद, पांडवांशीं सलोखा करण्याचा भीष्माचा उपदेश, इरईस पडून युद्ध चालविण्याचा दुर्योधनाचा निश्चय (५४–६५). ... ... ... ... ... ... ... | ६५ | ८५–८८ |
| २९ | सहाव्या दिवशींचें युद्ध (१-४३); सप्तमदिनयुद्ध (४४-६४); अष्टमदिनयुद्ध, शकुनिसुतवध, इरावानाचा अलंबुषासुरहस्तें वध (६५–७९); घटोत्कचाचा पराक्रम (८०–९५); भीमहस्तें कुंडवध (९६–९७); संकुलयुद्ध व अष्टमदिनसमाप्ति (९८–१०६). ... ... ... ... ... ... ... | १०६ | ८८–९४ |
| ३० | कर्णशकुनींच्या सांगण्यावरून दुर्योधन भीष्माची निर्भर्त्सना व कर्णाची स्तुति करितो, भीष्मकृत कर्णनिंदा, अर्जुनप्रशंसा व निर्वाणयुद्धप्रतिज्ञा (१-१८); भीष्माची निर्वाणयुद्धाची तयारी (१९-२९); भार्गवरामकथा–सहस्रबाहूनें त्रासविलेल्या पृथ्वीला विष्णूचें आश्वासन व परशुरामजन्म (३०–६२); परशुरामाचा व्रतबंध, जमदग्नीस कामधेनुलाभ, परशुरामाचें शस्त्रविद्याध्ययनास्तव कैलासीं गमन, (६३–७५) सहस्रबाहूस दत्तात्रेयप्रसाद, सहस्रबाहू व रावण (७६–११८); सहस्रबाहूची इंद्रपद घेण्याची इच्छा, इंद्राचें भय व नारदाची युक्ति (११९–१२८). ... | १२८ | ९४–१०१ |

| अध्याय. | विषय. | ग्रंथसंख्या. | पृष्ठांक. |
|---|---|---|---|
| ३१ | जमदग्नीच्या अरण्यांत मृगया करण्याची नारदाची सहस्रबाहूस सल्ला (१–१०); मृगयेनें श्रमलेल्या सहस्रबाहूस जमदग्नीचें सपरिवार भोजनास येण्याचें आमंत्रण (११–२९); जमदग्नीच्या आश्रमांतील अनपेक्षित थाट व तो पाहून सहस्रबाहूची आश्चर्यचकित स्थिति (३०–५५); हा कामधेनूचा प्रसाद आहे हें कळल्यावर, तिला हरण करण्याचा राजाचा निष्फळ प्रयत्न (५६–७२); कामधेनू हातची निसटली हें पाहून रागानें सहस्रबाहू जमदग्नीस मुलांसह मारतो (७३–७९); रेणुकेचा शोक, परशुरामाचें कैलासाहून निवर्तन, व क्षत्रियनाशाविषयीं प्रतिज्ञा (८०–१००); पित्याचे उत्तरकार्यानंतर परशुरामाचें सहस्रबाहूबरोबर युद्ध, सहस्रबाहूचा वध(१०१–१४४);परशुरामकृत क्षत्रियसंहार, कोंकणोत्पत्ति, भीष्मास धनुर्विद्यादान (१४५-१६३); रामावतार व कृष्णावतार यांच्या हेतूचें दिग्दर्शन (१६४-१७१). | १७१ | १०१–११० |
| ३२ | नवमदिनारंभ, अर्जुनाचें सारथ्य करणाऱ्या कृष्णाचें वर्णन (१–१८); अभिमन्यूचा पराक्रम(१९–२२); संकुलयुद्ध (२३–३१); मध्यान्हकाळ, कृष्ण अर्जुनाच्या घोड्याची चाकरी करितो, पार्थभाग्यवर्णन (३२–३९); भीष्माची निर्वाणयुद्धाची व कृष्णाकडून शस्त्र धरविण्याची प्रतिज्ञा (४०-५३); निर्वाणयुद्ध, अर्जुनाची दीनावस्था (५४-८७); कृष्ण चक्र हातीं धरून भीष्मावर उसळतो, त्या वेळीं झालेली प्रलयकालासारखी स्थिति (८८–१००); भीष्मकृत कृष्णस्तुति (१०१–१०६); इतक्यांत अर्जुन सावध होऊन कृष्णास परत फिरवितो (१०७–११४); अर्जुनाचें हस्तलाघव व नवमदिनसमाप्ति (११५–१२५); धर्माची जयाविषयीं चिंता, कृष्णसंमतीनें त्याचें भीष्माकडे भीष्माचाच वधोपाय विचारण्यासाठीं जाणें (१२६–१३८);भीष्मकृष्णसंवाद (१३९–१४७); भीष्माचें धर्माला आत्मवधोपाय सांगणें (१४८–१५९). ... | १५९ | ११०–११८ |
| ३३ | शिखंडीजन्मकथा, सुगंधीशंतनुविवाह (१–५०); भीष्मकृत काशिराजकन्याहरण (५१–५७); अंबेचा आशाभंग (५८–६२); तिचें भार्गवरामास शरण जाणें व भार्गवभीष्मयुद्ध (६३-७८); भार्गवाचा भीष्मास शाप, अंबेचें तपश्चरण व शिखंडीजन्म (७९–९७); दशमदिन. सेनापरिगणन (९८–१०३); अर्जु- | | |

# [1]शुभानंदकविकृत महाभारत.

## ६. भीष्मपर्व.

### अध्याय पहिला.

(ओंव्या.)

आदीं वंदिला विघ्नेश्वर । जो सकळकळाईश्वर । ज्याचे स्मरणें विघ्नांधकार । हरे हरिभक्तजनाचा. ॥ १ ॥ जो विघ्नकुंजरातें केसरी । जो विघ्नतमा सूर्य निर्धारीं । जो विघ्नतृणाग्नी चराचरी । यालागीं विघ्नेश्वर नाम तुझें. ॥ २ ॥ ऐसा स्तविला विघ्नेश्वर । ठेविला तेणें मस्तकीं अभयकर । म्हणे, 'रचीं ग्रंथ सुंदर । मत्प्रसादें काव्यटीका.' ॥ ३ ॥ प्रसन्न होतां ज्ञानगणेश । मग नमिलें शारदेस, । 'माते! कृपा करीं अशेष । भारत वदवीं मम मुखें. ॥ ४ ॥ भारतामाजीं भीष्मपर्व । श्रीकृष्णवाक्याचें लाघव । युद्धारंभगती अपूर्व । वदवीं सर्व मम मुखीं.' ॥ ५ ॥ तंव शारदा प्रगटली अंतरीं । म्हणे, 'ग्रंथ करावा बरवियापरी' । म्हणोनि हस्त ठेविला शिरीं । कृतकृत्यता निर्धारीं मी मानीं. ॥ ६ ॥ आतां नमूं तो सद्गुरु । जो परमात्मारूप ईश्वरु । जेणें फेडिला भवांधकारु । स्वहस्त माथां ठेवुनी. ॥ ७ ॥ सर्वदेवमय सद्गुरु । कोणा नेणवे जयाचा पारु । त्यासी दीर्घ दंड नमस्कारु । केला म्यां निर्धारीं. ॥ ८ ॥ प्रत्यक्ष आला ध्यानांतरीं । प्रेरिता झाला मदंतरीं, । 'ग्रंथारंभ करीं निर्धारीं' । म्हणे कृपेनें आपुल्या. ॥ ९ ॥ ऐसें सद्गुरुचें वरदान झालें । तेणें मन्मन उल्हासलें । एवं संतपरंपरेतें नमिलें । एकाभावें साष्टांगीं. ॥ १० ॥ व्यासदेव शुकयोगींद्र । गौडपाद श्रीशंकर । वंदिला स्वामी श्रीधर । टीका चतुर तयाची. ॥ ११ ॥ प्राकृत कवी ज्ञानदेव । निवृत्तिस्वामी सोपानदेव । मुक्ताबाई नामदेव । तुकोबा विसोबाखेचर. ॥ १२ ॥ [2]एकनाथ जनार्दन । ज्यासी दत्तात्रेयाचें दर्शन । विश्वंभर सद्गुरुनिधान । मुक्तेश्वर वंदिला. ॥ १३ ॥ रामदास वामनस्वामी । केशवस्वामी शिवरामस्वामी ।

---

१. ह्या कवीबद्दल उपलब्ध असलेली माहिती आम्हीं मागें उद्योगपर्वाच्या प्रस्तावनेंत दिली आहे. २. ही संतमंडळी येथे कालानुक्रमानें दिलेली नाहीं. पण श्रीधरास नमन केलें आहे म्हणून हा कवि शके १६६० च्या पुढें झाला असला पाहिजे.

ऐसे अनेक संतपदरज मी । आनंदभावें वंदितों. ॥ १४ ॥ 'तुम्ही संत समर्थ। मी करुणा भाकितों अनाथ । मजला करावें सनाथ । भारती टीका वदवावी.' ॥ १५ ॥ ऐसें स्तवितां संतजनां । तयांसी आली करुणा। म्हणती, 'भीष्मपर्व-रचना । प्राकृतमती वदावी.' ॥ १६ ॥ ऐसा संतअनुग्रह झाला । तेणें उल्हास मनीं वाटला । हेंची नमन श्रोतयांला । ऐका म्हणोनी श्रोतयां. ॥ १७ ॥ आतां सहावें भीष्मपर्व । अपूर्वांमाजी अती अपूर्व । जयामाजी श्रीकेशव । विश्वरूप पार्था दाखवी. ॥ १८ ॥ तरी हे महाभारती कथा । राजा जन्मेजयो परिसता । व्यासशिष्य असे वक्ता । वैशंपायन ऋषिवर्य. ॥ १९ ॥ तेची कथा श्रोतयांप्रती । आरूप बोले अज्ञान मती । क्षमा करोनि ऐकिजे संतीं । वदेन भावार्थी निजप्रीती. ॥ २० ॥ जन्मेजय राजा प्रश्न करी, । 'वैशंपायना ! अत्र-धारीं । श्रीकृष्ण राहिला विराटनगरीं । पुढें कैसेपरी पैं झालें? ॥ २१ ॥ तें ऐकावया आवडी भारी । स्वामी! निवेदा सविस्तरीं । भीष्म पडला शरपंजरीं । तें ऐकावें निर्धारीं आवडे. ॥ २२ ॥ कैसें झालें तें कथन । इच्छामरणिया आलें मरण । तें सांगावें समूळ कथन' । म्हणुनी चरण वंदिले. ॥ २३ ॥ वैशंपायन म्हणे, 'राया! । धर्मे कौरवसभे गावल्गणी पाठविलिया । तो येवोनी दुर्योधनाचिया । बोले अभिप्राया धर्मसभे. ॥ २४ ॥ 'राज्यविभाग नेदीं तुम्हांतें । मागुतीं जावें वनवासातें । द्वादश लोटोनी त्रयोदशातें । गुप्त असतां राज-विभाग. ॥ २५ ॥ मग भीष्म द्रोण आणी वडिलें । नाना दृष्टांतवचनें बोधिलें । न मानोनी चौघांतें बोले । जावें वनामाजि कीं युद्ध.' ॥ २६ ॥ ऐसें धर्मसभेसी गावल्गणें । कथिलें दुर्योधनाचें बोलणें । यावरी प्रयाण श्रीकृष्णें । कुंजरपुरा पैं केलें. ॥ २७ ॥ मग शिष्टाई सर्वा देखतां । भीष्मद्रोणादि सभेसी असतां । विभाग मागतां कौरवनाथा । नये चित्ता तयाच्या. ॥ २८ ॥ मग मागे पंच ग्राम । पदर पसरोनियां पुरुषोत्तम, । तेंही नाइकोनी बंधकर्म । करावें श्रीकृष्णा योजिलें. ॥ २९ ॥ तेव्हां विश्वरूप दाखवुनी सभेसी । भ्रम घातला दुर्जनांसी । मग आज्ञा मागोनि सकळांसी । पांडवालयासी पैं आला. ॥ ३० ॥ तेव्हां म्हणे मनमोहन,। 'धर्मा! उपाय न चले आन। शिष्टाई न मानी दुर्योधन । मरणा धरणें घेतलें. ॥ ३१ ॥ नाइके पितयाचें वचन । नाइके गांधारीचें वचन । न मानी भीष्मद्रोणवचन । विश्वासी पूर्ण कर्णादी. ॥ ३२ ॥ तयांनीं सांगितलें कारण । भीमार्जुनांचें आम्ही करूं हनन । जय साधूनी तुजलागुन । देऊं राया ! निश्चयें.' ॥ ३३ ॥ ऐसें धर्मासी कथन करुन । म्हणे,

१. संजय. २. तो धर्मसभे येवोनी दुर्योधनाचिया अभिप्राया बोलतसे—असा अन्वय. ३. संजयानें.

'निघावें कुरुक्षेत्रालागुन.' । ऐकोनि सेनादि राजनंदन । घेउनी पंडुनंदन निघाले. ॥ ३४ ॥ कौरवहेर जाऊन वार्ता । जाणविती राया कौरवनाथा, । 'सैन्य घेउनी पांडव तत्वता । कुरुक्षेत्रा पावले.' ॥ ३५ ॥ ऐकोनि दूतमुखींची वार्ता । दुर्योधन आज्ञापी सैनिकां समस्तां । रथकुंजरहयपायदळगणिता । गणिलें असे पूर्वींच. ॥ ३६ ॥ ऐसें कौरवसैन्य चालत । गगनीं धुळोरा झाला बहुत । तों दुर्योधनादी नृप समस्त । आपुले पितरां नमिती. ॥ ३७ ॥ स्त्रिया पुत्रादीक अप्रबुद्ध । माता पिता मैत्र वृद्ध । यांसी आज्ञा मागोनि सिद्ध । चालिले कुरुक्षेत्रीं सर्वही. ॥ ३८ ॥ पावले सर्वही कुरुक्षेत्रा । सेनापतित्व गंगापुत्रा । देवोनि रचिली सेना पात्रा । सागरातुल्य विशाळ. ॥३९ ॥ इतुकी कथा गताध्यायीं । राया[1] ! तुम्हीं श्रवण केली सर्वही । उद्योगपर्व तेथोनि पाहीं । संपूर्ण झालें पांचवें. ॥ ४० ॥ आतां सादर ऐकें करुनी श्रवण । जें भीष्मपर्व रसाळ पूर्ण । श्रीकृष्णलीळा अद्भुत जाण । ऐकें सावधान होउनी. ॥ ४१ ॥ ऐसीं दोन्हीं दळें कुरुक्षेत्रासी । तों श्रीकृष्ण म्हणे धर्मासी, । 'रणासी भूमी पाहिजे जैसी । पाहूं तैसी निजांगें.' ॥ ४२ ॥ म्हणोनी पार्थ हृषीकेशी । जाती दोघे ब्राह्मणवेशीं । हिंडुनी पाहती भूमीसी । जे कठोर निर्दय ते काळीं. ॥ ४३ ॥ तंव पिता पुत्र एके ठायीं । खनन करीत पाहिले पाहीं । तों व्याळरूपें श्रीकृष्णें पायीं । डंसिलें तया कुणबिया. ॥ ४४ ॥ तो पडला निचेष्टित पृथ्वीवरी । दुःखें तळमळे त्या अवसरीं । पीतवास न पाहे त्यासरी । आपुल्या विचारीं तो वर्ते. ॥ ४५ ॥ बाप न पाहे तया अवसरीं । म्हणोनी पुसताहे सुंदरी[2], । 'पुत्र व्याळें दंशितां निर्धारीं । तुम्ही अंतरीं उगे कैसे ? ॥ ४६ ॥ त्यासी कांहीं उपाव करीं.' । मग येर बोले ते अवसरीं, । म्हणे, 'ऐकें वल्लभे सुंदरी ! । सरला ऋणानुबंध पैं याचा.' ॥ ४७ ॥ तंव म्हणती हे दोघेजण, । 'पुत्राच्या विषासी करीं निवारण.' । येर म्हणे, 'तुम्ही ब्राह्मण होउन । लोभीं मन गुंतविलें. ॥ ४८ ॥ मिथ्या माया मिथ्या संसार । स्त्रीपुत्रगृहादी भ्रमाकार । कोण वांचला मरतां, विस्तार । मृगजळन्याय असे कीं. ॥ ४९ ॥ नदीसी पूर आलियावरी । वाहोनि काष्ठें मिळती एकसरीं । वियोगें विघडती मग दुरी । तयापरी हा संसार. ॥५०॥ याचा आमुचा ऋणानुबंध तुटला । सर्वेचि भुजंगें डंश केला.' । ब्राह्मण म्हणे 'गा ! भला भला । परमार्थवंत तूं होसी'. ॥ ५१ ॥ पार्थालागीं म्हणे, 'पाहीं । रणस्तंभ घालावा या ठायीं.' । बोलत चालतां तयाच्या गृहीं । गेले झडकरी तेधवां. ॥ ५२ ॥ तयाची भार्या अति सुंदर । तिसीं सांगितला विचार, । 'सर्पें डंशिला

---

१. जन्मेजया. २. कुणब्याची बायको व सर्पदंश झालेल्या मुलाची आई.

तव भ्रतार.' । ते म्हणे, 'थोर नवल काय? ॥५३॥ जैसे अस्तमानीं एके वृक्षीं । येऊनि बैसती अनेक पक्षी । प्रभातें उडोनी जाती दक्षी । आहारार्थ मेदिनी क्रमोनी. ॥ ५४ ॥ तैसाचि असे हा संसार । स्त्री पुरुष आणी कन्या कुमर.' । श्रीकृष्ण म्हणे पार्थासीं, 'विचार । ऐकें साचार इयेचा.' ॥ ५५ ॥ इतुकियांत पुत्राचें प्रेत । पिता घेऊनि आला त्वरित । कांता येऊनि त्यासी न पाहत, । मग म्हणत, 'रण येथ करूं.' ॥ ५६ ॥ मग देवें विष उतरविलें । तों त्या कृषी-वळा प्राण परतले, । श्रीकृष्णार्जुन त्यावेळें । धर्मापासीं पैं आले. ॥ ५७ ॥ म्हणती, 'तीक्ष्ण स्थान वहिलें । रणस्तंभासि असें विलोकिलें.' । मग वर्तमान सांगितलें । त्या कृषीवळभूमीचें. ॥ ५८ ॥ निष्ठुर पुत्रासी पिता, । स्त्री म्हणे, 'कैंचा भर्ता?' । ऐसिया स्थळीं संग्राम करितां । क्षण न लगतां जय लाभे. ॥५९॥ रणस्तंभ पुरावा तये स्थानीं । कौरव समूळ जाती नाश होवोनी । पशुप्राय वधविता महारणीं । यश तुम्हालागोनी येइल.' ॥ ६० ॥ धर्म म्हणे, 'जगजीवना!। सूत्रधारका मनमोहना !। आधीन असतां सकळ रचना । पुतळे आम्हां नाच-विसी.' ॥ ६१ ॥ तों श्रीकृष्ण भीमातें । म्हणे, 'तुझिया पुत्रा बभ्रीतें । पाता-ळाहोनी या युद्धातें । पाचारोनी आणिजे.' ॥ ६२ ॥ भीम म्हणे, 'पत्र पाठ-वितां । बभ्री येइल क्षण न लगतां । बाणाग्रीं पत्रिका लिहूनि देतां । येइल जाण कृष्णनाथा!' ॥ ६३ ॥ मग पत्र लिहुनी त्वरित । बाणाग्रीं खिळिलें असत । पाताळपथें सोडिला जात । वेगेंकरुनी ते समयीं. ॥ ६४ ॥ तेव्हां राजा म्हणे ऋषीप्रति, । 'तयाची कैसी झाली उत्पत्ती । ते सविस्तर वाक्यपंथीं । बभ्रीची उत्पत्ती सांगावी.' ॥ ६५ ॥ वैशंपायन म्हणे, 'नृपती !। पांडुराजा नि-माला वनाप्रती । पांचही कुमर आणि कुंती । ब्राह्मणीं हस्तिनावतीं आ-णिले. ॥ ६६ ॥ विशाळ पांडुरायाचें सदन । दीधलें सर्व संपत्ती भरुन । कुमरांसहीत कुंतीसी जाण । नेमोनि दिधलें धृतराष्ट्रें. ॥ ६७ ॥ पंधरा दिवस लोटतां जाण । धृतराष्ट्र येवोनी आपण । कुमरांसि करुन इच्छितार्पण । करी समाधान कुंतीचें. ॥ ६८ ॥ दिवसें दिवस कुमर प्रवृद्ध झाले । कौरवांसंगें खेळतां स्वमेळें । पैजे पण जिंकी भीम बळें । म्हणोनी वैर कल्पिलें. ॥ ६९ ॥ फळें तोडितां कौरवांतें । अवघे पाहोनी वृक्षावरुतें । तोची द्रुम ताडितां लातें । तळीं पडती भडभडें. ॥ ७० ॥ ऐसी भीमाची आंगवण । शकुनी दुर्योधन आणि कर्ण । खेळतां दचकोनि कौरवगण । म्हणती, 'दारुण दिस-ताहे. ॥ ७१ ॥ हा होइल महापराक्रमी । आमुतें जिणेल संग्रामीं । आतांचि

१. (मुलाची) बायको. २. पुत्रासंबंधानें.

यासी विचार आम्ही । शीघ्रकाळें योजिजे.' ॥ ७२ ॥ म्हणूनि मांडिली विवंचना । त्यांत म्हणती, 'करूं वनभोजना । भोजनामाजी **भी**मसेना । घालोनि विष मारावा.' ॥ ७३ ॥ म्हणोनि वनभोजन **गं**गातटीं । सहसामोग्री सिद्ध ताटीं । पाचारोनि पांचहि मंडपानिकटीं । तेथें क्रीडतां बहु श्रमले. ॥ ७४ ॥ रात्रिभोजन आरंभिलें । **भी**मासी विषोदक वाढिलें । ऐशापरी पैं भोजन झालें । शय्या रचिली भिन्नभिन्न. ॥ ७५ ॥ तों विषें घेरला **भी**मसेन । मग चौघे मिळाले दुर्जन । नागपाशीं सुदृढ बांधोन । **गं**गेंत लोटुनी दीधला. ॥ ७६ ॥ तेव्हां वाहवत गेला पाताळा । विखार झोंबले सर्वांगाला । हा कथाभाग आम्हीं पहिला । **आ**दिपर्वी कथियेला. ॥ ७७ ॥ तेथ **पा**ताळगंगा **हा**टकेश देव । तेव्हां नागकन्या तप करी अपूर्व । भ्रतार इच्छोनी बळिया मानव । **प**द्मावती या नामें आराधी. ॥ ७८ ॥ तेव्हां **गौ**री प्रत्यक्ष झाली । म्हणे, 'ऐकें **त**क्षकबाळी ! । वाहोनि येइल त्या माळ घालीं' । तें पित्यासि तीणें सांगितलें. ॥ ७९ ॥ त्याणें **त**क्षका आज्ञा केली, । 'पुरुष वाहोनि येइल **गं**गाजळीं । तयासी काढोनी थडीं ते वेळीं । आम्हाकारणें सांगों या.' ॥ ८० ॥ आज्ञेसरिसे दूत गेले । तों तेथें **भी**मशरीर पाहिलें, । विखारीं विष उतरीलें । पूर्वील जें कां सर्वही. ॥ ८१ ॥ मग चेतना आली **भी**मा । पाश तोडोनी पाहे स्वधामा । दिशा विलोकितां घातकर्मा । **कौ**रवीं केलें जाणवलें. ॥ ८२ ॥ तो चमत्कार **त**क्षकदूतीं । जाऊनि कथिला **वा**सुकीप्रती । प्रेतत्व लोपुनी सजीव मूर्ती । मनुष्य एक पातला. ॥ ८३ ॥ मग **वा**सुकी येऊनि आपण । म्हणे, 'हा होय **कृ**ष्णप्रियरत्न.' । स्तवन करोनी आठवी वरदान । कन्या बोलिली जें कांहीं. ॥ ८४ ॥ म्हणे, 'हें तों **पा**ताळभुवन । **कृ**ष्णसेवक आम्ही सर्पस्थान । तूं मृत्युलोकींचा असती कोण ? । मानवां जाण दुर्घट येणें.' ॥ ८५ ॥ मग **भी**में सर्वही समाचार । श्रुत केला **कौ**रवअविचार । **वा**सुकी म्हणे, 'तूं साचार । भय न मानीं सर्वथा.' ॥ ८६ ॥ मग संभ्रमें नेउनी स्वस्थाना । सुमुहूर्तें कन्या **भी**मसेना । लग्नसोहळा करोनी जाणा । दीधली **प**द्मावती राजेया ! ॥ ८७ ॥ अमृत प्राशूनी पद्मिणीसंगीं । क्रीडतां गर्भ धरिला तिजलागीं, । तोचि **ब**भ्री जाण निःसंगीं । पराक्रमी पूर्ण बळियाढा. ॥ ८८ ॥ तया बोलवावया साठीं । श्री**कृ**ष्णें पत्र पाठविलें उठाउठीं,। तुवां प्रश्न केला म्हणोनि गोमटी । कथा पूर्वील बोलिलों. ॥ ८९ ॥ ऐसें **ब**भ्रीचें कथन । जन्मोत्पत्ती कथिली संपूर्ण । **ज**न्मेजया ! सादर श्रवण । करुनी ऐकें निजप्रीती. ॥ ९० ॥ पुढें बाणाग्रीं पत्र देखोन । तिनीं बाणें मृत्युलोका जाण । येइल मातृआज्ञा वंदोन । तें

रसाळ कथन पुढें परिसें.' ॥ ९१ ॥ प्रभुविश्वंभरप्रसादें । श्रोतयां श्रवणीं निघती दोंदें । शुभानंद प्रेमानंदें । संतचरणा विनटला. ॥ ९२ ॥

---

## अध्याय दुसरा.

राजा म्हणे, 'जी वक्तया । वैशंपायना ! विज्ञानसूर्या ! । पार्थध्वजीं हनुमंत बैसाया । काय कारण सांगिजे. ॥ १ ॥ सविस्तरें सांगोन । मग पुढील करावें निवेदन.' । ऋषी म्हणे, 'राया ! धन्य धन्य । श्रोतया ! सज्ञान तूं होसी. ॥ २ ॥ तरी द्रौपदीस्वयंवरा पूर्वी कथिलें । जें व्यासें आदिपर्वी वर्णिलें, । मग पांडव इंद्रप्रस्था स्थापिले । धृतराष्ट्रराजें राजया ! ॥ ३ ॥ तेव्हां नारदें नियमिलें येवोनी, । 'पांच पुरुषां स्त्री एक म्हणोनी । तरी स्त्रियांपासोनी पुरुष गुणी । अनर्था प्राणी पावले. ॥ ४ ॥ म्हणूनि मद्वाक्यें नियमबंधन । करितों तुमच्या हिताकारण । उलंघिल्या होईल पतन । राजश्रिये एक तप. ॥ ५ ॥ आणि तो दोषनिवारणा । करावी लागेल भूप्रदक्षिणा । सकळ तीर्थें करितां स्नाना । राजस्थाना मग मिळे. ॥ ६ ॥ म्हणूनि नेम तो आइका । एकमास एकाघरीं देखा । असतां चौघीं मानावी मातृका । तैसेंच परंपरा पांचांहीं. ॥ ७ ॥ गुरू-दैरजांचे[1] मंदिरीं । तेथेंचि असावी हे सुंदरी । प्रसूत झालिया दुजे मंदिरीं । जावें तिणें समाज्ञे. ॥ ८ ॥ आणि एका घरीं असतां जाण । दुजा पाहील पाप-दृष्टीकरुन । तरी मच्छापा योग्य जो पूर्ण । तेणें तीर्थाटण मग कीजे. ॥ ९ ॥ तुम्हीं सात्विक पांडव बंधु । तेथ येईल लोकापवादु । स्त्रीपासूनि लांछन-शब्दु । नये ऐसें वर्तावें.' ॥ १० ॥ ऐसें नेमें वर्ततां एके दिनीं । ब्राह्मण आला आक्रंदोनी, । 'गाई नेल्या' म्हणे 'चोरुनी' । म्हणूनि करुणा भाकित. ॥ ११ ॥ हाक करीत नगरीं आला । ती श्रुत झाली पार्थाला । मग ब्राह्मणा म्हणे, 'उगला । आणूनि गोधनें पैं देतों. ॥ १२ ॥ करूनि ब्राह्मणाचें समाधान । आपण प्रवेशे शस्त्रांलागुन । धर्म द्रौपदी एकांतस्थान । तेथें धनुष्यबाण पैं होतें. ॥ १३ ॥ तेथें जातां निद्रिस्थें । दृष्टीस पडलीं अवचितें । मग धनुष्य-बाण घेऊनि त्वरितें । तस्करांसीं दंडिलें. ॥ १४ ॥ गोधनें आणूनि ब्राह्मणासी । देऊनि पाठवी स्वस्थानासी । मग नारदनेमवचनासी । स्मरूनि तीर्थासी नि-घाला. ॥ १५ ॥ घेऊनि धर्मादिकांची आज्ञा । पार्थ निघाला तीर्थाटणा । सकळ तीर्थें हिंडूनि भुवना । दक्षिणरामेश्वरा पातला. ॥ १६ ॥ तेथें तीर्थविधी

---

१. गुरु+उदरज=गुरु आणि पुत्र यांच्या.

करावयासी । अर्जुन निघे सेतुबंधासी । सकळ तीर्थमाहात्म्य ब्राह्मणापासी । विधियुक्त ऐकिलें तेथवां. ॥ १७ ॥ मग रामेश्वरा आराधिलें । राममहिमा पुराण वाचिलें । त्यांत वानरीं सैन्य उतरिलें । पाषाणीं सेतु बांधोनी. ॥ १८ ॥ रावणवधासीं लंके जातां, । ऐसी ऐकिली पुराणकथा, । मग पार्थ पुसे श्रोत्यां वक्त्यां । संशय चित्तीं आणूनि. ॥ १९ ॥ 'श्रीराम धनुर्धर शिरोमणी । तरी सेतु बांधिला कां पाषाणीं ? । बाणीं न बांधिला म्हणूनि । संशय आला मानसीं.' ॥२०॥ तेथें श्रवणासि बैसला हनुमंत । त्याणें सांगितला वृत्तांत । म्हणे, 'वानर असंभाव्य अद्भुत । पर्वतप्राय पैं होते. ॥ २१ ॥ तयांच्या पद्घातेंकरून । बाणसेतू होईल चूर्ण । म्हणोनियां श्रीरघुनंदन । पाषाणीं बांधोन उतरिले.' ॥ २२ ॥ ऐकूनियां ऐसी वचनोक्ती । विश्वास न वाटे पार्थाप्रती । म्हणे, 'कोण तुम्हीं हें निश्चिती । मजला प्रीतीं सांगावें.' ॥ २३ ॥ मारुती म्हणे, 'मी श्रीरामभृत्यू । वायुवीर्यज अंजनीसुतू । श्रीरामस्मरणीं अहोरातू । असतों रक्षीतू पैं येथें.' ॥ २४ ॥ मग मारुती म्हणे, 'धनुर्धरा ! । तुमचा कोण ग्राम ? कोण थारा ? । येथ आलासी कोण विचारा ? । मजला चतुरा ! तें सांगें.' ॥२५॥ पार्थ म्हणे, 'मी श्रीकृष्णदास । हस्तनापुरीं सोमवंश । पुरुषार्थी पंडुराजा नरेश । असें तनुज तयाचा. ॥ २६ ॥ कांहीं नारदोक्तीचे गुंतीं । भूप्रदक्षिणेसी सकळतीर्थीं । करितां रामेश्वर देखोनि चित्तीं । आनंद झाला सर्वांगीं. ॥ २७ ॥ परी एक नवल वाटतें । बाणसेतु वानरपादघातें । चूर्ण होईल म्हणीतलें मातें । शब्द पुरुषार्थातें लागला. ॥ २८ ॥ श्रीरामा ऐसा धनुर्धर । नाहीं झाला पृथ्वीवर । असतां पाषाणीं श्रम थोर । व्यर्थ केला मज वाटे.' ॥ २९ ॥ ऐसें ऐकोनी पार्थवचन, । 'आम्ही वानर बळियाढे पूर्ण. । बाणसेतूची काय आंगवण । शस्त्रधर पूर्ण जाणती ?' ॥ ३० ॥ वचन ऐकोनी मारुतीचें । पार्थ म्हणे, 'ऐक साचें. । म्यां बांधिल्या शरसेतुचें । पिष्ट कैसें पैं होतें ?' ॥ ३१ ॥ ऐकतां कोपला वानर । म्हणे, 'ऐक रे ! तूं धनुर्धर । सेतु बांधीं तूं सत्वर । करितों चूर एक मी. ॥ ३२ ॥ आणि सेतुभंग केला जर । दास तूं जाण माझा निर्धार । न मोडिल्या म्यां सेतु दुर्धर । तुझा साचार मी दास.' ॥ ३३ ॥ ऐसें दोघेही अनुवादोन । दोघे सरसावले घालुन पण । सेतु बांधोनियां अर्जुन । 'झाला पूर्ण' म्हणतसे. ॥ ३४ ॥ मारुतीस म्हणे, 'करीं चूर्ण.' । म्हणतां केलें उड्डाण । भुभुकारें करूनि गर्जन । 'श्रीरघुनंदन' म्हणतसे. ॥ ३५ ॥ घालितां सेतूसि पादघात । चूर्णची झाला अकस्मात । म्हणे, 'यशस्वी श्रीरघुनाथ' । म्हणे, 'सामर्थ्य तयाचें.' ॥ ३६ ॥ मग पार्थ करी अधोवदन । आश्चर्यें निश्चय झाला पूर्ण ।

वानर बळियाढे म्हणून । सत्यचि बोलिला वानर. ॥ ३७ ॥ मारुती म्हणे, 'रे धनुर्धरा! । तूं दास झालासी किंकरा, । आतां नेईन लंकापुरा । रक्षण कराया बिभीषणा!' ॥ ३८ ॥ ऐकूनि तयाचें वचन । चिंताक्रांत झालें पार्थमन, । म्हणे, 'हे द्वारकावासी श्रीकृष्ण! । जिंकिलें मजलागून वानरें. ॥ ३९ ॥ धांव धांव गा यदुराया! । कृपासागरा करुणालया! । भक्तवत्सला! संकटीं या । सोडवीं काया पैं माझी.' ॥ ४० ॥ ऐकूनि अर्जुनाचें वचन । गजबजोनि आले जगजीवन, । ब्राह्मणवेष वृद्ध घेऊन । समीप आले तयाच्या. ॥ ४१ ॥ म्हणे 'रे! कासया बैसले येथ । योजूनि कोण तो कार्यार्थ?' । मारुती घालूनि दंडवत । सांगे वृत्तांत सर्वही. ॥ ४२ ॥ 'सेतु भग्न केला म्यां पणीं । म्यां जिंकिलें यालागुनी । दास्यत्व कराया लंकाभुवनीं । नेईन निर्धारें मी आतां.' ॥ ४३ ॥ ऐकोनि म्हणे, वृद्ध ब्राह्मण, । 'यासि साक्षी नव्हते कोण. । मज सत्य न वाटे.' म्हणुन । बोले जगजीवन ते काळीं. ॥ ४४ ॥ मग म्हणे, 'रे वानरोत्तमा! । साक्षी कोण तो सांग आम्हा.' । दोघे म्हणति, 'साक्षि या कर्मा । कोणी नव्हतें स्वामिया!' ॥ ४५ ॥ ब्राह्मण म्हणे, 'अवघें असत्यू. । आतां मी राहतों साक्षिभूतू. । तुवां बांधिजे अखंड सेतू' । म्हणतां पार्थू उमजला. ॥ ४६ ॥ अर्जुन म्हणे, 'पावला श्रीकृष्ण'. । म्हणूनि हर्षें सेतुबंधन । करूनि म्हणे, 'झाला संपूर्ण' । तों जगजीवन काय करी. ॥ ४७ ॥ कूर्मरूपें सेतुतळीं । पृष्ठी लावी श्रीवनमाळी । मग येऊनि वानराजवळी । सेतुची [1]होळी करी कीं.' ॥ ४८ ॥ मग मारुती म्हणे, 'जी द्विजवरा! । साक्षी तूं' म्हणूनि सत्वरा । उड्डाण करितां श्रीरघुवीरा । स्मरोनि अंबरा पैं गेला. ॥ ४९ ॥ पुन्हा लोटला सेतूवरी । सत्राणें पादप्रहार करी । तों चंडु उसळे जयापरी । तयापरी मारुती उसळला. ॥ ५० ॥ सेतु अभंग जाणोनी । मारुती विचारी आपुल्या मनीं, । पणीं जिंकिलें मजलागुनी । विचित्र करणी हे झाली. ॥ ५१ ॥ ब्राह्मणें सांगीतलें, 'वानरा! । तूं भृत्य झालासी खरा.' । मारुती म्हणे, 'सत्यची द्विजवरा! । स्वामित्व वीरा पैं आलें.' ॥ ५२ ॥ अर्जुनामनीं आल्हाद थोर, । म्हणे, 'मज पावला यदुवीर'. । तों निजरूप प्रगटूनि श्रीधर । भेटे अर्जुना ते काळीं. ॥ ५३ ॥ अर्जुनें धरिले दोनी चरण । श्रीकृष्णें दीधलें आलिंगन, । सर्वेंची रामरूप धरुन । कपीस दर्शन दीधलें. ॥ ५४ ॥ कपीनें पाहोनी श्रीरामा, । म्हणे, 'दीधलें दर्शन मेघश्यामा! । पूर्ण दयाळू' म्हणूनि पादपद्मा । धरिलें सद्गद होउनी. ॥ ५५ ॥ कपीसी आलिंगोनी रघुनंदन, । म्हणे, 'अवतार नर नारायण ।

---

१. नाश.

दोनी रूपें कृष्णार्जुन । त्यांचि धरिलीं जाण पैं. ॥ ५६ ॥ त्रेतीं दुष्ट राक्षस वधिले । तेचि द्वापारीं क्षत्रिय जन्मले । त्यांच्या संहारार्थ अवतार धरिले । साक्षात त्यांची पैं दोन्ही. ॥ ५७ ॥ तरी नर विजय हा पार्थ, । नारायण तो मी श्रीकृष्णनाथ. । नराहस्तें दुष्ट समस्त । भविष्यार्थ नाश असे. ॥ ५८ ॥ आणि अर्जुन माझा सखा मैत्र । जो नरावतार स्वतंत्र, । दोघीं भूभार हरावया सर्वत्र । चरित्र विचित्र ऐसें असे.' ॥५९॥ ऐसें बोलतां श्रीरामराणा । कपी लागे अनन्य चरणा. । म्हणे, 'जयजया सीतारमणा! । महिमा तुझा तूं जाणसी.' ॥६०॥ पुन्हा बोले श्रीरघुनाथ, । म्हणे, 'तुझें भाष्य झालें मुक्त । कृष्णावतारीं सेतुबंधीं निश्चित । भेटी देईन म्हणोनी. ॥६१॥ तेंचि हें आजी तुज कारण । रामरूप अवगलों मी जाण । करावया हेतु तुझा पूर्ण.' । म्हणूनि जगजीवन आलिंगी. ॥ ६२ ॥ मग म्हणे, 'अंजनीसुता! । नंदीघोक रथ इंद्रें पार्था । दिधलासे वैरी-वधार्था । मजला सारथ्यता करणें असे. ॥ ६३ ॥ तरी तुवां असावें ध्वजा· वरी । वैरी वधूं नानापरी, । भूभार हरूं पार्थकरीं, । साह्य निर्धारी आम्ही तुम्ही. ॥ ६४ ॥ जिष्णु होईल महारथी, । आम्ही मिरवूं सारथ्ययुक्ती, । तुवां ध्वजीं राहोनि निश्चिती । रक्षूं रणपथीं अर्जुना. ॥ ६५ ॥ राज्यीं स्थापूनि धर्ममूर्ती । सुखी करूं प्रजा वसुमती.' । 'अवश्य' म्हणूनि कपीपती । चरण प्रीती वंदिले. ॥ ६६ ॥ मग श्रीकृष्णरूप धरून । कपीस म्हणे, 'ऐक वचन. । राम तो मी श्रीकृष्ण । जाण अभिन्न मारुती!' ॥ ६७ ॥ ऐसें बोलतां यादवराणा । मस्तक ठेविला श्रीकृष्णचरणा । म्हणे, 'पार्थें स्मरतां त्या क्षणा । येईन जाणा स्वामिकार्या.' ॥ ६८ ॥ ऐसें बोलूनि मारुती । आज्ञा घेतली श्रीकृष्णाप्रती । पार्थासी आलिंगूनि प्रीती । कर्दळीरण्या पैं गेला. ॥ ६९ ॥ श्रीकृष्ण गेले द्वारावती । पार्थ हिंडे तीर्थोतीर्थीं । सकळही भूप्रदक्षिणा प्रीती । द्वादशाब्द-पर्यंत पैं केली. ॥ ७० ॥ हेंचि कारण जन्मेजया! । हनुमंत ध्वजीं बैसावया । पुढील कथा ऐकावया । सादर कर्णीं परिसिजे.' ॥ ७१ ॥ मागुती राजा प्रश्न करी । वैशंपायन वदेल निर्धारी । तेंचि प्रेमें ऐकिजे चतुरीं । रसिक निर्धारीं पैं असे. ॥ ७२ ॥ इति श्रीमन्महाभारते । भीष्मपर्व विश्वंभरचरितें । आ-ळस टाकूनियां श्रोते । शुभानंद म्हणे श्रवण करा. ॥ ७३ ॥

---

## अध्याय तिसरा.

जन्मेजयासि म्हणे वैशंपायन, । 'कौरवीं कुरुक्षेत्रीं सकळ सैन्य । रक्षिलें

दुर्गहुडे[1] रचोन। धान्यादि संग्रह संग्रहिले. ॥ १ ॥ सेनापती गंगानंदन। देखोनि दुर्योधन आनंदघन। मग चौघे मैत्री बोलावुन । मांडिला विचार तो ऐका. ॥ २ ॥ म्हणे, 'पांडवांसीं सांगोनी। वर्मशब्द बोलेल वचनीं। ऐसा पाठविजे कोणी। तें विचारूनी सांगिजे.' ॥ ३ ॥ तों पुढें उलूक नागातें। देखोनि बोलाविलें त्यातें, म्हणे, 'मैत्रा! जाऊनि पांडवांतें। सांगावें तुतें जें सांगेन.' ॥४॥ म्हणे, 'उलूका! हीणवचनीं। तुवां बोलावें त्यांलागुनी। तैसेंचि श्रीकृष्णा वर्मवचनीं। निर्भयपणीं तूं बोलें. ॥ ५ ॥ म्हणावें, 'तुम्हीं नपुंसक साचार। मत्स्यराजयाचे किंकर.' । ऐसें अनेक बोलोनी अंतर। त्रासी होणार तें बोलें. ॥ ६ ॥ 'भीष्मादीक समर्थ शूर। यांसीं करितां काय समर? । पळूनि जातां शोधूनि सत्वर। बोलें साचार मारीन मी.' ॥ ७ ॥ मग उलूकें जाऊनि धर्मसभेंत। बोलणें दुर्योधनाचें बोलत,। ऐकूनि क्षोभले समस्त। भीमादि सहोदर ते काळीं. ॥ ८ ॥ त्यासीं शांत करी विधिजनक,। उत्तर वदे नागासी देख,। 'म्हणावें सिद्ध रणीं निःशेख। कोण पळेल तें पाहूं. ॥ ९ ॥ तरी उलूका! दुर्योधनासी। सांग जाऊनि कपटियासी । आम्हीं सिद्ध असों रणासी । ऐसें त्वरेसी सांगावें.' ॥ १० ॥ उलूकें येऊनि दुर्योधना । सांगितली धर्माची आज्ञा,। तों इकडे रणांगणा। श्रीकृष्ण स्वयें पातले. ॥ ११ ॥ जयवेळ शुभ मुहूर्तें। रणस्तंभ रोविला रणातें। पाहोनि विस्तीर्ण महीतें । युद्धारंभाकारणें. ॥ १२ ॥ तेव्हां बभ्री पाताळाहुनी। तिनी बाणीं मृत्युलोका येउनी । कुरुक्षेत्रीं सर्वांसी विलोकुनी। पांडवांकडे जातसे. ॥ १३ ॥ तीनीं बाण तयाचे करीं। देखूनि आश्चर्य करी मुरारी,। म्हणे, 'तूं युद्ध करिसी कैसेपरी । तें निर्धारीं मज सांगे.' ॥ १४ ॥ बभ्री बोले, 'पुरुषार्थे। तीं बाणीं जिंकिन त्रैलोक्यातें,'। श्रीकृष्ण म्हणे, 'प्रत्यय मातें। दावीं येथें भीमसुता!' ॥ १५ ॥ मग बाणाग्रीं शेंदूर भरिला। म्हणे, 'लावितों तुझ्या वर्माला,'। बाण चापांतूनि सुटला। तो लागला श्रीकृष्णपदपद्मीं. ॥ १६ ॥ बाण पुन्हा आला हातीं। वर्मांगीं खुणा पाहूनि श्रीपती। म्हणे, 'सामान्य नोहे निश्चिती'। म्हणूनि प्रीती बोलिला. ॥ १७ ॥ 'उद्यां जिणावें कौरवांतें'। तों बभ्री बोले श्रीकृष्णातें,। 'पाळीन मातेच्या आज्ञेतें। कौरव पांडवांतें नोळखूं.' ॥ १८ ॥ श्रीरंग म्हणे 'ते आज्ञा कैसी?'। बभ्री म्हणे, 'स्वामी! परियेसीं। जेव्हां पत्र गेलें पाताळासी। बाणमुखें मेज आणूं[2]. ॥ १९ ॥ त्यांत लिहिलें वर्तमान । कौरव पांडवां युद्ध

१. किल्ला इत्यादिसंबंधीं बुरुज. २. मला आणण्यासाठीं.

दारुण । त्यांत शतसंख्या धृतराष्ट्रनंदन । आम्ही पांचजण पंडूचे. ॥ २० ॥ मातेनें मजप्रती केली आज्ञा, । वेगें जाईं मृत्युभुवना.' । मग म्यां सांगीतली विवंचना, । 'नोळखें कोणा मी तेथें.' ॥ २१ ॥ यावरी मातेनें बोलिली खुणा । कीं, 'शत कौरव जय साधिती रणा । मोडती पांच पांडव या कारणा । साह्य त्या रणा तूं होईं.' ॥ २२ ॥ तरी उदयीक मोडेल जें रण । त्याचें साह्य मी निश्चयें करीन'. । मग श्रीकृष्ण म्हणे, 'सद्य विघ्न । वर्में कर्में हा विंधील. ॥२३॥ तरी मोडेल कौरवांची सेना । हा घात करील पांडुनंदना'. । ऐसें कल्पूनी यादवराणा । आदरें मरण त्या पुसे. ॥ २४ ॥ समीप बैसविलें बभ्रीतें, । म्हणे, 'सर्वांचें वर्म कळे तूतें । तरी तुझें वर्म तुज न कळतें । ऐसें नसे महा-वीरा!' ॥ २५ ॥ मग बभ्री म्हणे, 'भीमकरें । मज मृत्यु असे निर्धारें'. । ऐकूनी श्रीकृष्ण म्हणे, 'सत्वरें । रणस्तंभ पाहिजे रक्षिला. ॥ २६ ॥ कांहीं कौरव करिती कुटिळ । त्वां जाऊनी तें रक्षिजे स्थळ । पूजा अर्पूनी रणस्तंभा सकळ। आजि रात्रीं केवळ रक्षावा.' ॥ २७ ॥ 'अवश्य' म्हणूनि भीमसुत । निघाला रणस्तंभ असे जेथ, । पूजा अर्पूनी बैसला रक्षित । तों अभ्रें गगनांत उदेलीं. ॥ २८ ॥ तेणें झाला अंधकार । तों श्रीकृष्णें पाहिला वृकोदर, । तयासीं सांगे, 'तुवां सत्वर । रणस्तंभ साचार रक्षिजे. ॥ २९ ॥ कौरवांचे कुटिळ थोर । शकुनी कांहीं करील मकर । यालागीं जाऊनी सत्वर । कुटिलसंहार करावा. ॥ ३० ॥ त्वां न बोलतां तयासी । गदाघात ओपिजे मस्तकासी.' । 'अवश्य' म्हणूनी गदेसी । घेऊनि भीम चालिला. ॥ ३१ ॥ दुरूनी पाहे जंव तेथ । तंव एक पुरुष आहे अद्भुत, । मग घालूनियां गदाघात । पाडिला मूर्छित भू-तळीं. ॥ ३२ ॥ तेव्हां 'श्रीनारायण' म्हणूनि । बभ्री बोलोनी पडतां क्षणीं । भीमें वचन ऐकूनी कानीं । समीप पाहों पातला. ॥ ३३ ॥ जंव पाहे न्याहाळूनि त्यातें । तंव बभ्री वोळखिला तेथें, । मग ललाट धरूनि मेदिनीतें । आपटी भीम तडतडां. ॥ ३४ ॥ आक्रोशें फोडिली हाक । तों धर्मादी चौ-घांनीं ऐकून शोक । सत्वर येऊनियां रणस्तंभीं देख । पाहिला विचार तेथींचा. ॥ ३५ ॥ मग धर्मे शांतविलें अनुजातें । म्हणे, 'प्रारंभ असे रणातें, । कोण वांचे मरे नेणूनी शोकातें । किमर्थ बापा! करितोसी? ॥ ३६ ॥ रणीं जिंकि-लिया विचक्षणा आपण । मग केला जाईल शोक दारुण'. । मग सत्य मानू-नियां भीमसेन । उगाची राहिला ते काळीं. ॥ ३७ ॥ उपरी प्रातःकाळ तेथें झाला, । तों गांधाराचा दूत येऊनि बोलिला, । म्हणे, 'धर्मराजा! सत्वर युद्धाला ।

---

१. तत्क्षणींच.

पाचारिलें रणांगणीं.' ॥ ३८ ॥ धर्म म्हणे, 'बभ्रीचें दहन । आजी करणें असे आम्हांलागुन । उदईक युद्धा येऊं म्हणोन । दुर्योधनासी सांगावें.' ॥ ३९ ॥ मग सकळ सैन्य मिळालें । बभ्रीचे प्रेताजवळीं आलें । तंव बभ्रीनें वचन बोलिलें । निचेष्टितपणें असतां कीं. ॥ ४० ॥ म्हणे, 'मी युद्ध पाहेन सकळ । देहदहन न करा तों काळ.' । मग शमीचे वृक्षीं भीमबाळ । धर्मरायें राखिला सुरक्षें. ॥ ४१ ॥ ते मार्गशीर्षशुद्ध एकादशी । पारणें सारूनी दुसरे दिवशीं । लगबगें सिद्ध होऊनि युद्धासी । राहिले पांडव त्या काळीं. ॥ ४२ ॥ श्रीकृष्ण विचारी आपुले चित्तीं । बळराम असतां कौरवसंगती । तरी अजिंक्य पांडवांसीं रणपंथीं । धृतराष्ट्रनंदन म्हणतसे. ॥ ४३ ॥ म्हणूनि सभंवतें जों पाहतां । तों सूत पुराणिक पाहिला अवचिता । तया श्रीकृष्णें पाचारूनी सांगतां । वचन तत्वतां ते समयीं. ॥ ४४ ॥ म्हणे, 'भीष्मसभेसी तुम्हीं जावें । क्षणभरी पुराण सांगावें । तोंपर्यंत आम्ही अवघे । सिद्ध शस्त्रास्त्रीं पैं होतों. ॥ ४५ ॥ नातरी ते सिद्ध असती । न येतां आम्हां शब्द ठेविती, । तरी भीष्मासी विलंब होय ती रीती । करावी सत्वरीं द्विजवरा!' ॥ ४६ ॥ 'अवश्य' म्हणूनी ते समयीं । पुस्तक पुराणाचें घेऊनी लवलाहीं । पुराणीक भीष्मसभेसी पाहीं । आला लगबगें त्या क्षणीं. ॥ ४७ ॥ भीष्म बैसला पारणें करूनी । अनेक वीर बैसले त्या स्थानीं । बळिभद्र यादवेंसी ते क्षणीं । वाट पाहे भीष्माची. ॥ ४८ ॥ तों पुस्तक सोडून पुराणिक । सभेसी इतिहास सांगे अलोलिक । ती संपूर्ण ऐकावया नावेक । भीष्माचार्य बैसला. ॥ ४९ ॥ क्रोध आला बळिभद्रातें, । दूत पाठविला भीष्माचार्यातें । भीष्म म्हणे, 'ऐकूनी प्रसंगातें । येतों ऐसें सांगावें. ॥ ५० ॥ पूर्ण प्रसंग ऐकूनी जाणा । पुराणिकासी देऊनी दक्षणा' । ऐसें दूतीं सांगतां त्या क्षणा । बळभद्रराणा क्षोभला. ॥ ५१ ॥ मग रथाखालीं उतरोन । आला भीष्मसभेलागून । देखूनि उठिले अवघेजण । पुराणीक आपण नुठेची. ॥ ५२ ॥ पहिला क्रोध त्याचा होता । विशेष आला न उठतां । म्हणून मुसळें तत्वतां । मारोनियां टाकिला. ॥ ५३ ॥ हाहाकार वर्तला तेथ । जाहाला ब्राह्मणाचा घात, । हत्या घडली अत्यद्भुत । इतुक्यांत अनंत पातला. ॥ ५४ ॥ बळभद्र म्हणे श्रीकृष्णातें, । 'ब्राह्मणहत्या घडली मातें, । काय कीजे ऐसिया दोषातें? । परिहार निश्चित वदावा.' ॥ ५५ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'न कळे मातें । पुसावें आपण ब्राह्मणवर्यांतें.' । तों वेदव्यास पातले तेथें । शिष्य सांगातें घेउनी. ॥ ५६ ॥ सर्वीं करूनी प्रत्युत्थान । चरण वंदिती सकळ सभाजनें । तों विनविलें श्रीकृष्णाप्रजान । कीं, 'ब्रह्महत्या मज घडली.

॥ ५७ ॥ तरी या दोषाचा परिहार । मजला सांगावा जी! साचार.' । मग श्रीवेदव्यास उत्तर । सांगती परिहार तो ऐकें. ॥ ५८ ॥ व्यास म्हणे, 'बळदेव! जाणा । करावी लागे भूप्रदक्षिणा । विलंब न करीं अर्धक्षणा.' । तैसें श्रीकृष्णराणा बोलिला. ॥ ५९ ॥ 'ब्रह्महत्या दोष दारुण । आतांची जावें निघोन.' । ऐकूनी उठिला संकर्षण । तीर्थाभिगमन करावया. ॥ ६० ॥ तें ऐकूनी दुर्योधन । येऊनी धरिले दोनी चरण । म्हणे, 'कोणा करीं देऊन । आम्हांसीं टाकुन जातां जी!?' ॥ ६१ ॥ तंव बळदेव आदरें बोले, । 'अष्टादश दिवसीं येईन वहिलें । श्रीकृष्णासीं नेमवाक्य बोलिलें । जाण निर्धारें सुयोधना!' ॥ ६२ ॥ मग विचारिलें भीष्मद्रोणा । कर्णशल्यादीविकर्णा, । 'तुम्हीं रक्षावा कौरवराणा । अष्टादश दिन संग्रामीं.' ॥ ६३ ॥ मग नेमूनी दीधले दिवस । दहा रोज भागिले भीष्मास, । द्रोणाचार्य पंचदिवस, । युद्धीं रक्षील गांधारा. ॥ ६४ ॥ कर्णासी म्हणे, 'दोनी दिवस । रणीं रक्षिजे कौरवांस.' । शल्यासी म्हणे, 'अर्धदिवस । तुवां राजयास रक्षिजे. ॥ ६५ ॥ गदायुद्धीं दुर्योधन नृपती । अर्धदिवस युद्ध करिती । मी येतसें मध्यरातीं । अठराविया दिवसीं. ॥ ६६ ॥ मी आलिया निश्चितें । भय नाहीं गांधारातें । पराभवूनी पांडवांतें । राज्य तूतें देईन मी. ॥ ६७ ॥ जरी एक रणीं पडेल पांडव । तरी त्यांसीं राज्य सुख नाहीं वैभव । आणि एकादा उरलिया कौरव । निश्चयें राव तो जाणे.' ॥६८॥ ऐसें सांगूनी दुर्योधना । बळदेव निघे भूप्रदक्षिणा । तों यादव म्हणती, 'संकर्षणा! । आम्ही येऊं तव संगीं. ॥ ६९ ॥ तुजवीण आम्ही सर्वथा । न राहों येथ यादवनाथा! । भूप्रदक्षिणा करूनी युद्धार्था । येऊं परतुनी तव संगीं.' ॥ ७० ॥ 'अवश्य' म्हणूनी यादव नृपती । चालिला भूप्रदक्षिणे निर्दोषार्थी । अश्वत्थामा कृपाचार्याप्रती । आज्ञा मागूनी म्हणतसे. ॥ ७१ ॥ 'तुम्हीं सकळही भूपाळगणीं । कौरव रक्षावे समरंगणीं । अठरा दिवसीं परतोनी । प्रदक्षिणा करूनी येतसों.' ॥ ७२ ॥ 'अवश्य' म्हणोनी समस्त नृपती । नमस्कारिलें बळदेवाप्रती । मग पुसोनियां श्रीकृष्णाप्रती । चालिला मनोगती बळराम. ॥ ७३ ॥ बळदेव गेलियावरी भूप्रदक्षिणा । श्रीकृष्ण आला पांडवसदना । धर्मासी निवेदिली सकळ रचना । आतां विलंब रणा न लाविजे. ॥ ७४ ॥ तंव पांडव उतावीळ बोलती, । 'उदईक संग्राम करुं जी! निश्चिती । सर्वसिद्धा त्रयोदशी तिथी । आरंभूं संग्राम सुदिनीं.' ॥ ७५ ॥ ऐसी ब्रह्महत्या बळदेवातें । घडली म्हणूनी पुराणातें । द्वादशीसी नाइकती श्रोते । वक्तेही न वाचिती अ-

द्यापी. ॥ ७६ ॥ असो. बळदेव यादवांसहित । भूप्रदक्षिणे आज्ञापूनी सुगंधीसूत । व्यासदेव गेले गजपुरांत । कुरुअंधासी पुसावया. ॥ ७७ ॥ देखोनियां व्यासमूर्तीतें । विदुर आणि अंबिकासुतें । नमस्कारूनी चरणातें । पूजोपचार अर्पिले. ॥ ७८ ॥ मग व्यास म्हणे, 'अंबिकासुता ! । उदईक युद्ध माजेल कुरुक्षेत्रा । सकळ मृत्यु पावती आतां । राहती तत्वतां पांडव. ॥ ७९ ॥ जरी तूं पाहसी तरी चक्षुतें । देईन तुजला मी निश्चितें.' । धृतराष्ट्र म्हणे, 'नलगे मातें । न पाहवे क्षयातें माझेनी.' ॥ ८० ॥ ऐकून बोले व्यास भगवान, । 'तरी बद्रिकाश्रमीं जाऊन । सत्यवतीसंगीं तप आचरून । हरिस्मरणें सार्थक करीं.' ॥ ८१ ॥ मग म्हणे धृतराष्ट्र अंध, । 'भारती आइकावें वाटे युद्ध.' । व्यास म्हणे, 'मनोरथ सिद्ध । करीन तुझा पैं आतां.' ॥ ८२ ॥ अंध म्हणे, 'मज न सांगे कोणी । अवघे गेले युद्धाकारणी । अपरोक्ष ज्योतिषी मत्सन्निधानी । ठेवी रणवृत्त सांगेसा.' ॥ ८३ ॥ परिसूनी अंधाच्या वचना । व्यासें संजयासी केली आज्ञा, । 'येथ राहूनी रणक्रमरचना । निवेदीं वार्ता युद्धाची. ॥८४॥ कुरुक्षेत्रींचें सर्वही वर्तमान । तें निवेदीं धृतराष्ट्रालागुन, । तुज श्रम न होती गमनागमन । करितां जाण मद्वाक्यें.' ॥ ८५ ॥ महाप्रसाद म्हणूनि येरें । चरण वंदिले संजयें चतुरें, । ऐसी आज्ञा करूनी व्यासेश्वरें । गमन केलें स्वाश्रमा. ॥ ८६ ॥ यापुढें युद्ध गहन । होईल भूभारनिरसन । तत्पूर्वी गीता अर्जुनाकारण । कथील श्रीकृष्ण आवडी. ॥ ८७ ॥ तो श्रीगुरु प्रभु विश्वंभर । भीष्मपर्व वर्णेल रस अपार । श्रोते चातक निरंतर । आवडी श्रवणीं प्राशिती. ॥ ८८ ॥ इति श्रीमन्महाभारत । प्रेमळ श्रवणीं धरूनी आर्त । श्रोते परिसोत कथा अद्भुत । शुभानंद विनवीतसे. ॥ ८९ ॥

## अध्याय चवथा.

उपरी प्रातःकाळीं पंडुनंदन । सारिलें स्नानसंध्यादी भोजन । परिवारासहित नृपनंदन । सिद्ध शस्त्रास्त्रीं जाहले. ॥ १ ॥ कवचें आंगीं लेइलीं युक्त । तुळसी बिल्वमाळा गळां विराजित । नाना शृंगार लेऊनी मंडित । रत्नमाळादी शोभती. ॥ २ ॥ नमस्कारूनी मातापिता । तैसेंची मानिलें धौम्यपुरोहिता । पूजोनियां श्रीकृष्णनाथा । धर्मरायें ते काळीं. ॥ ३ ॥ म्हणे, 'तूं आमुचा जयदाता । तुजेनी उपजे बलशौर्यता । शतधा चरणीं माथा । सदोदीत सर्वथा पैं तुझ्या.' ॥ ४ ॥ यापरी नमस्कारूनी श्रीकृष्णासी । धर्मराज बैसे जाऊनी रथासी ।

तयामागें भीमसेन त्वरेसी । जाउनी रथीं बैसला. ॥ ५ ॥ 'हरहर'शब्दें करूनी गजर । सकळही निघाले महाशूर । धर्मासी शुभ शकुन वारंवार । विजय देणार ते होती. ॥ ६ ॥ चाष गेला वामभागीं, । वायस निघाला दक्षिणमार्गी, । धर्म सांगे श्रीकृष्णालागीं । शकुनवार्ता संतोषें. ॥ ७ ॥ मग बोले श्रीपुरुषोत्तम, । 'तूं होसी राजा सार्वभौम.' । धर्म म्हणे, 'तूं निःसीम । कर्ता करविता सर्वही.' ॥ ८ ॥ यावरी अर्जुन निघाला । नंदीघोषरथीं आरूढला, । मारुतीचें स्मरण करितां आला । भुभुक्कारें करूनियां. ॥ ९ ॥ नमस्कारूनी श्रीकृष्णचरणासी । जाऊनी बैसला ध्वजस्तंभेंसी । सारथी मिरवला हृषीकेशी । तयाच्या भाग्यासी पार नसे. ॥ १० ॥ श्वेत हय रथासीं जुंपिले । कमळावरें वाग्दोरे धरिले । रथदीप्तीनें गगन भरे । महारथी सुभद्रावर शोभत. ॥ ११ ॥ धुरेसीं बैसला मदनतात । जो त्रिभुवनसौंदर्याचा कोंभ दीप्त । भक्तकाजासी करी दास्यत्व । आपुल्या दासाचें प्रेमांगें. ॥ १२ ॥ अनंत अवतारीं अनंत । भक्तरक्षणा सारथी होत । बाप भक्तांचा ऋणाइत । करी सारथ्य पार्थाचें. ॥ १३ ॥ सभाग्य वीरश्रियेचा कांत । जो भवसारथी श्रीअनंत । ध्वजीं शंकर मूर्तिमंत । विजयी पार्थ शोभला. ॥ १४ ॥ वरी शोभती छत्रपताका चामरें । श्वेतगंगेसारिखीं चीरें । भाट गर्जती ब्रीदें गजरें । वाद्यें धुरे वाजती. ॥ १५ ॥ देव इच्छिती पदपद्मधूळी । तो निजकरें पार्थाचे अश्व कवळी, । अधरामृतासी रमा तळमळी । तो मुखीं आकळी वाग्दोरे. ॥ १६ ॥ जें करयुग कुचीं रमेचे । नख उमटती अर्धचंद्रापरींचे । त्या करीं अश्व पार्थरथींचे । थापटी वाचे 'हो! हो!' म्हणूनी. ॥ १७ ॥ राजे आपापुले समभारीं । सिद्ध होऊन चालिले समरागारीं । तेव्हां जन्मेजयो प्रश्न करी । वैशंपायनऋषीप्रती. ॥ १८ ॥ राजा म्हणे, 'जी महामुनी! । श्रीकृष्ण सारथी कैशिया कारणीं । जरी मैत्र तरी पृथक्स्यंदनीं । सन्मानें रणीं पैं जाता.' ॥ १९ ॥ राजयासी म्हणे ऋषी, । 'ते कथा सांगेन तुजसी । ऐकूनी तुझिया प्रश्नासी । आनंद मानसीं हेलावे. ॥ २० ॥ तरी तूं महाविचक्षण होसीं । सादरें ऐक श्रवणीं कथेसी । श्रीकृष्णें सारथ्य करावयासी । कारण त्यासी तें ऐक. ॥ २१ ॥ श्रीकृष्ण आणी नकुळ ते । दोघे गुंतले भाकेतें । कैसे म्हणसी तरी तूतें । तेंही सांगतों राजया! ॥ २२ ॥ मागां विद्याभ्यास करितां निगुती । द्रोणगुरु प्रसन्न नकुलाप्रती । होऊनी शस्त्र माहेश्वरी चक्र निगुतीं । आणी पाशशक्ती दीधली. ॥ २३ ॥ पार्थ आणी तो नकुळ । धनुर्धर विद्ये झाले कुशाळ । धनंजयाहूनी माद्रेय सबळ । शस्त्रा-

स्त्रसाधनीं निपुण. ॥ २४ ॥ तेव्हां नकुळ होय महारथी । जिष्णु मिरवतसे सारथ्ययुक्ती । तेव्हां अजिंक्य सुरासुर दानवांप्रती । इतरां न गणी मानवां. ॥ २५ ॥ तंव धृतराष्ट्रें ठेविलें वारुणावतीं । इतुकियांत आली पितृतिथी । धर्मराजें सहोदराप्रती । आज्ञा केली तें ऐक. ॥ २६ ॥ सहदेवासी म्हणे, 'हस्तिनावती । तुवां जाऊनी सत्वरगती । भीष्म द्रोणादी कुरुवृद्धांप्रती । आणावें पितृतिथीं सर्वांतें. ॥ २७ ॥ पाचारावें कृप विदुरातें । दुर्योधनादी लहानथोरांतें.' । 'अवश्य' म्हणूनी हस्तनापुरातें । गेला तांतडी सहदेव. ॥ २८ ॥ भीमासी म्हणे धर्मराज, । 'द्वारके जाउनी तुवां यदुराज । सकळ यादवांसीं पितृतिथीकाज । सांगूनी सत्वर आणावें.' ॥ २९ ॥ आज्ञा वंदूनी भीमसेन । सत्वरें निघाला द्वारकेलागुन । नमूनी श्रीकृष्ण संकर्षण । सकळ सुहृदजन नमियेले. ॥३०॥ देवें बैसवूनी आसनीं । विचार पुसिला ते क्षणीं । म्हणे, 'कवण कार्य योजुनी । आलां आम्हांलागुनी तें सांगें.' ॥३१॥ भीम म्हणे, 'जी श्रीपती ! । आमंत्रण धर्मे तुम्हांप्रती । सर्वांसि सांगून पितृतिथी । बोलाविलें निश्चिती पैं आतां.' ॥३२॥ मग हांसूनी बोले श्रीयदुपती, । 'कवण पित्याची वाढितां तिथी ?' । ऐसें विनोदार्थ बोलूनी पुढती । हास्य करीत तेथवां. ॥ ३३ ॥ तें ऐकून भीमसेन । क्रोधा चढून बोले वचन, । म्हणे, 'तुजही पिते दोघेजण । जाणूनी कां नेणेंची ॥ ३४ ॥ आणी खिल्लारी नंदाचा । आणी आम्हां म्हणसी कवण पित्याचा ?' । तेव्हां श्रीकृष्ण म्हणे, 'उपहासोनी वाचा । बोलिलासी मज कैसी ? ॥ ३५ ॥ आतां मी न येतसें तिथीसी । जाऊनी सांगें धर्मासी' । गदा घेऊनी अतिवेगेंसी । वारणावतीसी पातला. ॥ ३६ ॥ धर्मा म्हणे, 'न येत श्रीकृष्ण' । सकळ निवेदूनी वर्तमान. । ऐकूनी धर्म बोले वचन । पार्थाकारणें ते काळीं. ॥ ३७ ॥ म्हणे, 'जाऊनी द्वारकावती । सन्मानें आणावा श्रीपती । विवाद न करितां पितृतिथी । जाणूनी कार्यार्थी आपुल्या.' ॥ ३८ ॥ मग पार्थं द्वारावतीसी । जाऊनी पाचारिलें श्रीकृष्णासी । म्हणे, 'स्वामी ! पितृतिथीसी । आलें पाहिजे मजसंगें. ॥ ३९ ॥ धर्मराजें स्नेहादरें । बोलाविलें जी ! निर्धारें । रुसणें टाकूनी सत्वरें । वारणावती चालिजे.' ॥ ४० ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'कैसें आमंत्रण ? । रुसूनी गेला कां भीमसेन ? । तरी मी नयें तेथें जाऊन । सांग धर्मासी आतांची.' ॥ ४१ ॥ आंत राखूनी मोह वरी । जननी बाळकासी क्रोध करी । तैसाची श्रीकृष्ण 'पांडवांतरी । पाहूं निर्धारी पुरुषार्थ' म्हणे. ॥४२॥ 'हे पुरुषार्थी कीं कवण' ते स्थिती ।

पाहावयासी मनीं कल्पिली युक्ती । मग धिक्कारूनी म्हणे **पा**र्थाप्रती. । 'तूं जाय निश्चिती, मी नये.' ॥ ४३ ॥ ऐसें ऐकूनी श्री**कृ**ष्णवचन । **ध**नंजय गेला परतून । **ध**र्मराजासी वर्तमान । सांगून 'श्री**कृ**ष्ण न ये' म्हणे. ॥ ४४ ॥ **ध**र्मासी अंतरीं कळली खुण । कीं श्री**कृ**ष्ण पाहे आंगवण । तरी संतोष करूनी त्याचें मन । आणूं ऐसें विचारीत. ॥ ४५ ॥ तेव्हां **न**कुळासीं म्हणे पाचारून. । 'ऐकें माझें आज्ञावचन । तुवां तत्काळ लगबगें जाऊन । **द्वा**रावतीलागुन आतांची. ॥ ४६ ॥ श्री**कृ**ष्ण **या**दवांसहित । सामोपचारें बोलवावा येथ । न यें म्हणेल तरी बळें निश्चित । आणावा त्वरित उदइक. ॥ ४७ ॥ परंतु आपुलिया कार्याकारण । सौम्यत्वें आणिजे श्री**कृ**ष्ण । न यें म्हणेल तरी निर्वाण करून । सत्वर मजलागुन आणावा. ॥ ४८ ॥ तरीच तुझा पुरुषार्थ । मुरासुर वर्णितील यथार्थ.' । ऐकूनि **मा**द्रीचा ज्येष्ठसुत । धनुष्य कवळीत निजमुष्टी. ॥ ४९ ॥ **ध**र्मासि करूनि नमस्कार । रथीं बैसला **मा**द्रीकुमर । मनीं म्हणे, 'श्री**कृ**ष्ण **य**दुवीर । आणीन सत्वर पुरुषार्थें.' ॥ ५० ॥ ऐसा प्रताप मनीं धरुन । आवेशें जाय **द्वा**रावतीलागुन । मार्गीं जातां विजय शकुन । झाले सूचना ते काळीं. ॥ ५१ ॥ सत्वर पावला **द्वा**रकावती । श्री**कृ**ष्णा म्हणे, '**वा**रुणावती । **ध**र्में तुम्हांसीं निश्चिती । बोलाविलें तिथी पितरांच्या. ॥ ५२ ॥ उदईक श्राद्ध म्हणूनी । **भीमा**र्जुना पाठविलें परतूनी । मग मजला आज्ञा वचनीं । केली तुम्हांकारणें न्यावया.' ॥ ५३ ॥ श्री**कृ**ष्ण म्हणे, '**वा**रुणावतीं । नाहीं कारण जाण निश्चिती । न येउं म्हणूनि **ध**र्माप्रती । माझी वचनोक्ती सांगावी.' ॥ ५४ ॥ **न**कुळें ऐकूनि श्री**कृ**ष्णवचन । क्रोधें क्षोभला जैसा अग्न । म्हणे, '**ध**र्में सामोपचारें आमंत्रण । करितां अजून न जासी. ॥ ५५ ॥ तरी नेइन मी बळेंकरुन । तुझा समूळ झाडूनि अभिमान.' । ऐकतां क्षोभला **य**दुनंदन । म्हणूनि रण माजविलें. ॥ ५६ ॥ वेगा येऊनि बाहेरी । दोघे उठिले झुंझारी । सकळ **या**दव ते अवसरीं । युद्धासीं समरीं पैं आले. ॥ ५७ ॥ श्री**कृ**ष्ण म्हणे, 'हस्त आकर्षुन । **न**कुळासि आणा रे! बांधून.' । समस्त**या**दवीं ऐकूनि वचन । खवळले संपूर्ण ते काळीं ॥ ५८ ॥ बाण त्रिशूळ कोंतीयाळें[1] । तोमर गदा खकु(?)शूळें । **न**कुळावरी वर्षती बळें । परी तो नाकळे कवणासीं. ॥ ५९ ॥ **सा**त्यकी **कृ**तवर्मा **ग**द **सा**रण । अवघे टाकिती निर्वाण बाण । मग **न**कुळें धनुष्य चढवून । खेंचरास्त्र मंत्रून स्थापिलें. ॥ ६० ॥ तो बाण सोडितांचि जाण । एकापासूनि होती द्विगुण । द्विगुणाचे होती चौगुण । बाणें बाण

१. शस्त्रविशेष.

३ शु० क० म० भी०

पें होती. ॥ ६१ ॥ ऐसी बाणवृद्धी होतां । द्वारका व्यापिली क्षण न लगतां । आकाश भूमींतूनि तत्वता । सव्यापसव्य शर येती. ॥ ६२ ॥ अचुक यादवांसी भेदिती । जैसे वारुळीं सर्प निघती । उरीं शिरीं लागतां क्षितीं । पडूनि आरंबळती यादव. ॥ ६३ ॥ यादवांचे सकळही बाण । निरसूनि वर्मी भेदिती कठीण । तेणें यादव हाका फोडून । पळती रण टाकुनी. ॥ ६४ ॥ बाणमय झाली द्वारावती । 'मांडलें महाविघ्न' सर्वेही म्हणती । सांब गद निशठादी प्रद्युम्न क्षितीं । थारों न शकती महाशूर. ॥ ६५ ॥ सात्यकी कृतवर्मादि यादव । रणीं पळती सांडून शस्त्रहाव । तें पाहूनियां बळदेव । पातला नांगर मुसळ घेउनी. ॥ ६६ ॥ सर्वेचि सांडूनि तीक्ष्ण बाण । चूर्ण करूनि टाकिलें मुसळ जाण । नांगर हातींचाही छेदून । समुद्रजीवनीं टाकिला. ॥ ६७ ॥ अपमानला कामपाळ[1] । म्हणे, 'हा अवघा श्रीकृष्णाचा खेळ.' । तंव आवेशूनि श्रीगोपाळ । चक्र तेजाळ सोडिलें. ॥ ६८ ॥ नकुळें चक्र देखिलें येतां । तों माहेश्वर सोडी धगधगीतां । सुदर्शन बांधूनि तत्वतां । आणिलें हातां नकुळें रणीं. ॥ ६९ ॥ चक्र पावलें नकुळाजवळी । उगाचि पाहे वनमाळी । तेव्हां नकुळें वरुणपाशीं ते काळीं । बाणें रथासीं बांधिलें. ॥ ७० ॥ अश्व हाकूनि निश्चितीं । घेऊनि चालिला वारणावती । तंव अकस्मात गगनपंथीं । नारदमुनी पातला. ॥ ७१ ॥ नमस्कारिलें दोघींजणीं । तों नारद बोले तयांसी ते क्षणीं । म्हणे, 'किमर्थ संग्राम मांडूनी । युद्ध केलें मज सांगा.' ॥ ७२ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'यांची आंगत्रण । म्यांचि करूनि पाहिलें रण, । शूर आणीक नसती कोण' । ऐसें जगजीवन बोलिले. ॥ ७३ ॥ नकुळें सांगूनि विचार । म्हणे, 'पितृतिथी उद्यां साचार । म्हणूनि धर्मराजें यदुवीर । आंवतिला भोजना. ॥ ७४ ॥ प्रथम पाठविलें भीमातें । तयामागूनि पाठवी पार्थातें । दोघांसी न मानूनि परतें । धिक्कारिलें स्वामिया. ॥ ७५ ॥ मग मातें केली धर्मराजें आज्ञा, । 'सामोपचारें बोलावीं यादवराणा । न येईल तरी पुरुषार्थें रणा । जिंकूनि बळें आणिजे.' ॥ ७६ ॥ ऐसी मजला केली आज्ञा । सौम्यत्वें पाचारिलें यदुनंदना । नायकूनि आला रणा । गर्वें सेना घेउनी. ॥ ७७ ॥ यया श्रीकृष्णाचा गर्वाभिमान । खंडूनि नेतों धर्माकारण । धर्माज्ञा तेंचि प्रमाण । म्हणूनि बंधन पैं केलें. ॥ ७८ ॥ सन्मानें नये म्हणूनि आतां । अपमानें नेतों श्रीकृष्णनाथा, । यांत अन्याय मुनिनाथा ! । काय तो

[1]. बळराम.

आमुचा सांगिजे.' ॥ ७९ ॥ ऐकूनि **न**कुळाचें वचन । **ना**रद करी हास्य-वदन. । म्हणे. '**न**कुळा! सांगतों खुण । भक्तभूषण हा **ह**री. ॥ ८० ॥ तरी तुमचा जिवलग श्री**कृ**ष्ण । श्री**कृ**ष्णाचे तुम्हीही पंचप्राण । ऐसें असतां तुवां **य**दुनंदन । अपमानें न न्यावा मज वाटे.' ॥ ८१ ॥ मग बोले श्री**कृ**ष्णनाथ. । 'म्यां पाहिला याचा पुरुषार्थ । म्हणूनि यासी म्यांचि परत । न यें म्हणूनि पाठविलें. ॥ ८२ ॥ ऐकें **ना**रदा! निर्धारीं । भक्ताधीन मी परोपरी । **पां**डव पुरुषार्थी कीं कैसे परी । पाहिलें समरीं विंदाण.'[1]॥ ८३ ॥ सवेंचि **न**कुळासी **ह**री बोले. । म्हणे. 'तूं नरकेसरी हें कळलें । यालागीं संतोषलों ये वेळे । अतुळ बळें तूं एक. ॥ ८४ ॥ तरी तूं मागसी तो एक वर । कृपेनें देईन हा निर्धार.' । **न**कुळ म्हणे. 'ऐसा विचार । नकळे मजला श्री**कृ**ष्णा! ॥ ८५ ॥ म्यां जिंकूनियां नेतों तुतें । असतां म्हणे वर माग मातें । तरी तुवां मागावा कीं मातें । देईन निश्चितें तेथेंची.' ॥ ८६ ॥ ऐकूनि **न**कुळाचें वचन । श्री**कृ**ष्ण बोले त्याजकारण. । म्हणे, 'तुवां आजिचेन । युद्ध कोणासी न कीजे. ॥ ८७ ॥ आणी आज्ञेवीण शस्त्र । तुवां न धरावें निःशेष । हा वर देऊनि संतोष । करीं मातें ये क्षणीं.' ॥ ८८ ॥ ऐसा वर मागतां **न**कुळासी । **न**कुळ म्हणे. 'आपुले मानसीं । श्री**कृ**ष्णें बांधिलें वचनपाशीं । तरी जीवें यासीं गुंतवावें. ॥ ८९ ॥ आम्ही दोघे धनुर्धर । मी आणि **पा**र्थ वीर । माझे युद्धाचा याणें विचार । येथूनि अडविला निर्धारें.' ॥ ९० ॥ मग **न**कुळ म्हणे श्री**कृ**ष्णासी, । 'तुझा वर देइं मजसीं.' । मग तो भक्तभूषण **हृ**षीकेशी । 'इच्छितें माग देतों' म्हणे. ॥ ९१ ॥ **न**कुळ म्हणे, 'श्री**कृ**ष्णनाथा! । तुवां युद्ध न कीजे कोणासि आतां । **पा**र्थरथासी सारथी तत्वतां । येथूनि होणें श्री**कृ**ष्णा! ॥ ९२ ॥ **पा**र्थ होईल महारथी । तुवां सारथ्यें रक्षिजे निगुतीं । उपेक्षा न कीजे कल्पांतीं । भाक प्रमाण देउनी.' ॥ ९३ ॥ ऐकूनि **न**कुळाचें वचन । श्री**कृ**ष्णें दीधली भाक प्रमाण । यासी साक्षी **ब्र**ह्मनंदन । **ना**रदस्वामी दोघांतें. ॥ ९४ ॥ मग **न**कुळवीरें दारुण पाश । छेदूनि मुक्त केलें श्री**कृ**ष्णास । धनुष्यसहित बाणास । श्री**कृ**ष्णचरणीं अर्पिलें. ॥ ९५ ॥ सन्मानें घेऊनि श्री**कृ**ष्णातें । **न**कुळ आला **वा**रणावतातें । भेटूनियां **ध**र्मराजातें । सकळ वृत्तातें निवेदिलें. ॥ ९६ ॥ मग आनंदूनि **ध**र्मराव । श्री**कृ**ष्णास भेटले **पां**डव । करूनि बहुत गौरव । पितृतिथी सारिली. ॥ ९७ ॥ याकारणें करूनी । भाकेसि गोविला **च**क्रपाणी । तो भक्तभूषण भक्ताभिमानी । सारथी झाला **पा**र्थाचा. ॥ ९८ ॥

१. हुशारी. विंदाण=चांचणी पाहणें, कसास लावून पहाणें.

**अर्जुन** तो स्वयें **नरा**वतार । **ना**रायण तोचि श्री**कृ**ष्ण **य**दुवीर । दोघे ऐक्य-रूपें साचार । भेदविचार तेथ नसे. ॥ ९९ ॥ आणि सख्यभक्ति **जि**ष्णूची । नवविध भक्तींत उक्त साची । असे राजया! सारथी होणेची । श्री**कृ**ष्णें भाक दीधली. ॥ १०० ॥ त्याही वरी **सु**भद्रा बहीण । **अ**र्जुनासी दीधली प्रीती-करून । तेणें प्रीति आमता झाली दूण । **ध**र्मासि पालनकर्ता तो. ॥ १०१ ॥ ते अवतार पुरुष दोघे अवतरले । भूभार उतरिला निजबळें । यालागीं श्री**कृ**ष्णें सारथ्य केलें । स्वयें आपण' मुनी म्हणे. ॥ १०२ ॥ ऐसें मागील कथानक । तुवां पुसिलें म्हणूनि देख । कथा चालिली महारसिक । सादर तुवां ऐकिली जे. ॥ १०३ ॥ मागील कथेचा अभिप्राव । तेथें मधें पूर्वपक्षाचा ठाव । झाला तो होऊनि संदेह । करावया कथार्थ राहिला. ॥ १०४ ॥ दीर्घ दृष्टीच्या तेजेंकरून । कथार्थ विलोका श्रोतेजन । **कौ**रव **पां**डव **कु**रुक्षेत्रासि सैन्य । समभारें करुनी पावले. ॥ १०५ ॥ दळपती[2] **भी**ष्म **कौ**रवांत । **पां**डव-दळीं दळपती **द्रु**पदसुत. । विभु रचूनि सैन्य रचित । **भी**ष्म **धृ**ष्टद्युम्न दों भागीं. ॥ १०६ ॥ वाद्यगजरें करून । ब्रह्मांड दुमदुमिलें संपूर्ण । कंपित शैल शिखरें होउन । कोसळुनी पडती खालुती. ॥ १०७ ॥ त्या अनेकवाद्य-नादेंकरुन । प्रळय भावित त्रिभुवन । शेष कूर्म वराह भीतमान । झाले तेव्हां सर्वही. ॥ १०८ ॥ सप्तसमुद्रांचीं नीरें । तप्त होऊनि एकसरें । धराभार धराधरें । टाकूं म्हणे क्षणक्षणा. ॥ १०९ ॥ नवखंड सप्तद्वीपा वसुमती । वरी राहती अनेक जीवयाती । स्थिरचर सप्त स्वर्गावरौती । प्रळय भाविती ते क्षणीं ॥ ११० ॥ तया गजरेंकरून । बधिरत्व पावलें त्रिभुवन । सरिता ओहळाचें जीवन । आटलें तेव्हां सर्वही. ॥ १११ ॥ दोहीं दळीं एकमेकां दृष्टी । होतां झालें सुखसंतुष्टी. । जयजयकारें सकळ सृष्टी । गाजविली महा-शूरीं. ॥ ११२ ॥ युद्ध आवांका समान । दोहीं दळीं आनंदघन, । **भी**ष्मबळें **दु**र्योधन । परसैन्य नाणी दृष्टीसी. ॥ ११३ ॥ **अर्जुन म्हणे मानसीं,** । 'सारथी असतां हृषीकेशी । महाकाळ आलिया रणासी । निजबाणें **फोडीन** सामर्थ्यें. ॥ ११४ ॥ आणि **कौ**रव वीर जे सकळ । जे कां पुरुषार्थी नृपाल । यांसीं **य**मराष्ट्रासी एकवेळ । पाठवीन सामर्थ्येंकरूनि.' ॥ ११५ ॥ ऐसें **अर्जु**नाचें मनोगत । जाणूनि बोले श्री**कृ**ष्णनाथ. । म्हणे, 'सखया! बोल निश्चित । सैन्य किती दिवसां मारिसी?' ॥११६ ॥ **पा**र्थ म्हणे, 'तुझ्या कृपेंकरून । सैन्य माराया न लगे क्षण । सामान्य झुंजतां प्रतिदिन । क्षोणी मारीन निश्चयें.

१. वैशंपायन. २. सेनापती.

॥ ११७ ॥ ऐकूनि अर्जुनाचे बोल । पाठी थापटी घननीळ । गौरव शब्दें श्रीगोपाळ । अर्जुनासी करीतसे. ॥ ११८॥ मग बोले अर्जुन, । 'कर्ता करविता जनार्दन. । तुवांची मांडिला हा संपूर्ण । कौरवपांडवखेळ कीं. ॥ ११९॥ निमित्त करुनी आमुचें । सूत्र हालविशी विश्वाचें । जन्मेजयासी म्हणे साचें । अर्जुनें वाचे बोलिलें. ॥ १२० ॥ आतां क्षत्रियधर्मकथन । रणीं सांगेल गंगानंदन । त्या कथेसी श्रोतीं अवधान । द्यावें म्हणे शुभानंद. ॥ १२१ ॥

## अध्याय पांचवा.

कुरुक्षेत्रामाजी सबळें । सिद्ध असती दोनी दळें । जैसे अग्नीचे कल्होळें । खांडवदहनीं न उठिले. ॥ १ ॥ व्यूहरचनेची रचना । धृष्टद्युम्नें रचिली सेना । प्रथम पदाती दुर्ग नाना । यंत्रमार वरी जोडिले. ॥ २ ॥ तयामागें अश्वस्वार । सकळ सामग्रीसीं महाशूर । बोंबर झोंठी सोडिल्या थोर । मुकुट अपार बहुरंगी. ॥ ३ ॥ कवचें बाणलीं निजांगीं । करीं आयुधें शूळ खड्गीं । असिलता दुधारा झळकती स्वर्गी । देव विमानें पळविती. ॥ ४ ॥ जैसे गिरिवराजवळी गिरिवर । तैसे अनेक कुंजरांचे भार । सुवर्णझूलिया विचित्रवर । शोभती नेपुर चतुष्पदीं. ॥ ५ ॥ तयामागें महारथी । त्यावरी विक्रमी नृपती । चारी दिशा व्यापूनि क्षिती । सिद्ध झाले संग्रामा. ॥ ६ ॥ जैसें कां पूर्णिमेसी । भरतें दाटे सागरासी । लहऱ्या धांवती आवेशीं । जळ आकाशीं पैं उसळे. ॥ ७ ॥ हस्तीप बैसले हस्तीवरी । सूत्रयंत्रास्त्रशस्त्रसामग्री । पुढां अंकुश घेऊनि करीं । कुशाळ महावत बैसले. ॥ ८ ॥ स्वार बैसले अश्वांवरी । दिव्य

१. शुभानंदकृत भीष्मपर्वांतील पहिल्या चार अध्यायांतील कथाभाग मूळ महाभारतांतील भीष्मपर्वांत नाहीं. ह्या चार अध्यायांत श्रीकृष्ण आणि पार्थ यांचें रणभूमिपरीक्षण, एका कुणब्याची कथा, बभ्रीची उत्पत्ति, मारुतीचा गर्वभंग, बर्भ्राचा भीमहस्तें वध, बळभद्रकृत ब्रह्महत्या, त्या पापाच्या क्षालनार्थ बळभद्राचें भूप्रदक्षिणार्थ प्रयाण, पितृतिथीस श्रीकृष्णास आणण्यासाठीं धर्माज्ञेवरून नकुळाचें द्वारकेस गमन, नकुळश्रीकृष्णयुद्ध, श्रीकृष्णबंधन, नारददर्शन, पार्थाचें सारथ्य करण्याविषयीं श्रीकृष्णाचें नकुळास वचन, युद्ध न करण्याविषयीं उलट नकुळाचें वचन, इत्यादि गोष्टी शुभानंदानें वर्णिल्या आहेत. त्या मूळांत नाहींत. मूळांतील जंबूखंडविनिर्माणपर्व आणि भूमिपर्व मिळून १२ अध्याय आहेत. १३ व्या अध्यायापासून भगवद्गीतापर्व लागतें. १३ ते २२ अध्यायापर्यंत सेनावर्णन, व्यूहरचना वगैरे हकीकत आहे ती शुभानंदानें पांचव्या अध्यायांत त्रोटक परंतु चटकदार दिली आहे. मूळांतील अध्याय २३ यांत दुर्गास्तवन आहे. शुभानंदानें हें दुर्गास्तवन पांचव्या अध्यायांत ६२ व्या ओवीपासून दिलें आहे. येथून मूळ भीष्मपर्व आणि शुभानंदाचें भीष्मपर्व यांची सांगड बरोबर जुळते. २. मोकळे केस सोडलेले; अस्ताव्यस्त केस सोडलेले.

शस्त्रें घेऊनियां करीं । अश्व गमनीं वायुसरी । न पवे ऐसे चवताळले. ॥ ९ ॥ वीर उद्भटपायांचे महाबळी । भ्यासुर तेजशस्त्रें झळाळी । करीं घेऊनि रणमंडळी । आनंदें गर्जती एकदां. ॥ १० ॥ ऐसें पांडवसैन्य रचिलें । धृष्टद्युम्नें ठाण मजिलें । हें दुर्योधनें पाहिलें । करी वहिलें आश्चर्य. ॥ ११ ॥ भीष्माचार्यासीं सांगत. । 'युद्धारंभासीं पांडव उदित । आमुचे सैन्यासी जेथतेथ । योजूनि ठेवावें विभूसी.' ॥ १२ ॥ अकरा क्षोणी सैन्य । सेनापती गंगानंदन । बावीस महारथी गहन । त्यांत दोघेजण चिरंजीव. ॥ १३ ॥ दोघे इच्छामरणी वीर । अनेक बलाढ्य नृप शूर । धृतराष्ट्र आणि विदुर । हस्तनापुरीं हे दोघे. ॥ १४ ॥ ल्हान थोर कुरुक्षेत्रासी । अनेक राजे स्वसैन्येंसीं । येऊनि व्यूह रचिला देवांसी । अटक सकळांसी भेदावया. ॥ १५ ॥ अकरा अक्षौहिणी सेना । पसरली जैसी भूरजें जाणा । नातरी उल्हासतां समुद्रजीवना । कोण आवरूं शकेल? ॥ १६ ॥ रजें उसळती आकाशीं । दिवसा वाटली निशी । वीर धांवती आवेशीं । मेघ गगनीं ज्यापरी. ॥ १७ ॥ त्यांत महारथी कोण कोण । तेही ऐकें रांया! सावधान । समरीं महाकाळ करिती चूर्ण । पराक्रमें आपल्या. ॥ १८ ॥ भीष्म प्रथम द्रोण कर्ण । शकुनी कपटी जाण । कृतवर्मा जयद्रथ गहन । धृतराष्ट्रजामात होय तो. ॥ १९ ॥ भूरिश्रवा आणि बाल्हिक । भगदत्त सोमदत्ती देख । शशबिंदु कृपाचार्य निःशंख । अश्वत्थामा चिरंजीवी. ॥ २० ॥ वृषसेन आणी सुशर्मा । विकर्ण कलिंग तांब्र अनामा । मद्रराज शल्यनामा । महापराक्रमी बळियाढा. ॥ २१ ॥ दुःशासन आणि चित्रसेन । मुख्य राजा दुर्योधन । ऐसे बावीस रथी महागहन । सामग्रीसीं सिद्धले. ॥ २२ ॥ याही विरहित अन्य नृप शूर । समर्यीं बोलिजेत विस्तार । जे रणशौर्य महावीर । युद्धविशारद पंडित पैं. ॥ २३ ॥ सिद्ध शस्त्रास्त्रें प्रज्वलित । कवचकुंडलमुकुटविराजित । नाना अळंकार लेऊनि मंडित । रणनोवरे रणांगणीं. ॥ २४ ॥ हस्ती शूर अश्व शूर । रहंवरीं शोभती महावीर । शस्त्रें मंडित दिव्य कर । महाभ्यासुर परसेने. ॥ २५ ॥ पायदळाची मांडणी । यंत्रमारीं जोडिले तेक्षणीं । त्यांत वाद्यें अनेकध्वनी । तेणें अवनी नादवली. ॥ २६ ॥ जैसी वर्षाऋतुकाळीं । जान्हवी यमुनाजळातें कवळी । कीं वडवानळ सागरातें गिळी । तैसे पांडवाजवळी पैं आले. ॥ २७ ॥ हेमंतऋतुप्रथममासीं । मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशी । यमनक्षत्र लागलें ते दिवसीं । कौरवीं युद्ध आरंभिलें. ॥ २८ ॥ दोनी सेना दोभागीं अद्भुत । मध्यें भीष्में उभा केला

१. उत्तम. २. ठिकाण, जागा, नेम मारण्यासाठीं रोखलेली जागा. ३. जनमेजया. ४. भरणी.

रथ । हस्तसंकेतें वाद्यें राहवीत । रणभूमीस ते काळीं. ॥ २९ ॥ दोनी दळांसी विलोकुन । म्हणे, 'ऐका हो! क्षत्रियवीर! निपुण.' । तेव्हां **कौ**रव **पां**डव तटस्थ होउन । ऐकती गहन **भी**ष्मबोल. ॥ ३० ॥ म्हणे, 'युद्धसमयींच करावें वैर । शिबिरा गेलिया मग निर्वैर । सेनेंत हिंडावें निःशस्त्र । भय मनीं सांडुनी. ॥ ३१ ॥ कितेक राजे सेनेसहित । भोवतें युद्धकौतुक विलोकित । त्यांवरी जाऊनि शस्त्रघात । सहसाही न करावा. ॥ ३२ ॥ पळे तयातें न मारावें, । शस्त्रें टाकी त्यासि रक्षावें, । शरण आलियासीं पाळावें, । एकावरी न जावें बहुतीं. ॥ ३३ ॥ उपचार घेऊनि तांबूलादि उदक । हिंडती मध्यें जे कां सेवक । त्यांसी न मारावें [१]निःशेख । ऐका समस्त क्षत्रधर्म. ॥ ३४ ॥ वार्तीक हेर येत जात देख । सूत्रधारी लोहकर्मकारक । भूमी समान कर्ते खनक । न मारावें तयां कदांही'. ॥ ३५ ॥ वरी हस्त करूनि **गं**गानंदन । आणि 'ऐका' म्हणे. संपूर्ण । **पां**डवदळींचे वीर, सावधान । ऐकती नृपनंदन सर्वही. ॥ ३६ ॥ म्हणे, 'माझा **भी**ष्माचा नेम निश्चिती । नित्य मारीन दहासहस्त्र रथी । निर्वीर करीन सकळ क्षिती । स्वसामर्थ्येंकरूनियां. ॥ ३७ ॥ **द्रो**णाचार्य **कृ**पाचार्य । **क**र्ण **अ**श्वत्थामा हे बळार्य । ऐसे अनेक रणपंडित प्रतापसूर्य । दळसहीत तुम्हां आटिती. ॥ ३८ ॥ तरी आम्हांकडे जे कोणी येणार । त्यांणीं आतांच यावें सत्वर.' । **पां**डवदळींचे ऐकूनि महाशूर । नेदिती उत्तर सर्वही. ॥ ३९ ॥ मग आपुल्या सैन्याकडे पाहून । बोले **शं**तनुनंदन, । म्हणे, 'जिकडे असे **कृष्णा**र्जुन । जयलाभ तिकडेचि निश्चयें. ॥ ४० ॥ विजय चाप विजय तूणीर । विजय ध्वज विजय **वा**युकुमर । विजय रथावरी विजय वीर । विजय देणार श्री**कृ**ष्ण तेथें. ॥ ४१ ॥ **भी**मसेनाची ऐकतां हाक । चळचळां कांपती तिनी लोक । गदाघायें सेना सकळिक । निवडील निश्चयें हा जाणा. ॥ ४२ ॥ **ध**र्म तपस्वी सत्यपरायण । नयनें पाहिल क्रोधेंकरून । सर्व पृतना जाळील पूर्ण । **उ**मारमण दुसरा जो. ॥ ४३ ॥ तैसेच **स**हदेव आणि **न**कुळ । उताविळे पाहती युद्धकाळ । **सौ**भद्र **सा**त्यकी प्रत्यक्ष काळ । सकळ दळ नेदिती उरूं. ॥ ४४ ॥ **द्रु**पद **पां**चाळादि महारथी । ऐसा जय **पां**डव लाधती । कोणी जाणार ते ऐका नृपती । त्वरित गती जावें आतां.' ॥ ४५ ॥ तों **यु**युत्सव **धृ**तराष्ट्रनंदन । जो वेश्येउदरीं पावला जनन । जो कां आगळा एक शताहून । उठोनियां तो चालिला. ॥ ४६ ॥ निजसेनेसहित जात । देखूनि **सु**योधन संतप्त । मग बोलिला **गं**गासुत, । 'तूं कां व्यर्थ राहविसी त्या?' ॥ ४७ ॥

---

१. अगदीं. २. बातमी पोंचविणारा; हेर. ३. भाला.

आपणाकडे आला **युयुत्सव** । जाणूनि तोषले पांचही **पांडव** । गजाखालीं उतरूनि **धर्म**राव । भेटूनि तया गौरविलें. ॥ ४८ ॥ **धर्म** बोले प्रिय वचन. । 'संकटीं बंधू! आलासि धांवून । तूं मज आवडसी प्राणाहून.' । ऐकूनि **युयु**त्सव तोषला. ॥ ४९ ॥ असो. यावरी **भीष्म** महाबळी । जेणें दहा दिवस सेना रक्षिली । **दुर्योधनें** सैनिकां आज्ञा केली । 'नृपवरीं रक्षावें **भीष्मा**तें. ॥ ५० ॥ **शि**खंडीसी धरा अवघेजण । अथवा सत्वर टाका मारून । **दे**वव्रत त्यावरी न टाकी बाण । स्त्री म्हणूनि पूर्वी तो.' ॥ ५१ ॥ इतुकें **दुर्योधन** आज्ञापित । तों दोन्हीदळीं वाद्यघाय बहूत । वीर वाहनारूढ होऊनि अद्भुत । संग्राम सिद्ध करूं भाविती. ॥ ५२ ॥ शशिवदना भेरी धडकत । दुंदुभी वाजल्या बहूत । मुरगें उरगें असंख्यात । नाहीं अंत पणवासी. ॥ ५३ ॥ फुटलें जैसें समुद्रजळ । तैसे गज अश्व रथ पायदळ । हाके फोडिती ब्रह्मांडगोल । तेणें भूगोल डळमळी. ॥ ५४ ॥ जैसा उगवला **सूर्य**नारायण । त्यासमचि भासे **गं**गानंदन । दूरीं विलोकूनि वीर **कर्ण** । 'सांभाळु नेमवचन आपुलें' म्हणे. ॥ ५५ ॥ '**भीष्मा**चा जों होय अंत । तोंवरी मी न जाय कदा युद्धांत.' । असो; देव ऋषी समस्त । कल्याण वांछिती **पां**डवां. ॥ ५६ ॥ महारथी वीर समस्त सादर । **भीमा**चे पाठीसी उभे दुर्धर । वज्र व्यूह दृढ साचार । रचिला असे **धृष्टद्युम्नें**. ॥ ५७ ॥ मध्यभागीं **युधिष्ठिर** । जैसा भगणें[2] वेष्टित रोहिणीवर. । कीं निजकिरणीं वेष्टिला भास्कर. । नातरी देवीं **शक्र** जयार्ती. ॥ ५८ ॥ दोहीं दळींची अपार धुळी । गेली ऊर्ध्व गगनमंडळीं । निबुंजले पक्षी सकळीं । वायुही फिरूं न लाहे. ॥ ५९ ॥ **कौ**रवांसी अपशकुन जाणा । अकल्याण सुचविती क्षणक्षणा । विजय कल्याण **पं**डुनंदना । शकुन चिन्हें सुचविती. ॥ ६० ॥ केवळ देवांऐसी सेना । **पां**डवांची दिसों लागली नयना । दैत्यराक्षसऐसी **कौ**रवपृतना । मलीन तेजहीन पैं दिसे. ॥ ६१ ॥ [3]**के**शव म्हणे. '**कि**रीटी! ऐकें । शुचिर्भूत होऊनि देखें । दुर्गास्तवन करितां सौख्यें । जयलाभ निके तेणें तुम्हां.' ॥ ६२ ॥ मग हस्त पाद प्रक्षाळुन । कर जोडूनि ठाके उभा **श्वे**तवाहन । करीत **दु**र्गेचें स्तवन । तेणें प्रसन्न **अं**बा होय. ॥ ६३ ॥ जयजय **दुर्गे**! **आ**दिजननी! । **भ**यच्छेदके! **व**रदायिनी । **भव**प्रिये! **भ**यमोचनी! । राखें समरंगणीं आम्हातें. ॥ ६४ ॥ **इं**द्र **उ**पेंद्र आणी **क**मळासन । **शि**वे! करिती तुझें चिंतन । ऋषिगण गंधर्व मानव जाण ।

---

१. वाद्यविशेष. २. नक्षत्रसमुदायानें. ३. 'शुचिर्भूत्वा महाबाहो संग्रामाभिमुखे स्थितः । पराजयाय शत्रूणां दुर्गास्तोत्रमुदीरयः ॥' महाभारत–अ० २३ श्लो० २.

तुझेचि स्तवनें यशस्वी. ॥ ६५ ॥ अनंततरणी दिव्य पंक्ती । तव प्रभेमाजी गुप्त होती । प्रणवरूपिणी! मूळस्फूर्ती! । त्रिपुरसुंदरे! जगदंबे!' ॥ ६६ ॥ ऐसें ऐकतां स्तवन । देवी अंतरिक्ष बोले वचन, । 'तुज साह्य मी आणि श्रीकृष्ण । रक्षूं सर्वदां रणांगणीं.' ॥ ६७ ॥ ऐसी होतां वरदवाणी । आनंदला पार्थ आपुल्या मनीं । नमस्कारूनि श्रीकृष्णचरणीं । रथासमीप पैं आला. ॥ ६८ ॥ मग रथारूढ झाला सुभद्रावर । सारथी पुढें भुवनैकसुंदर । अंजनीहृदयारविंदभ्रमर । ध्वजीं भुभुःकारे सैत्राणें. ॥ ६९ ॥ भोंवतीं भूतांनीं आरोळी । फोडिली तेव्हां ते काळीं । ऐकतां कृतांत कांपे चळीं । आकाश तळीं पडे वाटे. ॥ ७० ॥ तेव्हां धृतराष्ट्र म्हणे संजयासी, । 'काय विचार घडला रणासी । तो सांगें तेंचि परियेसी । जन्मेजया! सुजाणा! ॥ ७१ ॥ ऐसा झाला क्षत्रधर्म । जो कां कथी महाराज भीष्म । यापुढें गीतार्थ पुरुषोत्तम । पार्थाप्रती कथिजेल. ॥ ७२ ॥ प्रभुविश्वंभरप्रसादें । श्रोते ऐकोत प्रेमानंदें । गीता उपदेशिजे गोविंदें । ऐकतां मतिमंदें उद्धरती. ॥ ७३ ॥ पुढिले अध्यायीं ज्ञानोपदेश । पार्थासी करील हृषीकेश । शुभानंद विनवी श्रोतयांस । ऐकिजे गीतार्थास आदरें. ॥ ७४ ॥ इति श्रीमन्महाभारत । भीष्मपर्व रसाद्भुत । ऐकतां ब्रह्महत्यातीत । अंतीं मुक्त करी हरी. ॥ ७५ ॥

---

## अध्याय सहावा.

वैशंपायनासी म्हणे नृपती, । 'देवी स्तवूनि सुभद्रापती । स्यंदनारूढ आनंदवृत्ती । काय करिता झाला पुढें. ॥ १ ॥ तें सविस्तरेंकरूनि कथन । निवर्वी माझे तृषित श्रवण.' । ऋषी म्हणे, 'सादर श्रवण । करूनि ऐकें राजया! ॥ २ ॥ गीतोपदेश अर्जुनासी । करील पुढें हृषीकेशी । धृतराष्ट्रें पुसिलें संजयासी । सांगे विस्तारासी तयाच्या. ॥ ३ ॥ जन्मेजया! महाराया! । संजयें कथिलें धृतराष्ट्राया । श्रीकृष्णसंवाद धनंजया । उपदेश रणीं तो केला. ॥ ४ ॥ तया संवादें अर्जुन भ्रांती । निरसून पावला सुखप्राप्ती । येथूनि प्रारंभ गी-

---

१. जोरानें. २. जनमेजय. ३. वैशंपायन. ४. येथून गीतेस प्रारंभ झाला. मूळांतील अध्याय २५ यांत भगवद्गीतेस प्रारंभ होतो. शुभानंदानें भगवद्गीता मराठींत बरोबर उतरली आहे. इतकेंच नव्हे तर जवळ जवळ प्रत्येक अध्याय समश्लोकी आहे. अशा ठिकाणीं कवीस भाषांतराखेरीज दुसरा उपायच नव्हता. कारण भीष्मपर्वांत किंबहुना सर्व महाभारतांत भगवद्गीता हाच अत्यंत महत्त्वाचा भाग आहे व तो हुबेहुब मराठींत उतरणें हेंच चांगलें असें समजून कवीनें भाषांतराचा अवलंब केला असला पाहिजे.

तार्थी । झाला' म्हणे मुनिवर्य. ॥ ५ ॥ तें या भावार्थें अंशकथन । श्रोतयांसी म्हणे ऐका सावधान । प्रभुविश्वंभरप्रसादेंकरुन । निमित्त शुभानंद बाहुली. ॥ ६ ॥ धृतराष्ट्र म्हणे संजयासी, । 'धर्मक्षेत्रकुरुक्षेत्रासीं । युद्धार्थ मत्पुत्र आणि पंडुजांसीं । गेले त्या ठायासी काय झालें ?' ॥ ७॥ संजय म्हणे अपरोक्षज्ञातें, । 'तव पुत्रें पाहिलें पंडुजसैन्यातें । त्याकाळीं पावूनि विस्मयातें । गुरुद्रोणातें बोलत. ॥ ८ ॥ 'पाहें पां पांडवसैन्य रचिलें । थोर बहुत धृष्टद्युम्नें भलें,' । दुर्योधनें आचार्या बोलिलें, । 'तव शिष्य शाहणे जाण पां. ॥ ९ ॥ त्या दळीं शूर महारथी भीमार्जुन । यांसम धनुर्धर रणयोद्धे नृप जाण । विराट युयुधान द्रुपद महान । रथी आणीकही विलोकीं. ॥ १० ॥ धृष्टकेतु चेकितान । काशिराजा पराक्रमी पूर्ण । पुरुजित कुंतिभोज दारुण । शैब्यादिक नृप शूर जे. ॥ ११ ॥ महावीर युधामन्यु । उत्तमौजादी अभिमन्यु । तयासमान द्रौपदीचे नंदनु । सर्वही हे महारथी. ॥ १२ ॥ आतां आमुच्या सेनेंतील । थोर जे त्यांतें बोलिजेल । सैन्यरक्षणाचे धणी विशाळ । संज्ञामात्र सांगतों. ॥ १३ ॥ तूं भयानक आणि भीष्म, । कर्ण जयस्वी, कृप रणशूर पूर्ण । अश्वत्थामा आणि विकर्ण, । तोही भूरिश्रवा तसा. ॥ १४ ॥ आणीकही बहू शूर । मत्कार्या प्राण देणार । नानाशस्त्रें हाणणार । कुशळ सर्व युद्धीं हे. ॥ १५ ॥ सबळ सैन्य हें आमुचें । समर्थ भीष्में रक्षियेलें साचें । असमर्थ बळहीन त्यांचें । जें कां भीमें रक्षियेलें. ॥ १६ ॥ तथापी सैन्यरक्षेचीं स्थानें । जीं ज्यांस दीधलीं गंगानंदनें । तेथूनियां भीष्मासीं रक्षणें । भीष्म सकळांतें रक्षील'. ॥ १७ ॥ तों भीष्म पितामह ते क्षणीं । दुर्योधना हर्ष उपजाया मनीं । सिंहनाद करूनियां रणीं । वाजवी शंख प्रतापें. ॥ १८ ॥ तेव्हां वाद्यें वाजलीं एकसरें । शंख भेरी पणवानक गोमुखें त्वरें । तो नाद अद्भुत भरूनि उरे । तुंबळ होऊनि त्याक्षणीं. ॥ १९ ॥ तों तो शुभ्रवर्ण घोडे महारथी । वरी पांडव आणीक श्रीपती । दिव्य शंख घेऊनियां हातीं । वाजविते सत्राणें जाहले. ॥ २० ॥ पांचजन्य वाजविला कृष्णें, । देवदत्त वाजविला अर्जुनें, । [1]भीमकर्मा जो वृकोदर तेणें । वाजविला शंख पौंड्र पैं. ॥ २१ ॥ राजा कुंतीपुत्र युधिष्ठिर । वाजवी अनंत विजय तो सुंदर, । सुघोष आणि मणिपुष्पक वीर । वाजवीत नकुल सहदेव ते. ॥ २२ ॥ आणि काशिराजा धनुर्धर । शिखंडी जो महारथी वीर । धृष्टद्युम्न विराटही थोर । सात्यकी अपराजित जो रणीं. ॥ २३ ॥ द्रुपद आणि द्रौपदीसुत । जो कीं अभिमन्यु सौभद्रेय विख्यात । सर्वेही हे भूपाळ मिळूनि वाज-

---

१. भयंकर आहे कर्म ज्याचें.

वीत । पृथक् पृथक् शंख आपुला. ॥ २४ ॥ तया वाजनांचें अद्भुत । धृतराष्ट्रसुतांचें हृदय विदारित । नभ पृथ्वी व्यापूनि भरत । महा कल्लोळ त्या स्थळीं. ॥ २५ ॥ धार्तराष्ट्र जों सर्व रचले । कपिवरध्वजें दुरूनि पाहिले । त्यावेळीं शस्त्रारंभास घेतलें । पांडवें धनुष्य सतेज जें. ॥ २६ ॥ राया! महिपती बोलिला ऐसा । तेधवां अर्जुन हृषीकेशा, । 'दोनीसेनामध्यभागीं रथेशा । अच्युता! स्थापीं' म्हणूनी. ॥ २७ ॥ 'मी पाहेन युद्ध करणाऱ्यांसी । युद्धोत्कंठा असे जयांसी । येथें उभे सर्वही म्यां कोणकोणासीं । झगडावें हें रणीं असें. ॥ २८ ॥ दुर्बुद्धी दुर्योधनची त्यास । मिळाले युद्धकर्ते जे रणास । त्यांतें प्रिय इच्छिती विशेष । पाहेन त्यांस निजनेत्रीं.' ॥ २९ ॥ रायासि म्हणे संजय ज्ञानी, । गुडाकेशें प्रार्थितां तयेक्षणीं । हृषीकेशें दोनिसेनामध्यस्थानीं । तो रथोत्तम स्थापिला ॥ ३० ॥ पार्थासि म्हणे, 'समोर । भीष्मद्रोणादि प्रमुख नृपवर । कौरवां साह्य जे पाहें सादर । मिळाले जे वीर रथापुढें. ॥ ३१ ॥ तो पार्थ पाहे विलोकुनी । तों पाहिले आजे त्यांत ते क्षणीं । गुरु मामे भाऊ पुत्र आणी । पौत्रही नयनीं देखिले. ॥ ३२ ॥ सासऱ्यांतें आणि सोयऱ्यांतें । दोन्हीसैन्यसागरीं देखे तेथें । बंधुजनांसह रणांगणातें । देखूनि कौंतेय बोलिला. ॥ ३३ ॥ कृपेंकरूनि आविष्ट परम । विषाद पावूनि वीरोत्तम । श्रीकृष्णासि म्हणे. 'स्वजन काम । युद्धाचा धरूनि सिद्ध उभे. ॥ ३४ ॥ पिळती माझीं सर्वही गात्रें । दुःखें मुखही वाळलें सर्वत्रें । कांप सुटूनि शरीरीं रोमगात्रें । उभीं राहती जाण हें. ॥ ३५ ॥ गांडीव धनू हातापासुनी । गळूनि गेली त्वचा जळुनी । उभा राहोंही न शकें ये क्षणीं । मन भ्रमुनी भोंवतसे. ॥ ३६ ॥ मी निमित्तेंकरूनि देखत । विपरीतचि केशवा! हें येथ । स्वजनाचा करूनि घात । नसे श्रेय यांत मज वाटे. ॥ ३७ ॥ मी नाहीं इच्छीत जय कृष्णा! । तेथें राज्य अथवा सुखें नाना । न असे राज्यभोगें जीवित्वगणना । गोविंदा! काय आमुतें? ॥ ३८ ॥ ज्याकारणें राज्यभोग सुखें । आम्हीं इच्छितों कीं हेरिखें । ते राहती युद्धा प्राणधन निकें । हरावया उभे असों कीं. ॥ ३९ ॥ गुरुद्रोणादि भीष्मादिक । हे आजे चुलते सुत आणिक । मामे श्वशुर नातू शालक । सोहिरे निःशेख सर्व कीं. ॥ ४० ॥ मी न मारूं इच्छितसें यांतें । जरी हे मज मारितिल मारूत मातें । त्रैलोक्यराज्यही नलगे निश्चितें । तेथें भूमीही कोण गणी? ॥ ४१ ॥ मारूनि धार्तराष्ट्रां सकळांसी । कवण प्रीती-

---

१. धृतराष्ट्रास. २. चांगलीः सुंदर.

जनार्दना! आम्हासी?। पापचि लागेल हातासी। मारितां शस्त्रें घेउनी. ॥ ४२ ॥ याकारणें वधावया । योग्य न हों कधीं आम्हीं यां । धार्तराष्ट्रबंधुस्वजना वधिलिया । सुखी केंवी माधवा! मी? ॥ ४३ ॥ ते जरीही न पाहती मूढपणें । लोभेंकरूनि कुलक्षयो करणें । आणि मित्रद्रोह करूनि राहणें । दोषें पातकी होउनी. ॥ ४४ ॥ मग या पापापासूनि जनार्दना! । आम्हीं कैसेनि परतों संकटहरणा? । कुलहत्यादोष महागहना । पाहतां दृष्टीं दिसे बहू. ॥ ४५ ॥ कुलक्षयेंचि कुलधर्म बुडत । जो कां सनातन धर्म विख्यात । तो धर्म नासला कीं निश्चित । कुल सर्व अधर्मा वश होय. ॥ ४६ ॥ त्या अधर्माच्या बळें कृष्णा! । कुलस्त्रिया होती दुष्ट मळिणा । त्या दोषें कृष्णनाथा! सुजाणा! । वर्णसंकर होतो कीं. ॥ ४७ ॥ वर्णसंकरें नरकीं पतन । कुलघ्नाच्या कुळासही होउन । पिंडोदकक्रिया जाती लोपोन । तेणें पूर्वज सर्व च्यवती. ॥ ४८ ॥ म्हणूनि कुलघ्नाचे थोर दोषें । वर्णसंकर निश्चयें होतसे । बुडती ज्ञातिधर्मनिःशेषें । शाश्वत कुलधर्म तोही कीं. ॥ ४९ ॥ वंशधर्म जया मनुष्याचे । बुडाले जनार्दना! पैं साचे । नरकीं वास निश्चयें त्यांचे । ऐसें आम्हीं ऐकतों. ॥ ५० ॥ महापापी कटकटा थोर । आम्हीं निश्चय केला जो क्रूर । कीं राज्यलोभें स्वजन निर्धार । मारायातें प्रवर्तलों. ॥ ५१ ॥ तरी निःशस्त्र मी; मला ते । मारूत शस्त्र घेऊन हातें । धार्तराष्ट्रांतें न मारीं निरुतें । मज क्षेम त्यांणीं मारितां असे.' ॥ ५२ ॥ बोलूनि अर्जुन ऐशापरी । उगा बैसलासे रथावरी,। बाणेसीं धनुष्य टाकूनि वरी। विव्हळ मनीं करी शोक. ॥ ५३ ॥ संजय म्हणे, 'धृतराष्ट्राया! । पुढें श्रीकृष्ण बोधील धनंजया । तें सादर होऊनि पुढिल्याऽध्याया । व्यासकृपे श्रवण करीं.' ॥ ५४ ॥ तेंची जन्मेजयासी । व्यासशिष्य वैशंपायन ऋषी । ऐक म्हणे पोटभरेंसी । श्रीकृष्णवाक्यसुधारस. ॥ ५५ ॥ जेणें अर्जुनाच्या मोहतमातें । गीताअष्टादशअध्यायसूर्यातें । उघडूनि दावितां श्रीकृष्णनाथें । अज्ञानांधकारातें निरसिलें. ॥ ५६ ॥ करूनियां स्वात्मबोध । निवटी अहंकार दंभ भेद । एकवटला सच्चिदानंद । आनंदकंद जगद्गुरू. ॥ ५७ ॥ तोचि प्रभु विश्वंभर । शुभानंद तयाचा किंकर । संतश्रोत्यां वारंवार । विनवी सादर ऐकावया. ॥५८॥

---

## अध्याय सातवा.

ऐक प्रज्ञाचक्षु[1] महाराजया! । मोहें नेत्रीं अश्रू भरूनियां । विषादयुक्त बै-

---

१. धृतराष्ट्र.

सतां होऊनियां । त्यातें मधुसूदन बोलतसे. ॥ १ ॥ म्हणे, 'अर्जुना! तुज कोठुनी । विषयीं या कश्मल उदेलें मनीं? । येणें अनार्यत्वें स्वर्ग नासुनी । अपकीर्तिवंत तूं होसी. ॥ २ ॥ तरी पार्था! होऊं नको षंढ आतां । तुज योग्य नव्हे सर्वथा । तुच्छ लंडीपण जे दौर्बल्यता । टाकूनि परंतपा! हो उभा.' ॥ ३ ॥ अर्जुन म्हणे, 'जी मधुसूदना! । भीष्मद्रोणासीं पूज्यत्वें गणना । ज्यांसीं अमर्यादें बोलवेना । त्यांसीं मारूं बाणीं मी कैसा? ॥ ४ ॥ तरी न मारूनि वडिलां गुरूंतें । भिक्षा खाणें हें श्रेय मज वाटतें । राज्यधनार्थ मारूनियां लोकांतें । रक्तभोग भोगणें लौकिकीं. ॥ ५ ॥ आतां त्या आम्हीं जिंकों बरें हेंची । कीं आम्हांतें जिंकू मेल्या मोक्षची । दोन्ही नेणूनि मारुं तथा जिवित्वची । काय पापी वांचून आम्हीं? ॥ ६ ॥ ऐशा धर्माच्या संकटीं झालों दीन । म्हणूनि तुम्हां शरणप्राय जाण, । स्वामीनें शिष्यासी वदावें कल्याण । वागवावें कीं शासनें मज. ॥ ७ ॥ माझा शोक न दिसे जें तें नाशीं । हा शोक जो शोषक इंद्रियांसीं । त्रिदशेंद्रलक्ष्मीसमृद्धी मजसीं । पावल्या सुखरूप मी नव्हें.' ॥ ८ ॥ धृतराष्ट्रासी म्हणे संजय मुनी, । ऐसें बोलूनि परंतप गुडाकेश तेक्षणीं । न करीं युद्ध हृषीकेश गोविंदा! म्हणूनी । राहिला उगा असे तो. ॥९॥ हांसूनियां हृषीकेश म्हणत । विषादयुक्त जो कां भारत । दोहीं सैन्यांमधें बोले त्याप्रत । उभा असूनि हें वाक्य. ॥ १०॥ म्हणे, 'अयोग्याचा तूं शोक करिसी । आणि पांडित्य बहुत बोलसी । तरी जित्यांच्या मेल्यांच्या शोकासी । न करिती सहसा पंडित ते. ॥ ११ ॥ तुझा माझा जन्म कितीवेळां । जन्म मृत्यु झाला या भूपाळां । पुढें सर्वांसि नाश भविष्यकाळा । असंख्यवेळां ऐसेची. ॥ १२ ॥ जैसी जीवांसी देहप्राप्ति होती । त्यांत कौमार यौवन जरा असती । तैसीं देहांतरें जीव भोगती । परी सत्वधीर न पावती मोहो. ॥ १३ ॥ कौंतेया! सुखें आणि दुःखें जाण । देती विषय इंद्रियें भोगुन । ऐशिया नाश उत्पत्ती असून । भारता! म्हणून सोसावें. ॥ १४ ॥ जे हे पुरुषा व्यथा न देती । पुरुषर्षभा! ऐसे जे असती । धैर्यें सुख दुःख सम मानिती । ते मोक्षा पावती योग्यत्वें. ॥१५॥ देह हें तों असत् नुपजतसे । जो नित्य जीव सत् अनित्य नसे । दोहींचें तत्व दोहींत जाणतसे । ब्रह्मतत्वज्ञ एक जें. ॥ १६ ॥ अविनाशीं तत्वीं भरूनि जाणा । व्यापिलें असे हें जग तेणें नाना । त्या अव्यय ईशाचा करुं शकेना । कोणी नाश कधींही. ॥ १७ ॥ देह नश्वर ज्या जीवांचे । जीव नित्य जे अंश अप्रमेयाचे । त्यांसीं अविनाश बोलिले साचे । भांडें यास्तव भारता! तूं. ॥ १८ ॥ भेदवादी म्हणती मारी ऐसें. । चार्वाक बोलती मरनसे, । दोघेही नेणती आत्मा असे ।

हा न मारी न मरे म्हणूनी. ॥ १९ ॥ न हा होतो मरतो कीं कधींही । देहासंगें होऊनि तो होत नाहीं । जो अज नित्य शाश्वत पुराणा पाहीं । त्या देहादिद्दश्यें न मारवे, न मरे. ॥ २० ॥ वेदाविनाशी जो नित्य । आणि जाणे मज अव्यय । तया पुरुषासी पार्था! कैसा होय । हाणितो मारितो कसा म्हणे? ॥ २१ ॥ जैसीं जुनीं वस्त्रें टाकूनि देती । सवेंचि नूतन नवीं गृहण करिती । तैसीं कलेवरें जीर्ण टाकूनि धरिती । जीव अनेकवर्ण नूतन पैं. ॥ २२ ॥ तयासी न तोडिती शस्त्रें जाण । आणि न जाळीतसे अग्न । पाणीही न भिजवी यालागुन । न करीच पवन शुष्कही. ॥ २३ ॥ यासि छेदावया नसे कीं आन । शोषाया भिजवावयाही कारण । कां जो नित्य सर्वांतरस्थ म्हणून । शाश्वत अचंचळ जो पैं. ॥ २४ ॥ जो अव्यक्त आणि अचिंत्य । अविकारी तया ऐसें म्हणत । त्याकारणें यासीं तूं व्यर्थ । जाण कीं शोक नको करूं. ॥ २५ ॥ आतां देहासवें होतो ऐसें नित्यु । मानिसी तरी पावती देह मृत्यु । जरी मारिसी महाबाहो! यथार्थु । तरी या शोकासी न योग्य तूं. ॥ २६ ॥ जो झाला त्यासी निश्चयें मरण । तो जन्मे पुन्हां मरे निश्चयेंकरून । परिहार नसे यदर्थाकारण । म्हणूनि तूं शोका अयोग्य. ॥ २७ ॥ भूतांचे आदीं अव्यक्त । व्यक्त तें मध्यें दिसत । त्यांचा अव्यक्तींच लय होत । मग भारता! शोक न करीं तरी. ॥ २८ ॥ हेंचि आश्चर्य पाहती कीं कोणीं । एक आश्चर्येची हें वदती वाणी । तैसेंचि आश्चर्यवत् ऐकती श्रवणीं । यापरी विसरती ऐकूनि आश्चर्य. ॥ २९ ॥ देहधारिया न वधावें कांहीं । सर्व देहांत जो भारता! पाहीं । भूतें नश्वर तस्मात् त्यांच्या कांहीं । योग्य तूं शोकासी न होसील. ॥ ३० ॥ क्षत्रियधर्म जरी तूं जाणसी । तरी कंपित हृदयीं शंकता न होसी । धर्मयुद्धाहूनि क्षत्रियांसी । श्रेय आणीक अधिक नसे. ॥ ३१ ॥ प्रार्थिल्यावीण पार्था! झालें । जें स्वर्गद्वार उघडें वहिलें । सुखी निर्भर ते ऐसें भलें । लाधती क्षत्रिय युद्ध रणीं. ॥ ३२ ॥ आतां या धर्मयुद्धातें टाकूनी । तूं जरी न करिसील युद्ध रणीं । तरी स्वधर्म श्रेय कीर्ति नासुनी । पावसी ताप अकीर्तीचा. ॥ ३३ ॥ ते अकीर्ती तुझी सर्वजन । आचंद्रार्कवरी करिती वर्णन । मान्यपुरुषातें मरणाहुन । दुष्कीर्ती वाईट बोलती. ॥ ३४ ॥ भयें रणांतूनि तूं गेलासें । म्हणतील महारथी तुज ऐसें । परततां मान्यपुरुष तूं विशेषें । अपमान मान्यांत पावसील. ॥ ३५ ॥ आणि बोलूं न येती ते बोल । शत्रु हे तुज बहु बोलतील । तुझें सामर्थ्य निंदितील । त्याहूनि तुज दुःख कोणतें? ॥ ३६ ॥ तरी मेलिया पावसी स्वर्गातें । रण जिंकिल्या भोगसील

महीतें। यांत निश्चय करूनि युद्धातें । कौंतेया! ऊठ तूं आतां. ॥ ३७ ॥ लाभालाभ आणी सुखें दुःखें । जयापजयातें मानीं सारिखें। तेणेंकरूनि करितां युद्ध निकें । सर्वथा पाप न पावसी. ॥ ३८ ॥ हे तों सांख्यीं बोलिली बुद्धी । योगाची ते आइक शुद्धी । ज्या कर्मयोगबुद्धीनें त्रिशुद्धी । कर्मबंधासी पार्था! तोडिसी. ॥ ३९ ॥ विघ्नें अपूर्णता येथें नसती । न प्रत्यवायही त्या बाधती । नाशी थोरा भयातेंही निश्चिती । स्वल्प ईश्वरीं अर्पितां. ॥ ४० ॥ निश्चयाची बुद्धी एकची जाण । यामार्गी कुरुनंदन! ऐक वचन । ज्या बहुशाखा बुद्धी त्या असून । कामुकांचिया अनंता. ॥ ४१ ॥ श्रुतींत स्वर्ग जो पुष्प असे । मूर्ख तें फळ मानिती निःशेषें । ते वेदवादींच रत म्हणती असें । नाहीं आणखी पार्था! पैं. ॥ ४२ ॥ इच्छिती स्वर्ग पर जो करीं । फलप्रद कर्म जन्मनिर्धारीं । बहू कर्मद्रव्यसाध्यावरी । भोगभाग्यगती अशा. ॥ ४३ ॥ भोगभाग्यांत आसक्तपणें । कामनाहृतबुद्धी जे वर्तणें । तया बुद्धीस एकाग्रता घडणें । आणि समाधी न होय जों. ॥ ४४ ॥ काम्याचे वेद विषय म्हणून । निष्काम तूं होय अर्जुना! जाण । नित्य सत्वस्थ आत्मवान । आणि निश्चित निर्द्वंद्व असें. ॥ ४५ ॥ जें जें कार्य क्षुद्रजळीं होतें । तें जळ डोहांत भरलें पुरतें । तैसें वेदीं काम्यकर्म सुखही तें । ब्रह्मीं ब्रह्मत्व ज्यां जसें तसें. ॥ ४६ ॥ तरी तूतें कर्माचा अधिकार । तत्फळीं न कदापीहि साचार । क्षणीं तूं कर्मची टाकिशी नातर । अथवा तूं फळही इच्छिसी. ॥ ४७ ॥ सिद्धीअसिद्धींत सम होऊन । टाकावीं फळें धनंजया! पूर्ण । योगस्थ करीं तूं कर्मे त्याकारण । समत्वा योग बोलिला असे. ॥ ४८ ॥ बुद्धियोगाहूनि नीच असे । धनंजया! कर्म हें जें विशेषें । पाहें रक्षक बुद्धींत न करीं ऐसें । तुच्छ कर्मे फलप्रद तरी. ॥ ४९ ॥ जिताच पाप आणि पुण्यातें । नाशितो जो बुद्धियुक्त मतें । म्हणूनि योगीं तूं योज कर्मातें । मग कर्मी कौशल्य योग तो. ॥ ५० ॥ शास्त्रज्ञ जे बुद्धियुक्त असती । कर्माचें फळमात्र टाकूनि देती । संसारबंध छेदूनि पावती । निर्दोषपदा म्हणूनी. ॥ ५१ ॥ अज्ञानमोहाचे सागरीं । तुझी बुद्धि तरे तेव्हां निर्धारीं । श्रुतअश्रुत भोगाचें अंतरीं । वैराग्य तेव्हां पावसी. ॥ ५२ ॥ लौकिकश्रवणें तुझी जाण । मळली शुद्ध होय हें पूर्ण । बुद्धी धारेल समाधींत मग्न । तेव्हां तूं योग पावसील.' ॥५३॥ अर्जुन म्हणे, 'स्थितप्रज्ञ सांग कसा? । केशवा! जो समाधिस्थ कैसा? । स्थितधी तो बोलिजे तसा । असे वर्ते जगीं कसा काय?'॥५४॥ पार्थासी म्हणे श्रीकृष्णनाथ, । 'जेव्हां सकळही टाकी काम मनांत । स्वरूपींच मनें तुष्ट तो स्थित । त्यासीच बोलत स्थितप्रज्ञ. ॥ ५५ ॥ न दुःखीं मन उ-

द्विग्न ज्याचें । न सुखाचीं स्पृहा जया साचें । कामक्रोधभयातीत जो वाचे । स्थितधी मुनी बोलती तया. ॥ ५६ ॥ सर्वत्रीं जयासी स्नेह नसतो । बरें वाईट भोग भोगूनि राहतो । द्वेष आनंद ज्यापासूनि नसतो । प्रज्ञा प्रतिष्ठित जाण त्याचीं. ॥ ५७ ॥ कांसव सर्वांगें वोढी जैसीं अंतरीं । तैसीं इंद्रियें विषयांतूनि आवरीं । तयाचि जाण तूं निर्धारीं । प्रतिष्ठित प्रज्ञा म्हणूनी. ॥ ५८ ॥ रोगी व्रती तया लागून । भोगवासना तरी नसे जाण । ज्ञानियाही ते बरी खूण । ब्रह्मात्मदर्शनें म्हणूनी. ॥ ५९ ॥ ज्ञानी पुरुष जो कां प्रयत्नी । त्याचीही कुरु-नंदना ! ऐक श्रवणीं । इंद्रियें बळवंतें हीं म्हणूनी । हरिती मनासी बळेंची. ॥ ६० ॥ तीं असतो आवरुनी । युक्त तत्पर होउनी । इंद्रियें ज्याला वश म्ह-णुनी । त्याची प्रज्ञा प्रतिष्ठितही. ॥ ६१ ॥ जो चिंती विषय पुरुष त्यातें । त्यांची भोगवासना उपजते । वासना ते उपजवी कामातें । काम तो क्रोधासी उपजवी. ॥ ६२ ॥ क्रोध उपजवितो मोहातें । संमोहें स्मृति भ्रंश पावते । स्मृतिभ्रंशें बुद्धिनाशातें । बुद्धिनाशें मूढ पूर्ववत. ॥ ६३ ॥ रागद्वेषाविरहित वशें । इंद्रियें जीं तीहीं घेतसे । विषयशुद्धात्मा विशेषें । तो प्रसादासी पावे पैं. ॥ ६४ ॥ त्या प्रसादेंच करूनि जाण । सर्व दुःखांचा जाय नाश होऊन । मग प्रसन्न चित्ताचे बुद्धीलागून । प्रतिष्ठा शीघ्रची पावतो. ॥ ६५ ॥ नाहीं बुद्धि अयुक्ताला तरी । नसे अयुक्तासी ध्यान अंतरीं । ध्यानाविण नये शांती निर्धारीं । कोठूनि सुख तरी अशांतें ? ॥६६॥ इंद्रियें वर्तती जे कां जाण । मोकळें सोडीत जे मन । तें त्यांची बुद्धी टाकी हरून । जैसी नाव जळीं वारा पैं. ॥ ६७ ॥ त-स्मात् सर्वेंद्रियें जयाचीं । ज्याणें विषयापासूनि साचीं । आटोपिलीं महाबाहो ! त्याची । प्रज्ञा प्रतिष्ठिता म्हणूनि. ॥ ६८ ॥ सर्वभूतांची जेथें पैं राती । तेथ ब्र-ह्मनिष्ठ हे जागती । याचि रातीस भूतें जागती । तेथ निजती दृश्यत्वें मुनी असे. ॥ ६९ ॥ नाना जळांचा मेळा मिळत । उदधींच परी सिंधुवेळा नुलंघित । तैसे भोगीं भोग असे स्वतःप्राप्त । तो पावतो शांती नसे कामकामी. ॥ ७० ॥ टाकूनियां सर्वही कामातें । भोगितो भोग निःस्पृहत्वें । मी माझें हें न वाटे जयातें । तो ज्ञानी शांतीतें पावतो. ॥ ७१ ॥ हे स्थिती ब्रह्मींची म्हणूनि पार्था ! । न मोहे इस जाणे जो पावतां । इच्या योगीं अंतकाळीं तत्वतां । क्षणेंही पावे तो मुक्तिसी.' ॥ ७२ ॥ यापरी प्रज्ञाचक्षु नृपती ! । अर्जुनासी उपदेश करी श्रीपती. । संजयो म्हणे, 'परिसें निगुती । पुढिले अध्यायीं वाक्यामृत'. ॥७३॥ जन्मेजयासी म्हणे वैशंपायन । भीष्मपर्वी गीतामृतनिरूपण । अर्जुनासि करी श्रीजनार्दन । तेंचि श्रवण तुज करितों. ॥ ७४ ॥ हें ऐकतां एकाग्रचित्तें ।

चित्तचा विसरे आपणातें । पावूनियां स्वानंदसुखपदातें । मोहममते निर-सूनि जे. ॥ ७५ ॥ श्रीविश्वंभरगुरुप्रसादें । शुभानंद विनवीत आनंदें । म्हणे श्रोतयांसी गुरुपदें । स्मरूनि सावकाशें ऐकिजे. ॥ ७६ ॥ गीता भावार्थअंशानें । कथिजेल ऐक भावार्थें । त्यासी अवधान मज श्रोते । साव-काशें देवोन आवडीं. ॥ ७७ ॥

---

## अध्याय आठवा.

अर्जुन म्हणे, 'तुज जनार्दना! । कर्माहूनि थोर वाटे बुद्धी जाणा । तरी मज घोर कर्मी या योजना । केशवा! कवण कारणा लाविसी? ॥ १ ॥ व्यामि-श्रवाक्यीं[1] बुद्धीसी । मोहिल्यापरी तूं करिसी । तरी एक तें नेमूनि मजसीं । निश्चित श्रेय पावेन तें सांग कीं.' ॥ २ ॥ अर्जुनासी श्रीकृष्ण सांगत, । 'या लोकीं दोंपरी निष्ठा पूर्वी निरोपिल्यात । ज्ञानयोगेंचि सांख्याला पावत । सत्कर्मे कर्मयोगियां तसें. ॥ ३ ॥ जे कर्मातीत तत्सिद्धि होती । कर्म केल्या-विणें न ते पावती । कर्मसंन्यासमात्रेंचि निश्चिती । न असे त्या सिद्धीस पावतो. ॥ ४ ॥ तरी कर्म कोणी केल्यावांचून । कधींही न राहती एक क्षण । दाटू-नियां करविती जाण । कर्मे प्रकृतीचे गुण असती. ॥ ५ ॥ आणि एक कर्मे-द्रियें आवरुनी । चिंतितो विषय आपुल्या मनीं । नेत्र झांकूनि तो मूढ ऐसें म्हणुनी । दंभाचार बोलती तया पैं. ॥ ६ ॥ अर्जुना! कर्मेंद्रियें हीं यांतें । जो मनेंकरूनि आवरी निगुतें । करी कर्मेंद्रियें कर्मयोगातें । निष्कामपणें तो थोर म्हणें. ॥ ७ ॥ कर्मत्यागाहूनि कर्म थोर । नित्य तें तूं करीं म्हणे साचार । देहनिर्वाहही तुझा होणार । न घडे कर्म टाकितां तरी. ॥ ८ ॥ विष्णुप्रीत्यर्थ जें कर्म करी । त्याविणें कर्मे बंधकें लोकांतरीं । तत्प्रीत्यर्थही कौंतेया! निर्धारीं । संग टाकूनियां आचर. ॥ ९ ॥ प्रजा यज्ञासवें प्रजापती । पूर्वी निर्मूनि बोलिला प्रीती । कीं या यज्ञीं वृद्धी पावा निश्चिती । तुमची कामधेनु हा असे ॥ १० ॥ तरी भजा देवास या यज्ञें । देव देती तुम्हांसी फळें म्हणे । ऐसें अन्योन्य भजतां तेणें । उत्तम श्रेयातें पावाल कीं. ॥ ११ ॥ इष्ट भोग देती तुम्हाकारण । यज्ञें जे देव पूजिले म्हणून । आणि देवीं दिलें तें देवांलागून । न देतां जो खाय तो चोर. ॥ १२ ॥ तरी यज्ञाचें जें शेष खाणारे । पातकें सर्वही नाशिती निर्धारें । नातरी पापी पापचि ते खाती खरें ।

---

१. मिसळवाक्यांनीं.

रांधिती स्वनिमित्तें ते जरी. ॥ १३ ॥ भूतें अन्नरसें होती उत्पन्न । पर्जन्य-वृष्टीनें होतें अन्न । यज्ञेंकरूनि पडे पर्जन्य । यज्ञ तो कर्मेंकरूनियां असे. ॥१४॥ वेदापासूनिया कर्म होत । वेद तो अक्षरसंभवत । तस्मात् सर्वगतही जो होत । सदां प्रतिष्ठित यज्ञीं पैं ॥ १५ ॥ ऐसें हें वर्तविलें चक्र जनीं । जो कां न वर्तवी आचरूनी । वृथा तें पाप आयुष्य पार्था! मनीं । जाण इंद्रियांसक्त तो जित. ॥ १६ ॥ आत्मत्वींच जयासी प्रीत । जो आत्मलाभेंचि होय तृप्त । जो आत्मत्वींच संतुष्टचित्त । त्याला कर्तव्य हें नसे. ॥ १७ ॥ कर्मीं त्याच्या फल नसे कांहीं । अकर्मीं नसे प्रत्यवायही । ज्यास सर्वभूतीं नसे पाहीं । कांहीं फळही अपेक्षित. ॥ १८ ॥ यालागीं निष्काम सदा । करावें तें करी कर्म धंदा । निष्काम करितां कर्म विशदा । पुरुष तो ब्रह्म पावनसे. ॥ १९ ॥ कर्मेंचि करितां सिद्धी जाण । जनकादी पावले याकारण । आणि लोकसंग्रह दृष्टी म्हणून । तरी तूं योग्य कर्मासि पैं. ॥ २० ॥ कीं जें जें श्रेष्ठ आचरती । तें तें इतर जनही करिती । ते जो कां निर्णय करूनि दाविती । वर्तती ते रीती हे लोक. ॥२१॥ मातें तिहीं लोकीं पार्था! । नाहीं कर्तव्य कांहीं सर्वथा । अवाप्तही काम निष्काम असतां । तरी कर्मींच वर्ततों असें. ॥ २२ ॥ जरी मी कर्मीं वर्तत नसेन । कधींही यत्नपूर्वक तरी जाण । मार्गानुरूप माझ्या म्हणून । वर्तती हे सर्व मानव कीं. ॥ २३ ॥ मग भ्रष्ट हे लोक होतील । न करीं मी कर्म जरी त्यावेळ । तेही करिती अन्यधर्में सकळ । तरी या प्रजा भ्रष्ट होती. ॥ २४ ॥ अज्ञानी कर्में तरी फळार्थी । जसीं करिती सर्व भारता! । तैसीं ज्ञानी तीं निष्काम करतां । लोकसंग्रहेच्छा धरुनी. ॥ २५ ॥ कामकर्मठअज्ञाचा जाण । बुद्धिभेद न करावा म्हणुन । सर्व कर्में करवावीं आपण । तत्वज्ञ जो युक्त स्वयें मग. ॥ २६ ॥ कर्में सर्वही प्रकृतीचीं अशेषें । करिजेताती जीं गुणीं निःशेषें । अहंकारें मूढबुद्धी जो विशेषें । मी कर्ता ऐसें मानी तो. ॥ २७ ॥ तत्वज्ञ गुणकर्माचा पाहुन । महाबाहो दोंभागीं स्वअकर्तृता जाण । पाहे कीं स्वस्वविषयीं संपूर्ण । इंद्रियें हींच वर्तती असें. ॥ २८ ॥ प्रकृतीच्या गुणीं मूढ ऐसें । झोंबती विषयेंद्रियीं विशेषें । असर्वज्ञा तयां मूढा निःशेषें । सर्वज्ञें खवळूं नये मग. ॥ २९ ॥ कर्में मज समर्पूनि जाण । सर्व अध्यात्मबुद्धीनें पूर्ण । आशा ममता हे टाकुन । सुखें तूं करीं हें युद्ध. ॥ ३० ॥ मातें दोष सहसा न ठेवितां । हें नित्य मानवमत सर्वथा । भावें अनुष्ठितो तेही तत्वता । सुटती कर्मापासूनियां. ॥ ३१ ॥ आरोपूनि दोष माजिया मता । न अनुष्ठिती कोणी सर्वथा । ते जाण सर्वाज्ञानमार्गीं तत्वता । कुबुद्धि भ्रष्ट ते विमूढ असे. ॥३२॥

पूर्वसंस्कारेंही करुनी। प्रकृतीसारिखा वर्ते ज्ञानी। भूतें वश प्रकृतीलागुनी। तरी मग निग्रहें काय कीजे? ॥ ३३ ॥ गोड त्याविषयीं उपजे प्रीती। वाईटीं द्वेष इंद्रियां सहज होती। तरी राग द्वेषची हे शत्रु असती। होऊं नये निश्चिती वश तयां. ॥ ३४ ॥ भलता स्वधर्म जो असेल तो नरा। परधर्म बऱ्याहूनि निर्धारा। स्वधर्मी मृत्युही श्रेय जाण खरा। परधर्म सत्वरा करी भय. ॥ ३५ ॥ **अर्जुन** म्हणे, 'जी श्री**कृ**ष्णनाथा! । कोणें प्रेरिला प्राणी तो सांग आतां। जो पातकें करी जैसा योजिजे बळवंता। सर्वथा कांहीं योजिल्याविणें.' ॥ ३६ ॥ श्री**कृ**ष्ण म्हणे, '**अ**र्जुना! अवधारीं। जो रजोगुणसंभवकाम, हा क्रोधही। अतृप्त सदा जो पापिया निर्धारीं। तो शत्रु या मार्गी पैं असे. ॥ ३७ ॥ जैसा जो वेष्टिजे धुरें अग्नी। आणि आरसा नाशी जो मळेंकरुनी। बांधिजे गर्भही नाळें जैसा जनीं। तैसें कामें वेष्टूनि सकळ असे. ॥ ३८ ॥ वेष्टिलें कामें जें हें ज्ञान। नित्य ज्ञानाचा शत्रू म्हणून। जो नाना कामनारूपी जाण। **कौं**तेया दुर्भर अग्निवत्. ॥ ३९ ॥ इंद्रियें आणी मन बुद्धी। यांसी काम अधिष्ठान आधीं। बोलिलें यांतें भुलवूनि त्रिशुद्धी। प्राण्यातें ज्ञान वेष्टुनी. ॥ ४० ॥ म्हणूनि तूं **भ**रतर्षभा! ऐकें। इंद्रियांसि आधीं जिंकें। मग कामपापियासी मारी निकें। जो ज्ञान विज्ञान नाशक. ॥ ४१ ॥ स्थूलापुढें इंद्रियें हीं जाण। त्यांही पलीकडेस मन। त्या मनापलीकडे बुद्धी पूर्ण। आत्मा तो तीपलीकडे असे. ॥ ४२ ॥ तिणें असें तीजपरता। जाणूनियां तो स्वस्थता। जो कामरूपी अजिक्य आतां। मारीं शत्रूसीं महाबाहो!' ॥ ४३ ॥ ऐसा हा श्री**कृष्णा**र्जुनसंवाद। **धृ**तराष्ट्रासी सांगे विशद। महामुनी **सं**जय **व्या**सपद। चिंतूनि चित्तीं सादर. ॥ ४४ ॥ तेंचि **ज**न्मेजयासी **वै**शंपायन। सांगे श्री**कृष्णा**र्जुनसंवाद पूर्ण। ऐकतां तुटेल भवपाश दारुण। पावेल पूर्ण अविनाशपद. ॥ ४५ ॥ म्हणूनि चतुर श्रोते यांसी। ऐका म्हणे या विचारासी। **गी**ता भावार्थ भावार्थेसीं। बोलिजेल अंशनिरुपम. ॥ ४६ ॥ सद्गुरू**वि**श्वंभरप्रसादें करुनी। **शु**भानंद विनीत श्रोत्यांचरणीं। धरा भावार्थें बोल अंतःकरणीं। सद्गुरुपद अहर्निशी. ॥ ४७ ॥

---

## अध्याय नववा.

श्री**कृ**ष्ण म्हणे, '**अ**र्जुना! हा योग। पुरातन **सू**र्यासी कथिला जो म्यां सांग। **सू**र्यें उपदेशिला **म**नूसी चांग। तेणें पुत्र **इ**क्ष्वाकूतें बोलिला. ॥ १ ॥ तोचि हा आजी तुजकारणें। वर्णिला योग जो पूर्वील जाणे। तूं सखा भक्त

म्हणूनि वचनें । रहस्याद्भुत बोलिलों तरी. ॥ २ ॥ परंपरागत असा जो योग । तो राजर्षी जाणती यथासांग । तो योग बहुतां काळें ममांग । झाला जाण परंतपा!' ॥ ३ ॥ अर्जुन म्हणे, 'श्रीकृष्णनाथा!। तुझ्या जन्मापूर्वी जन्म असे सवित्या । त्यासि तूं पूर्वी योग बोलिलों म्हणसी आतां । हें म्यां कैशापरी तत्वता जाणावें?' ॥ ४ ॥ श्रीकृष्ण 'अर्जुना! जन्म तुझे' । म्हणे 'झाले बहुतेक माझे । मी ईशत्वें जाणतों हें सहजें । तूं जीवत्वें नेणसी सहसाहि. ॥ ५ ॥ तरी अज मी, मी अविनाश । आणि सर्वभूतांचाही ईश । होतों शुद्धात्ममायेनें वश । स्वआकृतीसी अधिष्ठुनी. ॥ ६ ॥ जेव्हां जेव्हां स्वधर्माची हानी । होती जाण भारता! त्याक्षणीं । अधर्माची अभिवृद्धी पाहुनी । तैं मी आपणासी निर्मितों. ॥ ७ ॥ साधूंच्या रक्षणालागुन । मारावयासी पातकी जन । आणि धर्म स्थापावयातें जाण। युगायुगाप्रती मी होतों. ॥८॥ अलौकिकें जन्म कर्में जीं । जो जाणेल ऐसीं कोणी माझीं । तो देह टाकूनि पावे मजमाजी । जन्मा नये पुन्हा अर्जुना! ॥ ९ ॥ कामक्रोधभयातीत । ध्याननिष्ट मदाश्रित । बहु ज्ञानतपें शुद्धचित्त । ते माझ्या स्वरूपास पावले. ॥ १० ॥ जे जसे मातें भजती । मी तसा फळतों तयांप्रती । पार्था! मनुष्य सकळ वर्तती । माझ्या मार्गीच जाण तूं. ॥ ११ ॥ सर्व सिद्धीसी इच्छूनी । पूजिती अन्य देवतांलागुनी । त्या कर्ममूळेंच सिद्धी क्षणीं । होती मनुष्यां जाण तूं. ॥ १२ ॥ म्यां केले चारही वर्ण । गुण कर्में विवंचुन । त्याचा कर्ता तरी कर्ता जाण । नव्हें मी अव्यय असें. ॥ १३ ॥ कर्में न लिंपती सर्व मातें । कीं कर्मफळीं स्पृहा ना तें । जाणे असें तोही मज निश्चितें । कधीं कर्मी बद्ध नव्हे. ॥ १४ ॥ ऐसें जाणूनियां मोक्षार्थ । केलीं कर्में पुरातनीं निश्चित । तरी करीं कर्मची तूं तस्मात् । केलीं जीं पूर्वपूर्वजीं. ॥ १५ ॥ ज्ञानींहि मोहिलें कीं हे । तें कैसें कर्म अकर्मही आहे । सांगेन तें जें जाणूनि कीं हे । मुटसी अशुभांतुनी. ॥ १६ ॥ तत्वें वेदोक्त कर्माच्याही । विकर्माचें निषिद्ध जें कांहीं । जाणावें अकर्माचेंही । कर्माच्या गती गहन पैं. ॥ १७ ॥ न बाधतें नव्हे कर्म । जें कृष्णार्पण तें अकर्म । तसें अकर्मी पाप तें कर्म । देखे सर्वज्ञ सर्वकृत्. ॥१८॥ टाकूनि कां संकल्पासी । आरंभी कर्म जो सर्वस्वीं । ज्ञानाग्नीनें कर्म जाळी त्यासी । तोचि पंडित म्हणती. ॥ १९ ॥ फलेच्छा सर्व जो टाकुनी । सदां तृप्त निराश्रय होउनी । प्रवर्तला सर्वकर्मी म्हणुनी । तरी तो कांहीं न करीच. ॥ २० ॥ शरीर चित्त स्ववश करुन । आणि आशा परिग्रहही त्यागुन । शरीरमात्रें जो कर्म करी जाण । तो पाप सहसा न पावे. ॥ २१ ॥ लाभें अयाचितें

संतुष्ट जाण । न जया द्वंद्व मत्सर म्हणुन । सिद्धीं असिद्धींत तो समान । करूनि मग बद्ध नव्हे. ॥ २२ ॥ त्या कर्तृत्वापासून मुक्त । जरी स्वरूपीं चित्त धारलेंत । यज्ञार्थ आचरे कर्म तरी जात । लयासि सर्व तें जाणें. ॥२३॥ कर्ता अग्नी हविर्द्रव्यें जाणें । ब्रह्म ब्रह्मींच पैं अर्पणें । कर्मीं ब्रह्म समाधिस्थ कारणें । त्याणें ब्रह्मीं पावसीच कीं. ॥ २४ ॥ यज्ञीं इंद्रादि भावेंचि प्रीती । कर्मयोगींच उपासिती । ब्रह्माग्नींतची ज्ञानी निश्चिती । यज्ञरीतीच होमिती तैसे. ॥ २५ ॥ श्रोत्रादि इंद्रियें कोण्ही जाण । संयमाग्नींत होमिती पूर्ण । त्या इंद्रियाग्नींत कोण्ही जन । अर्थशब्दादी होमिती. ॥ २६ ॥ कोण्ही सर्व इंद्रियांचीं । कर्मेंही प्राणादिकांचीं । चित्प्रकाशांत वृत्तिच्या साची । निरोधाग्नींत होमिती. ॥ २७ ॥ द्रव्ययज्ञ आणि तपोयज्ञ । योगयज्ञही सुवृत्त जाण । वेदार्थ तो ज्ञानही यज्ञ । यत्नशीळ अनुष्ठिनी. ॥ २८ ॥ अपानीं होमिती प्राण । प्राणीही तोची अपान । प्राणापान निरोधोन । प्राणायामासीं तत्पर. ॥ २९ ॥ कोण्ही अन्नादी नेमुनी । होमिती प्राणासी प्राणीं । हठयोगी असे सर्वकरोनी । यज्ञें पावन यज्ञवित्. ॥ ३० ॥ यज्ञशेष सुधा जे कां भोक्ते । ते परब्रह्मींच पावती निश्चितें । अयज्ञाला न हा लोक मातें । कैंचा स्वर्ग कुरुसत्तमा ! ॥ ३१॥ असे विस्तारले बहुत यज्ञ । ब्रह्मयाचिया मुखापासुन । जाण सर्व कर्मज तें म्हणुन । ऐसें जाणूनि तूं सुटसी. ॥ ३२ ॥ द्रव्ययज्ञाहूनि श्रेष्ठ असे । अर्जुना ! ज्ञानयज्ञची निःशेषें । लौकिकें वैदिकें कर्में विशेषें । सर्व ज्ञानींच संपती. ॥ ३३ ॥ तें जाण वंदनें प्रश्नेंकरुनी । आणि संतसेवक होउनी । शास्त्रज्ञ तत्वज्ञ तुजकारणी । मग ते ज्ञान उपदेशिती. ॥ ३४ ॥ जें जाणूनि पुनरपी ऐसा । पांडवा ! न मोहसील निःशेषा । देखसी चराचरें आपणा तैसा । मजसीं मग ऐक्य तें. ॥ ३५ ॥ अससी थोरही पापी जाण । पापिया सकळांत तूं पूर्ण । तरी या ज्ञाननावेनें संपूर्ण । तरसी पापसागर जो. ॥ ३६ ॥ कीं जसा पेटला अग्नी त्वरें । काष्ठें जाळी जसींतसीं निर्धारें । अर्जुना ! ज्ञानाग्नी तो एकसरें । सर्वही पुण्य पातकें भस्म करी. ॥ ३७ ॥ ज्ञानासम पवित्र नसे अन्य । कांहीं तें ज्ञान तें स्वयें पाहुन । ज्ञाताची हो जें योगयत्नें करुन । काळें चित्तांत बिंबतें. ॥ ३८ ॥ श्रद्धावंतासी तें ज्ञान पावत । जो जितेंद्रिय तत्पर असत । जो ज्ञान पावूनि शांती येत । थोर तें शीघ्र पावतो. ॥ ३९ ॥ बुडे अज्ञ तसी श्रद्धा जाण । आणि संशयबुद्धी ही म्हणून । त्यासीं इहलोक ना परलोक कारण । सुखही संशयात्म्यासी नसे. ॥ ४० ॥ जो कर्मयोगांत संन्यासी । शास्त्रें मुक्तसंशय निश्चयेंशी । जो आत्मज्ञ कर्में मग त्यासी । न बाधती पैं धनंजया !

॥ ४१ ॥ तस्मात् संशय जो अज्ञानें । मनांत छेदूनि तया ज्ञानखड्गानें । निः-संशयें आणि उठ ये क्षणें । स्वकर्म करीं भारता! पैं तूं. ॥ ४२ ॥ ऐसा श्रीकृष्ण आणि अर्जुन-। संवाद सांगे धृतराष्ट्रालागुन । तोचि वैशंपायन जन्मेजयाकारण । श्रीगुरुआज्ञे निरोपित. ॥ ४३ ॥ श्रीगुरु विश्वंभरप्रसादें-करुन । तद्भावार्थअंश श्रोतयांसीं श्रवण । करावया अनन्यभावें शरण । धरुनी चरण शुभानंद. ॥ ४४ ॥

---

## अध्याय दहावा.

अर्जुन म्हणे, 'श्रीकृष्णनाथा! । कर्मसंन्यास कर्मयोगही कथितां । तरी या दोहींत श्रेय एक तें आतां । तें तूं तत्वतां मज सांगें.' ॥ १ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'अर्जुना! एक । कर्मसंन्यास आणी कर्मयोगही देख । कल्याणकारक, परी तो अधिक । कर्मत्यागाहुनी कर्मयोग असे. ॥ २ ॥ संन्यासी तोचि हा जाण । इच्छा द्वेष नसे जयाकारण । निर्द्वंद्व जो महाबाहो! म्हणून । बंधापासूनि तो मुटे. ॥ ३ ॥ सांख्य आणि योग वेगळे । अज्ञान बोलती, न पंडित भले; । कीं एकाच्या अनुष्ठानें आकळे । दोहींचें फळ पावतो असें. ॥ ४ ॥ पावती सांख्य ज्या स्थानासीं । योगीही पावे तेथें निश्चयेंशी; । सांख्ययोगऐक्यें जो दोहींसीं । पाहे तोचि असे डोळस. ॥ ५ ॥ संन्यास तो नव्हे ऐसा जाण । महाबाहो! जो दुर्लभ कर्माविण । कर्मयोगेंचि जो मुनी तो पूर्ण । ब्रह्म सत्वर पावतो तरी. ॥ ६ ॥ कर्मयोगेंचि जो शुद्धचित्त । जिंकिलीं इंद्रियें मन निश्चित। जो देह जीवभूतात्मा न होत । करितांही कर्म लिप्त तो. ॥ ७ ॥ न कांहीं करितों ऐसें मनीं । तो नित्य तत्ववित् मानी । विषयीं वर्ततां जातां कारणीं । निजतां आणि श्वास वाहतां. ॥ ८ ॥ आणि कर्मेंद्रियक्रिया होतां । निमिषा-दिहिं कां हालतां? । इंद्रियें आपुल्याला व्यापार करितां । मानूनि वर्तती पैं ऐसें. ॥ ९ ॥ ब्रह्मीं कर्में समर्पुनी । जो करी संग टाकुनी । पापें न लिंपे तो कम-ळणी । दळ जळीं जैसें अलिप्त. ॥ १० ॥ कायामनें बुद्धीनेंही जाण । वास-नातीत इंद्रियें करून । करिती चित्तशुद्ध्यर्थ कारण । संग टाकूनियां क्रिया असे. ॥ ११ ॥ योगी कर्मफळत्यागें स्थिती । पावती थोर जे निश्चयें शांती । सकाम ते कामसंकल्पें जाती । बद्ध होऊनि रत फळासीं. ॥ १२ ॥ करूनि कर्में सं-न्यासी मनें । होऊनियां सुखरूपतेनें । असे नवद्वारपुरीं तेणें । न करीत करी विहिता. ॥ १३ ॥ कर्तृत्व कर्में लोकांचि असें । न ईश्वरही निर्मितो तसें । न कर्मफल भोगातें आपैसें । वर्ते संसारचक्र हें. ॥ १४ ॥ कोणाचें पापही

ने घे आण । पुण्यही नेघे ईश्वर जाण । अज्ञानें वेष्टिलेंसे ज्ञान । त्याणें करिती भोगिती जन. ॥ १५ ॥ अज्ञान बुद्धीचें ज्याचे जाण । तें ज्या ज्ञानें नाशिल्या संपूर्ण । परा जडातें तें त्याचें म्हणून । प्रकाशित ज्ञान सूर्यवत्. ॥ १६ ॥ त्याचें ज्ञानबुद्धी आणि चित्त । निष्ठा ते परमाश्रयवंत । असे ते पावती मोक्ष त्वरित । ज्ञानें जाळूनि संचिता. ॥ १७ ॥ विद्यासद्गुणसंपन्नीं । ब्राह्मणीं धेनुही मधें आणी । गजीं श्वानांत चांडाळीं जनीं । पहाती समान पंडित पैं. ॥ १८ ॥ ऐशा समींही स्थिर मन । त्याणें जितांच भव जिंकिला जाण । सम तें ब्रह्म निर्दोष म्हणुन । तस्मात् तो ब्रह्मींच समीं असे. ॥ १९ ॥ प्रिय होतां जो कां न हर्षे । अप्रियें घाबरा न होतसे । स्थिरबुद्धी जो कां मूढ नसे । मग ब्रह्मीं ब्रह्मज्ञ तो स्थिर. ॥ २० ॥ स्पृहा न बाह्यविषयीं जाण । स्वरूपीं पावतो सुख संपूर्ण । ब्रह्मयोगीं युक्तचित्त म्हणून । सुख अक्षय तो भोगी. ॥ २१ ॥ जे भोग विषयस्पर्शें देख । तेचि दुःखाचें कारण एक । आद्यंतवंत[1] कौंतेया ! निःशेख । रमे ज्ञानी व त्या सुखीं. ॥ २२ ॥ जो जितांच सोसूं शके । पूर्वींच मरणाहून अधिकें । कामक्रोधादि वेगें निःशेखें । तो योगी तो सुखी नर. ॥ २३ ॥ सुखी आंत रमे आंत । अंतर्ज्योतीच जो स्वयें स्थित । झाला ब्रह्मचि तो योगी निश्चित । ब्रह्म निर्वाण पावतो असें. ॥ २४ ॥ पावती ब्रह्मनिर्वाण ऐक । जे ज्ञानी क्षीणपातक देख । द्वैतनाशें स्थिरमती आणिक । सर्व भूतहितीं रत. ॥ २५ ॥ जें कामक्रोधरहित । प्रयत्नीं वश जें चित्त । देह वांचो मरो तें तों जात । मुक्त केवळ आत्मवित्. ॥ २६ ॥ बाहेर बाह्य विषय करून । दृष्टीतें भोंवयामध्यें स्थापून । नासिका वाहत्या जाण । प्राणापानातें करुनी सम. ॥ २७ ॥ बुद्धींद्रिय मन स्थैर्य जाण । मुनी मोक्ष जो परायण । नाहीं इच्छा भय क्रोध म्हणून । झाला मुक्तची तो सदां. ॥ २८ ॥ मी यज्ञतपाचा भोक्ता । मी सर्वलोकमहेश वेत्ता । सर्वांचा मी सुहृद तत्वता । मातें जाणोनि शांती पावतो.' ॥ २९ ॥ यापरी अर्जुनासि श्रीकृष्ण । संजय म्हणे धृतराष्ट्रालागुन । जन्मेजयासि सांगे वैशंपायन । पुढें श्रवण सादर कीजे. ॥ ३० ॥ श्रीगुरुविश्वंभरप्रसादेंकरून । शुभानंद श्रोत्यां विनवी कर जोडुन । श्रीकृष्णार्जुनसंवाद अतीगहन । तद्भावार्थअंश निरोपिला. ॥ ३१ ॥

---

## अध्याय अकरावा.

**श्रीकृष्ण अर्जुनासी** 'ऐक' म्हणे, । 'करावें कर्म, तें करी न फलेच्छापणें ।

---

[1] आदि-अंत-वंत=उत्पत्तिस्थितिनाशयुक्त.

तो संन्यासी तोचि योगी म्हणे । न निरग्नी न अक्रिय असे. ॥ १ ॥ संन्यास तोची म्हणावा । जो कर्मयोगची पांडवा! । कीं कामत्याग जाणावा । संन्यास कर्मयोग न त्यागिणें. ॥ २ ॥ योगारुरुक्षु[१] जो ज्ञानी जाण । कर्म त्यासही कारण म्हणून । तयाच योगारूढासी ध्यान । स्थितीस कारण बोलिजे. ॥ ३ ॥ जेव्हां विषयीं गुंतत नसे । कर्मीही मन न रुततसे । भोगसंकल्पही टाकीतसे । तेव्हां आरूढ बोलिजे तो. ॥ ४ ॥ उद्धरावें स्वचित्तानें म्हणून । प्रपंचीं बुडवूं नये हें कारण । मित्र हें आपुलें चित्त आपण । शत्रुही पूर्ण चित्त आपुलें. ॥ ५ ॥ मित्र त्याचेंच तें चित्त भलें । जें स्वरूपेंची असे जिंकिलें । अनात्मज्ञानें शत्रुत्व झालें । तरी वर्ते चित्तचि शत्रुवत्. ॥ ६ ॥ शांताचें आणि जितचित्ताचें । थोर चित्त बरें स्थिर साचें । शीतोष्णीं सुखदुःखीं त्याचें । आणि मानापमानींही तें सम. ॥ ७ ॥ ज्ञानें अनुभवें तृप्त आपण । कूटस्थ विजितेंद्रिय जो पूर्ण । तो योगारूढ कीं कांचन । भेंडे[२] धोंडा जया समानची. ॥ ८ ॥ सुहृत् मित्र आणी उदासीन । मध्यस्थ असखे सखे आण । साधुपापियां सर्वी जाण । समबुद्धी विशेष तो असे. ॥ ९ ॥ कर्मयोगीं योजित चित्त । सदा सेवूनि राहे एकांत । स्थिरचित्तें तनु एक निश्चित । टाकी आशापरिग्रह. ॥ १० ॥ स्थापूनियां शुद्धदेशीं जाण । जें कां आपुलें स्थिर आसन । न बहु उंच ना नीच करून । कुशचर्मावरी पट असे. ॥ ११ ॥ करूनि मन एकाग्र तेथ । स्थिर चित्तेंद्रिय क्रियांसहित । योजावा योग चित्तशुद्ध्यर्थ । स्वस्थ बैसूनि आसनीं. ॥ १२ ॥ माजपट्टा[३], ग्रीवा आणी शिर । हें नीट धरुनी असावें स्थिर । दृष्टी ठेवूनि नासिकाग्रावर । मग दशदिशा पाहूं नये. ॥ १३ ॥ मग निर्भय जो शांत । ब्रह्मचारी असे व्रतस्थ । मद्रूपीं लावूनि जो चित्त । वसे मत्पर होउनी. ॥ १४ ॥ ऐसें सदां चित्त योजी । आवरुनी मन सहजीं । मोक्षासि साधन तो माझी । पावतो शांती असी तरी. ॥ १५ ॥ न योग बहु खातांही होत । न खातां न ये एकाग्रत्व । आणी बहु निजतां नाहीं होत । नित्य जागतां न अर्जुना! ॥ १६ ॥ विहार आणी आहारयुक्त । जो चेष्टाकर्मी युक्त वर्तत । स्वप्नावबोधीं युक्त त्याचें चित्त । तया साधे योग दुःखनाशक जो. ॥ १७ ॥ आत्मस्वरूपींच चित्त । राहे जेव्हां नियोजिलें स्वस्थ । सर्वकामस्पृहाशून्य होत । म्हणावा सिद्ध तेधवां असें. ॥ १८ ॥ निवांत सदनीं दीपज्योती । जैसी न हालेचि जाण उपमा तैसी ।

---

१. योगावर चढूं इच्छिणारा. २. वीट. ३. कंबरपट्टा.

योगियांच्या असे चित्तासी । जो स्वात्मयोगासी योजी तो. ॥ १९ ॥ जेथें उपरमोनी चित्त ठेलें । योगामार्गें असे निरोधिलें । जेथें चित्त आत्मयातें पावलें । पाहे तोषें तयांतची मग. ॥ २० ॥ तेथें अनंत सुख जें होय । बुद्धि-ग्राह्य तें अतींद्रिय । जाणें त्यातें मग न हा जाय । तत्वांपासोनियां चलन. ॥ २१ ॥ न मानीत लाभ अधिक । त्या सुखाहूनि पैं आणिक । न चळेही थोरदुःखें निःशेख । पावतां ज्यासुखीं स्थिती. ॥ २२ ॥ दुःखसंयोग वृत्तीचा पूर्ण । तद्वियोगांत आयता जाण । चितात्मयोग तो करुनी यत्न । साधावा दृढ-निश्चयें तमा. ॥ २३ ॥ संकल्प करितां झालें । काम तें सर्व टाकूनि भलें । मनेंचि इंद्रियग्राम सकळें । दंडुनी स्थळीं असे पैं. ॥ २४ ॥ धारणायुक्त बुद्धीनें जाण । व्हावें स्थिर हळुहळू मन । आणी चित्त चिन्मात्रीं योजून । कांहींच मग चिंतू नये. ॥ २५ ॥ ज्या ज्या पदार्थीं निघतें । मन चंचल अ-स्थिर होतें । आत्मा हाची तेथें तेथें । त्यांत तें वश करावें मग. ॥ २६ ॥ ऐशा प्रशांतचित्तातें । उत्तम सुख योग्य तें । साधे रजतमातीतें । ब्रह्मरूप अक-र्मक. ॥ २७ ॥ योजीं ऐसा सदा चित्त । योगीं ज्यास वासनारहित । ब्रह्म-स्पर्शें अनायासें प्राप्त । सुख अत्यंत भोगी तो. ॥ २८ ॥ सर्व भूतांमधें आत्मा जाण । भूतें तीं आत्मयामधें संपूर्ण । नित्य योगीं चित्त असा म्हणून । सर्वत्र समदर्शन तो असे. ॥ २९ ॥ मातें सर्वत्र जो पाहतसे । आणी सर्व मदंतरीं देखतसे । त्याचा मी त्यास न सोडीतसें । माझा तो सोडिना मला. ॥ ३० ॥ सर्व भूतस्थ त्या मातें जाण । भजे जो एकता धरोन । मजमधें तो योगी पूर्ण । वर्ते प्रपंचीं जरी सर्वथा. ॥ ३१ ॥ स्वदृष्टांनें सर्वही भूतीं । जो पाहे सम **अर्जुना**! प्रीती । सुखदुःखासही निश्चिती । तो योगी थोर मज संमता.' ॥ ३२ ॥ **अर्जुन** म्हणे, 'जी! **म**धुसूदना! । जो हा योग तुवां सांगितला जाणा । साम्यें त्याच्या स्थितीतें स्थिर मना । मी न देखें चंचलत्वें. ॥ ३३ ॥ कीं **कृ**ष्णा! हें चंचळ मन । इंद्रियांहूनि बळकट जाण । त्याचा निग्रह तरी पवन । मोट जैसी न बांधवे असें.' ॥ ३४ ॥ श्री**कृ**ष्ण म्हणे, '**अर्जुना**! खरें । मन चंचल दुर्जयच निर्धारें । तरी अभ्यासें आणीं वैराग्यें त्वरें । तरी तें जिंकवेल **कौं**तेया! ॥ ३५ ॥ माझी हे बुद्धी कीं योग । नव्हे जों मन नावरे सांग । प्रयत्नशीलें स्ववशें मग । तो पावों सकिजे मनें.' ॥ ३६ ॥ **अर्जुन** श्री**कृ**ष्णासी म्हणे, । 'निष्ठा असोनि आळसपणें । मन योगांतूनि चळूनि न योग पावणें । सांगें तो कवणे गती जाइल? ॥ ३७ ॥ तो काय उभय भ्रष्ट असे । मेघाचें थिगळ भ्रमे जैसें । अपक्क पावल्या मोह कैसें । जो ब्रह्ममार्गीं

महाभुजा! ॥ ३८ ॥ निःशेष या संशयातें जाण। तूं एक छेदिसी **श्रीकृष्ण**। या संशयाचा संहर्ता अन्य। न दिसे मज तुजवांचुनी.' ॥ ३९ ॥ **श्रीकृष्ण पार्था**सी म्हणे येथें, । 'न स्वर्गीही त्याचा नाश निश्चितें। न घडे कधीं कल्याणमार्गी यातें। बापा! दुर्गतीतें न जाय कोणी. ॥ ४० ॥ वांचोनि पुण्य लोकातें वर्षे। अगणीत राहुनी विशेषें। शुचिश्रीमंतसदनीं विशेषें। तो योगभ्रष्ट जन्मतो मग. ॥ ४१ ॥ आणी योगियाचे कुळीं जन्मतो। अथवा भल्यांचिया घरीं होतो। जन्म दुर्लभ हा बहू तो। याल्रोकीं जो असे रीती. ॥ ४२ ॥ यादेहीं पूर्वदेहींचा हेतू। बुद्धिसंयोग पावतो निश्चितु। मोक्षीं बहु प्रयत्न करितु। **कुरुनंदना**! तो मग. ॥ ४३ ॥ त्याला तत्पूर्व जो अभ्यास। बळें योगीच योजितो निःशेष। कीं तो पूर्वी योगजिज्ञास। तरी वेदां अतिक्रमी असे.॥४४॥ प्रयत्नें साधितां योग। जातां किल्मिष वासनासंग। अनेक जन्मीं तो सिद्ध मग। त्या जन्मीं तो मुक्ती पावतो. ॥ ४५ ॥ तापसांहुनीही थोर अधिक। संमत ज्ञानियाहुनी निःशेख। कर्मयोग्यांहूनी तस्मात् देख। तूं होइं योगी **अर्जुना**! ॥ ४६ ॥ स्वरूपनिष्ठचित्तें जो जाण। या सर्वां योगियांमधें पूर्ण। भक्तियोगें भजे मजकारण। तो योगी थोर संमत असे.' ॥ ४७ ॥ ऐसा श्री**कृष्णा**र्जुनसंवाद। **धृ**तराष्ट्रासी **सं**जय सांगे विशद। तोचि **वै**शंपायन ऋषी सावध। **ज**न्मेजयासीं ऐकें म्हणे. ॥ ४८ ॥ प्रभु **वि**श्वंभरानुग्रह गुरुचा। **शु**भानंदीं प्रेमामृत साचा। म्हणूनि श्रोतयां म्हणे वाचा। **गी**ताभावार्थअंश श्रवणासी. ॥ ४९ ॥

---

## अध्याय बारावा.

'माझेंचि आसक्त करणें मना। मदाश्रयें योग साधेल **अर्जुना**!। संशय सोडूनि कीजे भजना। तेंही ध्यान ऐक पां. ॥ १ ॥ ज्ञानियांचें मी विज्ञान। तेंही सांगेन तुजलागुन। हें तुज ज्ञान झालिया पूर्ण। शिष्य माझा तूं होसी. ॥ २ ॥ मनुष्य विवेकी सहस्र एक। त्यामाजी साधक एक देख। तया सहस्रसाधकीं चोख। योगमार्गी मज पावे. ॥ ३ ॥ अष्टधाप्रकारचे जन। परादी वाचा लावोन। जीवप्रकृतिसंगेंकरुन। जग हें पूर्ण रचिलें म्यां. ॥ ४ ॥ अष्टधाप्रकृतीचे[1] जन। पंचतत्वें शरीर निर्माण। पृथ्वी आप तेज वायु गगन। मन बुद्धि आणी अहंकार. ॥ ५ ॥ जीं ज्या ज्या योनी संभवती भूतें। तयां सर्वरूपीं मीचि निश्चितें। जन्मवी पाळी प्रळयातें। कर्ता कृत्स्न मी एक. ॥ ६ ॥ माझियापरतें कांहीं नाहीं। अणुरेणु **पार्था**! पैं तोही। सर्व म्यां होऊनि

---

१. पृथ्वी, उदक, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि, अहंकार.

ठेविलें पाहीं । सूत्रीं मणिमाला केली जसी. ॥ ७ ॥ रसरूपीं मीचि वर्त्तें जाण । प्रभा चंद्रसूर्यादी मीचि पूर्ण । शब्द गगनाचा अंश संपूर्ण । तोही मीचि पुरुष पांडवा! ॥ ८ ॥ गंध गुण मी पृथ्वीचा । तेज गुण मी अग्नीचा। जीवन मी सर्वभूतांचा । तपस्वियांचा तप तो मी. ॥ ९ ॥ बीज मीचि सर्व-भूतांचा । सर्वीं सनातन मी पार्था! साचा । बुद्धी मीचि प्रबुद्धाचा । तेजस्वि-यांचें तेज मी. ॥ १० ॥ बळियांचें मीचि बळ । कामरागातीत मीचि केवळ । धर्माविरुद्ध भूतीं निर्मळ । निष्काम धर्म तो मी पार्था! ॥ ११ ॥ सात्विकांचा मी सात्विक भावु। राजस तामस मी आश्रय माधवु । मत मतांतरांचा प्रभावु । मीचि कर्ता अर्जुना!॥१२॥ त्रिगुण माझे रूपीं निर्माण।करूनि जग हें रचिलें पूर्ण।अविद्या करितां जनमोहन । तेणें जीव अज्ञान मज नेणती. ॥१३॥ दैवी प्रकृती जे जन्मले । ते मायेपासूनि मुक्त झाले । ते तों मातेंची पावले। ते उत-रले माझे मायेहुनी. ॥ १४ ॥ न भजतां मातें पातकी मूढ । तो मायामुखीं पडला दृढ । मायेनें ज्ञान हरुनी उघड । आसुरीं भावीं तो केला. ॥ १५ ॥ चतुर्विधा जन मातें । भजति मजची निश्चितें । स्वर्गसुखातें दांभिकमतें । अर्थ स्वार्थे आणी ज्ञानी. ॥ १६ ॥ त्यामाजी ज्ञानी नित्यमुक्त । तो एक भक्ति मातें भजत । ज्ञानियांसी एक प्रिय मी तेथ । तो ज्ञानी संत मजला प्रिय. ॥ १७ ॥ सर्व भावें उदार चित्तें मातें । भजे ज्ञानी माझेनि मतें । आश्रयिलें तेणें मज एकातें । म्यां उत्तम गती त्यातें दीधली. ॥ १८ ॥ अनंत जन्म फिरल्या अंतीं। ज्ञानी पावला मजप्रती । वासुदेव सर्वी जयाचे प्रचीती । तो महात्मा क्षितीं मज दुर्लभ. ॥ १९ ॥ कामिक जे जे जन अज्ञान । कामना कल्पोनि नाना-देवांसी भजन । जो जो नेम करूनि साधन । ते प्रकृती आधीन पैं झाले. ॥ २० ॥ जो जो जैसा करी भक्ती । श्रद्धें जैसें जैसें मज अर्पिती । तैसी तैसी श्रद्धा तयांप्रती । मी निश्चिती फळ देतों. ॥ २१ ॥ जैसा जीवीं धरूनि भाव । जैसे भजती मानव । ते ते कामना स्वयमेव । शुभाशुभ विहिताहित. ॥ २२ ॥ अंतवंतफळाची आशा । त्यालागीं अल्प मती भाव तैसा । एके ठायीं नाहीं विश्वासा । देवानुदेवातें भजती. ॥ २३ ॥ जे जे पाषाण काष्ट प्रति-ष्ठिती । कामनाबुद्धि तेथ तेथ भजती । परी परमार्थभाव नेणती । ज्ञानी वय वेचिती माझ्याचि भजनीं. ॥ २४ ॥ मी सर्वथा बुद्धिप्रकाश नेदीं । पडिले योगमायाबंदीं । मूढ नेणती माझी शुद्धी । मी कैसा कोण म्हणोनी. ॥ २५ ॥ वेदांचा मथितार्थ कैसा । मज वेद नेणें स्वरूपप्रकाशा । जो मी सकळ भूतां सृजीं ऐसा । परी सुख दुःख भूतांचें नलगे. ॥ २६ ॥ माझे इच्छे

करून । प्रपंच परमार्थ रची पूर्ण । परी सर्वां भूतीं मी समान । स्वर्गादि भुवन मजमाजी. ॥ २७ ॥ सकळ अंतर्गत पाप । अथवा पुण्य अमूप । ते योगी मातें अर्पूनि सुखरूप । नित्यनेमें मज भजती. ॥ २८ ॥ जन्म जरा मरण दुःख । माझे भक्त त्यां अतीत देख । मद्भजन तेणें सुख । ते ब्रह्म अध्यात्म पावले. ॥ २९ ॥ अधिभूतांचें मी दैवत । पुरुषांत पुरुषोत्तम निश्चित । अधियज्ञ मी भगवंत । अंतकाळीं मुक्तिदाता.' ॥ ३० ॥ श्रीकृष्णार्जुनवादरणा । निर्वेदी संजय नृपाकारणा । जन्मेजयासी वैशंपायन जाणा । सादरें श्रवणा परियेसीं. ॥ ३१ ॥ तो संवाद भावार्थ अंश । श्रोतयां ऐक म्हणे सावकाश । विश्वंभर गुरुचरणास । भजोनि विश्वास शुभानंदीं. ॥ ३२ ॥

---

## अध्याय तेरावा.

'कोणें तें ब्रह्म अध्यात्म कोण । कर्म अध्यात्म कोण लक्षण । अधिभूत म्हणजे कोण । अधिदैवत कोण सकळा. ॥ १ ॥ अधियज्ञ तो कैसा । देहामाजी हृषीकेशा! । प्रयाणकाळीं ज्ञानिया तैसा । तारिसी कोणेपरी तें सांगें.' ॥ २ ॥ 'अक्षर जाणावें परब्रह्म । तें स्वभावें साधे अध्यात्म । भूतभाव तो विकार विसर्ग कर्म । बोलिजे धनंजया! पैं ऐसा. ॥ ३ ॥ अधिभूत चराचर । पुरुष तो अधिदैवत साचार । अधियज्ञ सोहंमंत्र । देहें देह जो वसवी. ॥ ४ ॥ अंतकाळीं स्मरतां मातें । मुक्ति होय प्राणियातें । माझे स्मरणें ठाकितां देहातें । मुक्ती तयातें वरीतसे. ॥ ५ ॥ जैसा जैसा धरूनि भाव । देह सांडिती जे मानव । तैशा तैशा ते स्वयमेव । सिद्धि होय प्राणियां. ॥ ६ ॥ यालागीं सर्वकाळ मातें । स्मरणें कीजे अभ्यासातें । मनोबुद्धि मज शरण आलियातें । तो मातेंचि पावला. ॥ ७ ॥ म्हणोनि अभ्यासीत जाण । करीत असावें माझें स्मरण । त्यासी अंतीं ब्रह्मनिर्वाण । मुक्ती संपूर्ण मी देतों. ॥ ८ ॥ कवी पुराण फळप्रद सर्वज्ञ । त्याचें अंतकाळीं करितां स्मरण । सर्वदां तो नारायण । कोटि सूर्यसमान योगी ध्याती. ॥ ९ ॥ अंतकाळीं दृढ धरोनि मन । भक्तियुक्त योगबळें करुन । भ्रुकुटी मध्यभागीं लावूनि प्राण । दिव्यरूप पूर्णब्रह्म व्हावें. ॥ १० ॥ वेदें जें शाश्वत म्हणीतलें । तें वैराग्यपात्रीं सांठवलें । इंद्रियें नेमुनी ब्रह्मचर्य धरिलें । तेव्हां पावेल ब्रह्मपद. ॥ ११ ॥ समयीं सर्व द्वारें रोधुनी । मन उन्मन करूनी । ब्रह्मरंध्रीं आत्मध्यानीं । योगधारणीं देह त्यजिती ॥ १२ ॥ ओंकार तो पूर्ण ब्रह्म । अभ्यासें वैराग्य तेथें नेम । करूनि देह

---

१. हें अर्जुनाचें भाषण.

सांडितां उत्तम । योगी परमगती पावला. ॥ १३ ॥ अनन्यप्रकारें चित्तें । नित्य स्मरण करितां मातें । तयांसी सुलभ **पार्था**! निश्चितें । नित्यमुक्तयोगियां.॥१४॥ मज पावले जे जे प्राणी पाहीं । तयांसी पुनर्जन्म सहसा नाहीं । सुख दुःख संसारादि तेंही । सुखें सुखरूप मद्रूपी. ॥ १५ ॥ येरवीं एकवीसस्वर्गपर्यंत । जनासी पुनरावृत्ती न चुके नेमस्त । मज पावले जे भाग्यवंत । त्यांसी पुनर्जन्म नाहीं. ॥ १६ ॥ सहस्र चौकड्या एक दिवसांत । चारीसहस्र युगें नेमस्त । तोही **ब्र**ह्मा अंतवंत । ब्रह्म शाश्वत सुखरूप. ॥ १७ ॥ जितुकें व्यक्तीसी आलें। तितुकें अव्यक्त होईल वहिलें । **हरिहरा**दिक झाले गेले । जैसे रात्री आणी दिवस. ॥ १८ ॥ भूतग्राम तंव भासत । ऐसे होत बहुवेळां जात । जैसी रात्र होउनी दिवस होत । तैसे जन्मत **हरिहरा**दी. ॥ १९ ॥ परंतु दृष्टभावें जाणिजे येथू । आकारलें तें नाशिवंतू । एक ब्रह्म सनातन शाश्वतू । होत जात भूतसृष्टी. ॥ २० ॥ शाश्वत अक्षर परब्रह्म । योगियाची गती उत्तम । होय तें न फिरे जन्मकर्म । तें धाम परम पैं माझें. ॥ २१ ॥ पुरुष परेश तो **पार्था**! । अनन्य भक्तीस्तव सांपडे सर्वथा । सर्वभूतां विसांवा जो तत्वतां । जयापासोनी जग झालें. ॥ २२ ॥ कोणेकाळीं देह सांडितां । योगियां काळभय नाहीं सर्वथा । शरीर सांडणें काळाची वार्ता । तुज **पार्था**! सांगतसें. ॥ २३ ॥ अग्निमार्गे शुक्लपक्ष । षण्मासें उत्तरायण आणी दिवस । उत्तम दिन देह सांडावयास । तेथ ब्रह्मविद् ब्रह्मीं गेले. ॥ २४ ॥ धूम्रमार्गें रात्री कृष्णपक्ष । षण्मासदक्षिणायनीं मुमुक्ष । अर्धचंद्रामृत योगियां प्राप्त । परी कल्पांतीं मागां न फिरती. ॥ २५ ॥ शुक्लपक्ष कृष्णपक्ष । उत्तरायण दक्षिणायनास । तें सांगीतलें संसारिकांस । परी योगी कोणे काळें न फिरती. ॥ २६ ॥ तरी **पार्था**! सत्य हें वेदवचन । योगियांसी नाहीं पुनरागमन । यालागीं **अर्जुना** ब्रह्मसंपन्न । सर्वकाळ योगी होउन राहें तूं. ॥ २७ ॥ वेदपठणें यज्ञकरणें तपें । दानें तीर्थें जें पुण्य जपें । तें अंतवंत जाणूनि साक्षेपें । योगी ब्रह्मरूपीं मिसळले.' ॥ २८ ॥ यापरी ब्रह्मयोग **अर्जुना**सी । श्री**कृ**ष्णें उपदेशिला **कु**रुक्षेत्रासी । **सं**जय सांगे **धृ**तराष्ट्रासी । श्रीगुरु**व्या**सप्रसादें. ॥ २९ ॥ तोचि **जन्**मेजयासी **वै**शंपायन । सांगोनि म्हणे ऐक श्रवण । जो **गी**तार्थ श्री**कृ**ष्णमुखांतून । एकदा जो प्रकट जाहला. ॥ ३० ॥ श्री**गुरु****वि**श्वंभरप्रसादें । **श्रो**तयांसि विनवी **प्रे**मानंदें । **गी**ताभावार्थअंश निरूपण पदें । **शु**भानंद सुछंदें ऐका म्हणे. ॥ ३१ ॥

## अध्याय नववा.

'हें उत्तम गुज सांगतों तुज । ऐकतां न सोडिसी सहज । ज्ञान विज्ञान गुह्य राज । कळतां मोक्ष पावसी. ॥ १ ॥ सकळ विद्यांचा अध्यात्म राजा । सकळ गुह्यांचा स्वामी सहजा । पवित्रांमाजी तेजःपुंजा । स्वधर्म सुखकारी प्राणियां. ॥ २ ॥ श्रद्धाहीन जनासी । हा स्वधर्म न सांपडे परियेसीं । म्हणूनि ते निश्चयेसीं । जन्ममरणपाशीं गुंतले. ॥ ३ ॥ माझिया विस्तारें स्वभावें । हे जन जन्मले आघवे । माझ्या स्थानीं भूतें सर्वें । जन्मती मरती पुनःपुन्हा. ॥ ४ ॥ सूर्यप्रकाश झालिया गगनीं । मृगजळ नसतें भासे नयनीं । तैसा नसतां संसार लोचनीं । राज्यस्थानीं भासतो. ॥ ५ ॥ जैसें आकाश उभें असे । वायू उदरीं खेळतसे । वृक्षीं हालतां वायू भासे । तैसीं भूतें वसती उदरीं मम इच्छे. ॥ ६ ॥ सर्व भूतें हीं अर्जुना! जाण । असती मत्प्रकृतीं लय होउन । मागुतीं प्रकृतीपासून । शरीरें ऐसीं भासती. ॥ ७ ॥ तरी सकळहि भूत प्रकृती । अधिष्ठीं मी सांडीं उपपत्ती । तरी हे वटीं बीजें वटाकृती । तैसा मी भूतीं मजमाजी तीं. ॥ ८ ॥ भूत प्रकृतीचा धर्म कर्म । मज नलगे निरुपम । जैसा दीप प्रकाशें रात्रीं गृहाश्रम । परी दीपास कर्म करणें नसे. ॥ ९ ॥ जैसा सूर्य उदेलियावरी । भूतें वर्तती तदाधारीं । तो नाहीं तों कोण न व्यवहारी । तैसा भूतीं मी दूरी वर्ततों. ॥ १० ॥ मातें न जाणती मूढ । मनुष्य देहीं अभिमानी दगड । आत्मानात्म नेणती जड । जैसें अंध सूर्यासी. ॥ ११ ॥ नश्वरदेहीं नश्वर कर्म । नश्वर ज्ञान नश्वर धर्म । प्रवृत्तिज्ञानें पावले भ्रम । आसुरीप्रकृतिमुखीं पडले. ॥ १२ ॥ महात्मे पार्था! जे माझे संत । जे दैवीप्रकृतिआश्रित । माझेनी अनन्यभजनें मुक्त । होउनी भूतीं वर्तती. ॥ १३ ॥ सदां करिती माझें नामकीर्तन । हेंची तयां दृढव्रत गहन । नमिती मज मानाभिमान सांडुन । जया उपासन अखंड माझें. ॥ १४ ॥ योगी करिती ज्ञानयज्ञ । भेद पशु धूर्त अज्ञान । मनोबुद्धीचें कुंड गहन । एकत्व ब्रह्म आत्म्या परमात्म्या. ॥ १५ ॥ मीचि मुख्य ब्रह्मयज्ञ अग्नी । स्वाहा मी स्वधा मी समिधा मी । आज्य मी मंत्र वेद तो मी । जें ज्ञानोदय झालिया. ॥ १६ ॥ जगाचा आदिपित्ता तो मी । प्रकृति पुरुषें वर्ते तो मी । वेदांचा मुख्य ॐकार तो मी । ऋग्वेद साम यजू पैं. ॥ १७ ॥ गतिदाता कल्पांतीं मी । प्रकृति विसावती परब्रह्मीं । शरणागताची विश्रांति ते मी । प्रभव पालन प्रळय मी बीज. ॥ १८ ॥ सूर्यरूपें मी तपें तीव्र । इंद्ररूपें वर्षें तोय अपार । संहारीं आणि रचीं चराचर । अमृत मृत्यू अर्जुना! ॥ १९ ॥ त्रैविद्य मंत्रीं यज्ञ करिती जनीं । नश्वर सुख स्वर्गीं

इच्छोनी। पुण्य सरता लोटिती मेदिनी। नार्पितां मज नयें भ्रष्ट झाले. ॥२०॥ जंव जंव पुण्य तंव तंव स्वर्गे। पुण्य सरतां पडला अधोमार्गे। एवं करूनि नाना कर्मांगें। भ्रमती योनी अनिवार. ॥ २१ ॥ परी अनन्यभावें भजन। योगी करिती माझें उपासन। तयांचा योगक्षेम करून। मी संपूर्ण पार लावीं. ॥ २२ ॥ आणीक एक आश्रमी जन। यजिती इंद्रिय सोम म्हणून। तेही माझी विभूती असे जाण। परी मुख सांडूनि घ्राणीं ग्रास जैसा. ॥ २३ ॥ मी सर्वयज्ञाचा भोक्ता। सकळांचा प्रभु मी पंडुसुता!। परी अग्नी सांडूनि तत्वता। धूम्रासी दीजे आहुती. ॥ २४ ॥ तरी देवलोकींचे जया आर्त। अथवा पितरांचें जया व्रत। भूतें उपासितां भूतत्व प्राप्त। मद्भजनें मद्भक्त येती मद्रूपीं. ॥ २५ ॥ पत्र पुष्प फळ जळ। योगी भावें अर्पिती केवळ। तें मम मस्तकीं वंद्य सकळ। जें एकभावें अर्पिती. ॥ २६ ॥ जे प्रकृति क्रिया कर्म स्नान दान सकळ। जप तप नेणें घेणें भक्ष समूळ। तें तें भावेंकरूनि निर्मळ। मातें अर्पी तूं अर्जुना!॥ २७ ॥ शुभ अथवा अशुभ फळ। शुभें मोक्ष अशुभें नरक केवळ। संन्यासें मातें अर्पितां सकळ। मुक्त होउनी मज पावसी. ॥ २८ ॥ जैसा दिवस मध्यान्हीं मस्तकीं भानू। तैसा सर्वांतरीं समसमानू। ऐसिये खुणे जाणे जो सज्जनू। तो मी भगवान् स्वयें पार्था!॥ २९ ॥ जो कुळीं अधम महापापी। मातें भजे निर्वाणीं अनुतापी। जैसा काष्ठ भक्षुनी अग्नी काष्ठरूपी। तैसा मीचि तो पार्था! स्वयें झाला. ॥ ३० ॥ तो मीचि झाला म्हणसी कैसा। तरी लवण समुद्रीं भेटतां जाहाला जैसा। पूर्व व्यक्ती मावळली विशेषा। लवण भेटतां महासिंधू. ॥ ३१ ॥ मज पार्था! उपासी तो नर। अधमाधम हो कां खर। स्त्रिया वैश्य तथा शूद्र। ब्रह्म निर्वाण पावती. ॥ ३२ ॥ वर्णामाजी ब्राह्मण थोर। परी राजयोग ब्रह्म नेणतां ते पामर। नश्वर त्रिलोकींचे नर। मद्रूपीं क्षेम पावती. ॥ ३३ ॥ तनु मनें योगी पार्था! मद्भक्त होई। मातें नमस्कार सर्वांठायीं। माझेंचि कीर्तन ऐकें गाई। तेव्हां माझे ठायीं तूं पावसी.' ॥ ३४ ॥ धृतराष्ट्रासी म्हणे संजय। हा श्रीकृष्णार्जुनसंवाद होय। वैशंपायनें जन्मेजयराय। श्रीगुरुव्यासकृपें निरोपिला. ॥ ३५ ॥ प्रभुविश्वंभरश्रीगुरुकृपें। शुभानंदीं गीतार्थ प्रेम मापें। श्रोत्या श्रवणीं भरावया सोपें। विनवीत कृपें अवधानीं. ॥ ३६ ॥

## अध्याय पंधरावा.

'घेई पार्था! हृदयाआंत। वाक्य हें परमामृत। इतुकें बोलिलें निश्चित। मित्र तूं कीं हित पैं तुझें. ॥ १ ॥ मजपासूनि सुरवर। आणी महर्षी योगेश्वर। आणि देवांचा आदि मी सार। महर्षी सर्वां मीची गती. ॥ २ ॥ हे माझेचि मनसंकल्पें जन्मले। म्याचि लोकीं प्रतिष्ठिले। ज्ञानपरायणीं समर्थ केले। ते चुकले पां सर्वथा असे. ॥ ३ ॥ बुद्धिज्ञानें मोहरहित। क्षमासत्यशमदमयुक्त। सुखदु:खभयभवातीत। म्यांचि निश्चित पैं केले. ॥ ४ ॥ प्राणी न मारिती समताज्ञानें तुष्टीं। तपीं ज्ञान दानीं यशस्वी सृष्टीं। भूतें वर्तवावीं उत्तम राहाटीं। भक्तीमतें करूनियां. ॥ ५ ॥ यालागीं महर्षी सातजण। चत्वार मनु सज्ञान। झाले माझिये मनापासून। निर्माण यांपासाव प्रजा असे. ॥ ६ ॥ हे माझे अंश निश्चिती। मजपासूनि जन्मले क्षिती। सर्वथा योगमार्गें वर्तती। दुजयासी उद्धरिती असंशय. ॥ ७ ॥ मजपासूनि निर्माण सर्व। भजनमार्ग मत्प्रभव। ऐसें जाणूनि भजती महानुभाव। बुद्धिमंत भावार्थी जे कां. ॥ ८ ॥ अखंड माझेंचि असे चिंतन। माझे भजनीं जाऊ म्हणती प्राण। त्यांसी ज्ञानप्रबोधीं मीच नारायण। नित्य रमती स्वरूपीं सदां. ॥ ९ ॥ आणीक युक्त माझें भजन। करिती प्रीतिपूर्वक होऊन। त्यांसी उत्तम बुद्धि देऊन। माझें भजन मी वाढवीं. ॥ १० ॥ तयांचें पार्था! अज्ञानतम। नाशीं हृदयीं मीचि आत्माराम। हृदयीं प्रकाशीं ज्ञान उत्तम। सूर्योदयासारिखें.' ॥ ११ ॥ '[1]परब्रह्म परवस्तुधाम। पवित्र सर्वांहूनि उत्तम। पुरुष शाश्वत आत्माराम। देवादिदेव तूं स्वामी! ॥ १२ ॥ आपणापासूनि जन्मले ऋषी। असित देवल नारद परियेसीं। व्यासादि आपले अंश ऐसी। सांगितलेती मजलागीं. ॥ १३ ॥ सर्व आपणची म्हणतोसी। तरी भगवद्रूपें ओळखावीं कैसीं? । देव दानव मानव असती सृष्टीसी। त्यामाजी तुझे अंश कोण? ॥ १४ ॥ सर्वांचा आत्मा मी उत्तम। मजप्रती बोलिलासी पुरुषोत्तम। तरी याचें सांगा वर्म। देवदेवा! जगत्पते! ॥ १५ ॥ सांग मजप्रती दिव्य विभूती। कोणें कोणें रूपें त्वां आवरिली जगती। तूं व्यापक कमळापती। कोणे कोणे घटीं वससी? ॥ १६ ॥ तें सांग अध्यात्म महायोगी। तुझेंचि चिंतन करिती अखंड जगीं। कोणें कोणें रूपें भावूं तुजलागीं। चिंतिजे तें मज सांगिजे. ॥ १७ ॥ विस्तारें आत्मयोग सज्जना। तुझी विभूती सांगें जगजीवना! । ऐ-

---

१. अर्जुनाचें भाषण.

कतां पाविजे तृप्ती श्रवणा । पूर्ण अमृतपाना होय जेणें.' ॥ १८ ॥ मी तुतें सांगतों **पार्था!** । दिव्य अध्यात्मविभूती सर्वथा । हृदयीं धरीं **कुंतीसुता!** । आद्यंत तेजा विस्तारें. ॥ १९ ॥ मी सर्वांचा आत्मा **अर्जुना!** । सर्वभूतांच्या ज्या भावना । आदीमध्यस्थितीरचना । अंतींहि मीचि संहारिता. ॥ २० ॥ तरी सूर्यामध्यें **विष्णुसूर्य** । ज्योतिषांमाजी **रवि** रश्मीय । मरींचीमाजी **मरुद्गण**-वर्य । नक्षत्रीं **चंद्रमा** मी **पार्था!** ॥ २१ ॥ वेदांमाजी मी **सामवेद** । देवांमाजी मी **इंद्र** वज्रायुध । इंद्रियांमाजी मी मन प्रसिद्ध । भूतांमाजी चेतविता. ॥ २२ ॥ रुद्रांमाजी मी **शंकर** । यक्षराक्षसांमाजी मी **कुबेर** । वसूंमध्यें मी **पावक** पवित्र । प्रसिद्ध पर्वतीं मी **मेरु.** ॥ २३ ॥ पुरोहितांमाजी मी **बृहस्पती** । सेनानियांमाजी **स्कंद** निरुती । आदिपूज्यांमाजी मी **गणपती** । जळपात्रांमाजी मी **सागर.** ॥ २४ ॥ महर्षींत मी **भृगु** ऋषीश्वर । वेदवाणींत **प्रणवाक्षर**[1] । यज्ञामाजी मी **जपयज्ञ** साचार । अचळांमाजी **हिमाचळ** मी. ॥ २५ ॥ वृक्षांमाजी मी **अश्वत्थ** । देवर्षींमाजी **नारद** **ब्रह्मसुत** । गंधर्वांमाजी मी **चित्ररथ** । सिद्धांमाजी **कपिलमुनी.** ॥ २६ ॥ अश्वांमाजी मी **उच्चैःश्रव** । अमृतरसाचा मीचि उद्भव । कुंजरीं **ऐरावती** मी **केशव** । नरांमाजी मी **महाराजा** ॥ २७ ॥ आयुधांमाजी मी **वज्र** । धेनुमाजी मी **कामधेनु** पवित्र । संतानहेतु मी काम पंचशर । सर्पांमाजी **वासुकी** मी. ॥ २८ ॥ नागीं मी शेष **अनंत** । दिक्पाळांमाजी **पश्चिमेश्वर** सत्य । पितरीं **अर्यमा** विचित्र । दंडकर्त्यांत मी **यम.** ॥२९॥ दैत्यांमाजी मी **प्रल्हाद** । काल कलयिता मी **गोविंद** । मृगांमाजी मी **मृगेंद्र** । पक्षियांमाजी **गरुड** मी. ॥ ३० ॥ उडणारांत मी **पवन** साचार । शस्त्रधर्त्यांत मी **रघुवीर** । मत्स्यांमाजी मी **मकर** । नद्यांत **जान्हवी** मी जाणा. ॥ ३१ ॥ स्वर्गस्थां आदिमध्य अंत । तो मी **अर्जुना!** ऐक अनंत । सकळविद्यांत अध्यात्मविद्या मी **अच्युत** । तत्ववक्त्यांत **वाद** मी. ॥ ३२ ॥ अक्षरांमाजी मी **अकार** । अयनीं **उत्तरायण** मी **श्रीधर** । अंतीं संहारकर्ता मी प्रळयरुद्र । सृष्टी निर्मिता **ब्रह्मा** मी. ॥ ३३ ॥ सर्वसंहारी मीचि **मृत्यू** । उद्भव करीं मी **अच्युतू** । स्त्रियांमाजी सत्कीर्ती मी **श्रीकांतू** । स्मृति मेधा मी धृती क्षमा. ॥ ३४ ॥ सामांमाजी मी **बृहत्साम** । गायत्री छंद मी पवित्र परम । मासीं **मार्गशीर्ष** मी **आत्माराम** । ऋतुंमाजी **वसंत** मी. ॥ ३५ ॥ **यादवकुळीं** मी **वासुदेव** । **पांडवांमाजी** तूं **सुभद्राधव** । मुनींमाजी **व्यास** मी स्वयमेव । कवींत **शुक्र** **उशना** मी. ॥ ३६ ॥ कापट्यांमाजी द्यूत मी । तेजवंतांत तेज तें मी । व्यवसायीं

[1]. ओंकार.

जय देता मी । सात्विकीं सत्व मी पार्था! ॥ ३७ ॥ दंडकर्त्यांत दमी तो मी । न्यायान्याय नीति मी । मौनगुह्यांत गोप्ता मी । ज्ञानिया ज्ञान मी अर्जुना! ॥ ३८ ॥ यथा सर्वभूतांचा स्वामी । बीजरूपी अर्जुना! मी । मजवीण अणुरेणु तोही मी । मजपासोनी चराचर. ॥ ३९ ॥ नाहीं मजविना पार्था! । सर्वत्र माजी विभूति सर्वथा । यापरी विभूतीविस्तारकथा । तुजप्रती म्यां सांगीतली. ॥ ४० ॥ या माझ्याचि सत्वें विभूती । स्त्रिया आणी पुरुष व्यक्ती । सकळ देव हे सुभद्रापती! । माझें तेजची उद्भवलें. ॥ ४१ ॥ या विरहीत आणिक परी । पार्था! सांगतों अवधारीं । विश्व हें भासतें निर्धारी । तें एक अंशें माझ्याचि जग.' ॥ ४२ ॥ हा श्रीकृष्णें उपदेश अर्जुनासी । धृतराष्ट्रासी सांगे संजय ऋषी । तोचि वैशंपायन जन्मेजयासी । आवडी मानसीं सांगत. ॥ ४३ ॥ श्रीगुरु प्रभु विश्वंभर । शुभानंद तयाचा किंकर । श्रोत्यांसी विनवी वारंवार । गीतार्थअंशनिरूपणा. ॥ ४४ ॥

---

## अध्याय सोळावा.

'अनुग्रहार्थ माझ्या स्वामी! । अध्यात्म गुह्य बोलिलां तुम्ही । तें ऐकतां निर्मोह झालों मी । कृपा शरणागता मज करीं. ॥ १ ॥ सृष्टी पालन संहार । कर्ता एक परब्रह्म साचार । तो महात्मा निर्विकार । आत्मा मातें दाखवी. ॥ २ ॥ एवं जो सकळबीज परमेश्वरु । तें रूप दाखवीं मज साचारु । माझ्याचि देहीं परात्परु । असे कैसा तो मज भेटवीं. ॥ ३ ॥ पाहों ये म्यां असें जरी । तरी मज ब्रह्म दाखवीं मुरारी! । माझ्या सख्या! योगिया! श्रीहरी! । आत्मदर्शन मज करीं तूं.' ॥ ४ ॥ 'पाहें पार्था! आत्मरूप । शतसहस्त्रीं जें विलोकनीं अमुप । नानाप्रकारींचें दिव्य स्वरूप । नानावर्णीं आभासे. ॥ ५ ॥ पाहिलें सूर्यें वासवें आणि शंकरें । अश्विनीदेव मरुत् परात्परें । बहुतीं पाहिलें तें निर्धारें । आश्चर्य पाहीं धनंजया! ॥ ६ ॥ यया एकाचि रूपीं अर्जुना! । पाहें चराचराची रचना । माझे देहीं पंडुनंदना! । सर्वही पाहीं निश्चितें. ॥ ७ ॥ परी स्वशक्ती पाहूं न शकसी । चर्मचक्षूंहीं अदृश्य परियेशी । दिव्य दृष्टी देतों तुजसीं । पाहें तूं योग ईश्वर.' ॥ ८ ॥ संजय म्हणे, 'धृतराष्ट्राया! अवधारीं । बोलिला ऐसें महायोगेश्वर हरी । पार्थासी दाखविलें ते अवसरीं । आत्मरूप श्रीकृष्णें. ॥ ९ ॥ अनेक वक्त्र अनेक नयन । अनेक परि अद्भुत दर्शन । अनेक दिव्याभरण । दिव्यायुधें अनेकें. ॥ १० ॥ दिव्य माळा दिव्य वस्त्रें । दिव्य गंधलेपनें परिकरें । सर्वाश्चर्य रूप निर्धारें । श्री अनंत विश्व-

मुख. ॥ ११ ॥ दिव्य सूर्योदय एक सहस्र । एवढा प्रकाश पाहिला थोर । यापरी भासलें परिकर । तया पार्थासी आत्मरूप. ॥ १२ ॥ तया रूपामाजी सर्व जग । ऐसा प्रत्यय आला सांग । आपणामाजी श्रीरंग । शरीरीं अर्जुन पाहतसे. ॥ १३ ॥ पाहोनि झाला विस्मित । रोमांच उठिला समस्त । करोनि साष्टांग प्रणिपात । कर जोडुनी पार्थ राहिला. ॥ १४ ॥ '[1]पाहिलें म्यां देवा! स्वामी! । जो सर्वभूतीं देहीं अंतर्यामीं । ब्रह्मादि ऋषी अनंतनामीं । दिव्य सर्पादी पाहिलें. ॥ १५ ॥ अनेक वक्त्र अनेक नेत्र । पाहिलें अनंतरूप विचित्र । पाहतां मूळमध्यांत । तो विश्वगत पाहिला. ॥१६॥ दिव्य किरीट दिव्य गदांग । दिव्यचक्रीं विराजित सांग । तेजोराशी दीप्तिमंत आंग । प्रदीप्त अग्नीसूर्या ऐसें. ॥ १७ ॥ तूं शाश्वत वेदवंद्य देव । तूं विश्वेश्वर वासुदेव । तूं अव्यय शाश्वत अधम स्वभाव । तूं सर्व सनातन पुरुषोत्तम. ॥ १८ ॥ आदीमध्य तूं आणि अंत । अनंतपराक्रम अनंत । अनंतकर शशि-सूर्यनेत्र । हुताशवक्त्र विश्व तापविसी. ॥ १९ ॥ पृथ्वी आणी आकाशा । तुवां व्यापल्या अष्टदिशा । देखिलें उग्ररूपासी अशा । जेणें त्रैलोक्या व्यापिलें. ॥ २० ॥ अमूप सुरवर मुनी । भीत भीत कर जोडुनी । महर्षी सिद्ध साधक ध्यानीं । करसंपुटीं तुज स्तविती. ॥ २१ ॥ आणी अकराही रुद्र । द्वादशादित्य अष्टवसू प्रसिद्ध । मरुत् अश्विनौदेव साध्य । सकळही उदरामाजी असती. ॥ २२ ॥ गंधर्व यक्ष सुर सिद्ध । नक्षत्रेंसीं पाहा तो चंद्र । विद्याधर मरुद्गण प्रसिद्ध । करसंपुटीं विस्मित पाहती. ॥ २३ ॥ तया रूपासीं बहुवक्त्र-नयन । अनंत हस्त अनंत चरण । थोर उदर कराळ दाढा वदन । सकळ लोक जया उदरीं. ॥ २४ ॥ आकाशउदरीं प्रदीप्त अनेकवर्ण । व्याप्त त्रैलोक्य विशाळनयन । पाहिला अंतरात्मा भगवान । भयाभीत ईश विष्णु. ॥ २५ ॥ दंष्ट्राकराळा ऐसिया मुखातें । पाहिलें काळानलसंनिभातें । दिशा न दिसती स्वामी! मातें । प्रसन्न होईं तूं श्रीकृष्णा! ॥२६॥ त्वां मारिले धृतराष्ट्रपुत्र । भीष्म द्रोण सहपौत्र । आणीक वीर थोर राजेश्वर । वैरी मुख्य पैं पडले. ॥ २७ ॥ वदनामाजी तुझ्या सकळ । दाढेमाजी वसतें कौरवकुळ । दांतीं चावुनी चकचूर केवळ । करितोसी तैसें भासतें. ॥ २८ ॥ जैशा नदी धांवोनि येती । समुद्रामाजी बळें मावळती । तैशा चौऱ्यासीलक्ष जाती । सामावती तव मुखीं. ॥ २९ ॥ जैसा प्रदीप्तअग्नीवरी पतंग । धांवोनि पडतां जळे सर्वांग । तैसें प्रपंचमार्गी जग । भस्म होय तव मुखीं. ॥ ३० ॥ जैसें शुष्क

---

१. अर्जुन म्हणतो.

तृण अग्नी भस्म करी । तसें जग नासे तुझे उदरीं । मेघमुखीं सिंधुजळ चढे वरी । मागुतीं नदीमुखें जसें मिळे. ॥ ३१ ॥ आतां आच्छादीं ह्या उग्ररूपा । नमन करितों देवदेवा! बापा! । विनंती ऐकें आच्छादीं स्वरूपा । तुझा अंत एकही मज नलगे.' ॥ ३२ ॥ 'काळें काळ जगाचा संहार । मागुती मागुती होय विस्तार । लोकस्थितीचा तो प्रकार । मजमाजी परस्परें होतसे. ॥ ३३ ॥ यालागीं तूं युद्धासी उभा राहीं । निमित्त होउनी यश घेईं । शत्रूतें जिंकोनि पाहीं । राज्य भोगीं पृथ्वीचें. ॥ ३४ ॥ **द्रोण भीष्म ज**यद्रथ । **कर्ण श**ल्यादी वीर अद्भुत । मीं केला पूर्वींच यांचा घात । युद्धीं सपत्नादी हे जिंकीं.' ॥ ३५ ॥ ऐसें **सं**जय **धृ**तराष्ट्रासी **कृ**ष्णवचन । सांगतां **पा**र्थें करसंपुट जोडुन । साष्टांगें सद्गुरुसी केलें नमन । सद्गदित वंदी चरण भीतभीत. ॥ ३६ ॥ 'स्थानें **हृ**षीकेशा! तुझ्या सृष्टीसी । उद्भव स्थिति अंतीं नाशिसी । रक्षण करणारांतें रक्षिसी । संहार करिसी दुष्टांचा. ॥ ३७ ॥ कोण जाणे तुझा महिमा । नाभिकमळीं जन्मला **ब्र**ह्मा । अनंत देव जगन्निवास परमात्मा । शाश्वत रूप एक तुझें. ॥ ३८ ॥ तूं देवाधिदेव पुरातन पुरुष । सकळविश्वनिधान तूं परेश । कर्ता करविता जगदीश । तुझेनी विश्व उद्धरे पैं. ॥ ३९ ॥ **वायु यम अग्नी चं**द्र **व**रुण । **ब्र**ह्मा **प्र**जापती तूं जनक पूर्ण । यालागीं सहस्रवार नमन । पुनरपी साष्टांग नमो नमो. ॥ ४० ॥ नमस्कार नमस्कार । तूं सर्वांचा ईश्वर । अनंतपराक्रम तूं साचार । सृष्टी संहार तुजमाजी. ॥ ४१ ॥ माझा सखा म्हणूनि तूतें । छळणा हेळना केली बहूतें । **या**दव **कृ**ष्ण म्हणूनि निरुतें । न जाणोनी स्वामिया! ॥ ४२ ॥ येतां जातां उठतां बैसतां । विनोदार्थ बोलिलों **अ**नंता! । जेवितां निजतां आणी चालतां । तें सर्वही क्षमा करीं. ॥ ४३ ॥ तूं पिता होसी चराचरीं । तूं सद्गुरुरूप पूज्य मज निर्धारीं । तुजवीण कोण थोर संसारीं । त्रैलोक्य होत जात तुझेनी. ॥ ४४ ॥ यालागीं तुज साष्टांग नमन । तुझिया प्रसादा पावलों **ई**श! **भ**गवान! । जैसा पुत्रासी पिता सख्यासी मैत्र समान । तैसी क्षमा करीं देवदेवा! ॥ ४५ ॥ माझें पूर्वपुण्य गहन । यालागीं कृपा तुझी मजलागुन । विश्वरूप यालागीं केलें दर्शन । **जग**न्निवासा! श्री**कृ**ष्णा! ॥ ४६ ॥ किरीटयुक्त गदा चक्र हातीं । तें रूप पाहेन मी पुढती । तो तूं चतुर्भुज **श्री**पती । विश्वरूपातें आच्छादीं.' ॥ ४७ ॥ 'माझी कृपा तुज गहन । यालागीं आत्मरूप दाविलें जाण । जें ज्योतिर्मय विश्वनिधान । त्वां पूर्वीं ऐसें नाहीं पाहिलें. ॥ ४८ ॥ वेद पठणें यज्ञ करणें

---

१. कृष्ण सांगतो. २. अर्जुन म्हणतो.

जाण । दानदातृत्व तप उग्र पूर्ण । करितां न सांपडे **ब्रह्मज्ञान** । साधुसदयत्वें पूर्णप्राप्ती होय. ॥ ४९ ॥ जो सज्ञानी विवेकी भावार्थी । त्यासी हें रूप दाविजे संतीं । भुलोनि त्याचिये प्रियभक्ती । तें रूप तुज म्यां दाविलें.' ॥ ५० ॥ **सं**जय म्हणे, '**राया! वा**सुदेवें । ऐसें **पा**र्थासी आत्मस्वरूप दाविलें बरवें. । आश्वासोनी मस्तकीं हस्त स्नेहभावें । ठेवुनी सगुण रूप दाविलें. ॥ ५१ ॥ **अ**र्जुन म्हणे, 'श्री**कृ**ष्णा! परेशा! । हें मनुष्यरूप पाहिलें सौम्य अशा । तुझें अमूप तेणें गत मागील दशा । आतां बऱ्यावृत्ति बुद्धीसी स्मृती पावलों.' ॥ ५२ ॥ 'म्यां तुज दाखविलें जें रूप । आत्मतेज जें अमूप । देवांसी सर्वांसी तेजदीप । नित्य इच्छिती दर्शन ययाचें. ॥ ५३ ॥ वेदपठणें दर्शन नाहीं । तपीं दानीं न भेटे कांहीं । सखा म्हणोनी दाविलें पाहीं । साधुसंगें मुक्ती ऐसी. ॥ ५४ ॥ तूं भक्त माझा अनन्य सखा । यालागीं भोगीं आत्मरूप सुखा । सकळ विश्रांतिस्थान देखा । याविण **पा**र्था! आन नसे. ॥ ५५ ॥ मदर्थ अर्पी जें कर्म । माझा भक्त निःसंगधर्म । निर्वैर तया नाहीं काम । तो मद्रूपीं येत **पां**डवा! ॥ ५६ ॥ **कृ**ष्णें विश्वरूप **अ**र्जुनासी । **सं**जय म्हणे दाविलें **धृ**तराष्ट्रासी । **वै**शंपायनें तेंचि **ज**न्मेजयासी । कथोनी परियेसीं पुढें म्हणे. ॥ ५७ ॥ प्रभु **वि**श्वंभर श्रीगुरूसी । नमुनी **शु**भानंद श्रोतयांसी । **गी**ताभावार्थअंश निरूपणासी । पुढें सादरेसीं ऐका म्हणे. ॥ ५८ ॥

---

## अध्याय सतरावा.

'एवं दाविलें त्वां आत्मरूप । भक्तीनें कीजे आराध्य अमूप । यामाजी होइजे जेंवी दीपें दीप । तैसें सांगें योगिराया!' ॥ १ ॥ 'माझ्याठायीं ठेवुनी मन । योगी नित्य करिती उपासन । श्रद्धावंत साधुजन । ते अखंड ध्यानीं मज मिळाले. ॥ २ ॥ एक हें शाश्वत अनिर्देश्य । याचेंचि उपासन योगियांस । सर्वत्र भासतें यासी असे नाश । शाश्वत चैतन्य एक हें. ॥ ३ ॥ यालागीं इंद्रियांतें बंधीं घालिजे । सर्वीं समान आत्मा विलोकिजे । तेणें माझ्या ठायीं सुख भोगिजे । जें सर्वभूतां हितकारी. ॥ ४ ॥ संसारक्लेश सांडोनी । चित्त लाविजे अव्यक्तआत्मस्थानीं । व्यक्त अनात्म जाईल नासुनी । देह गेहादी सकळीक. ॥ ५ ॥ यालागीं नित्य नैमित्य कर्म कीजे । तें संन्यासें मज अर्पिजे । ऐसिया योगें मज भजिजे । उपासीजे पैं मातें. ॥ ६ ॥ तयालागीं मी उद्धरिता । जन्ममृत्यूभयसागरीं तारिता । तया जन्म नये कीं **पा**र्था! । जेणें चित्त तत्वता मज अर्पिलें. ॥ ७ ॥ मन लाविलें माझ्या ठायीं ।

बुद्धीनें मजचा उपासों पाहीं । यालागीं तूं शिष्य होसी पई । तुज थोर नाहीं मजहुनी. ॥ ८ ॥ यालागीं चित्त समाधान करीं । माझे स्वरूपीं स्थीर धरीं । अभ्यासयोगें निर्धारीं । मद्रूपीं साचारीं सांठवसी. ॥ ९ ॥ अभ्यासितां समर्थ ज्ञानी होसी । कर्म ब्रह्मीं अर्पित जासी । यया उद्देशें कर्म करिसी । तरीच सिद्धी साधेल. ॥ १० ॥ यास्तव तूं आतां न शक्त होसी । योगआश्रय करावयासी । सर्वकर्मफळत्यागेंसी । समर्पी मजसीं पांडवा! ॥ ११ ॥ श्रेय ज्ञान शास्त्रअभ्यासीं । त्याहूनि ध्यान विशेषीं । ध्यानाहूनि कर्मफळ त्यागेसीं । शांती परियेसीं त्या अधिक. ॥ १२ ॥ जयाचें सर्व भूतांसी आवरण । सर्वांघटीं सूर्यासारिखा पूर्ण । ज्या मोहाहंकार नाहीं संपूर्ण । सुख दुःख समान क्षमा असे. ॥ १३ ॥ संतुष्टमनें ऐसा योगी । जो दृढनिश्चयें आत्मसुख भोगी । मन बुद्धि अर्पूनि मजलागीं । तो भक्त जगीं मज वंद्य. ॥ १४ ॥ तो वर्ततां दिसतो लोकीं । परी लोकीं ना तो मजसन्मुखीं । हर्षामर्षभरीं न वदे मुखीं । तो मुक्त मातें बहु प्रिय. ॥ १५ ॥ जैसें जळ सारिखें सर्वांसीं तृषा हरी । तैसा कोठेंही द्वेष न धरी । शुभाशुभकर्मत्याग करी । तो भक्त मातें बहुप्रिय. ॥ १६ ॥ जो संसारीं अनपेक्ष । जो परमार्थबुद्धी आचरे दक्ष । उदासपणें लोटी आयुष्य । तो भक्त मातें बहु प्रिय. ॥ १७ ॥ जया शत्रु मित्र समान । तैसाचि मान अपमान । शीत उष्ण मनीं नाणुन । सुख दुःख जया सारिखें. ॥ १८ ॥ निंदा स्तुती समान दोनी । संतुष्ट स्वल्प शेषदानी । विषयानेकें चंचळ नोहे मनीं । तो भक्त मातें प्रिय पार्था! ॥ १९ ॥ हा धर्मामृतवर्षाव केलासे पार्था । तुवां याचिपरी वर्तावें आतां सर्वथा । ऐसिये श्रद्धेकरुनी मज भजतां । तूं भक्त मातें प्रिय होसी.' ॥ २० ॥ ऐसा भक्तियोग अर्जुनासी । श्रीकृष्णें सांगितला परियेसीं । म्हणे संजय धृतराष्ट्रासी । जन्मेजयासी वैशंपायन ॥२१॥ प्रभुविश्वंभरश्रीगुरुतें । नमुनी विनविलें श्रोतयांतें । शुभानंद म्हणे पुढिलिया अर्थातें । गीतार्थअंशातें ऐकिजे. ॥ २२ ॥

---

## अध्याय अठरावा.

'प्रकृति पुरुष म्हणिजे कोण । क्षेत्र क्षेत्रज्ञ म्हणिजे कोणालागुन । ज्ञानज्ञेयाचें लक्षण । कैसें तें सांगावें केशवा!' ॥ १ ॥ 'हें शरीर कुंतीपुत्रा! । क्षेत्र ऐसें जाणिजे पवित्रा । याच्या चाळिण्या खेळवी जो सूत्रा । तो क्षेत्रज्ञ ऐसें जाणिजे. ॥ २ ॥ क्षेत्रज्ञ म्हणिजे समान सर्वक्षेत्रीं । हें जो पाहे ज्ञाननेत्रीं । तो मीचि पार्था! निर्धारीं । हेंची मत पैं माझें. ॥ ३ ॥ यालागीं नरदेह म्ह-

णिजे क्षेत्र सेत । तेथ पेरिलें तैसें पिके निश्चित । पाप पुण्य नाहीं इतर योनी आंत । नरदेहांत उभय फळें. ॥ ४ ॥ ऋषी बोलिले अनेक मतांतरीं । वेदछंदीं विविध परी । असो विस्तार यासी निर्धारीं । ब्रह्मसूत्र दोरीप्रमाण चाले. ॥ ५ ॥ महाभूतांचे पंचवीस गुण । अहंकार बुद्धीसी अदृश्य क्षेत्रज्ञ । कर्मेंद्रियें ज्ञानेंद्रियां आधीन । त्यांत पंचइंद्रियां क्षेत्रज्ञ मिळेना. ॥ ६ ॥ इच्छा द्वेष सुख दुःख । संगयुक्त धृती चेतना देख । हें क्षेत्र पिके अनेक । या विकारीं निर्विकार आत्मा. ॥ ७ ॥ मान नको अणुप्रमाण । जया दंभ नाहीं प्राणी न मारी पूर्ण । शांत आर्जव सद्गुरु उपासन । जो शुचि आत्मनिष्ठ कीं. ॥ ८ ॥ जया वैराग्य इंद्रियांच्या ठायीं । जयाचे मनीं अहंकार नाहीं । आत्मस्वरूपीं अचळ पाहीं । जन्ममरणदुःख न पावे तो. ॥ ९ ॥ अनासक्त वर्ते संसारीं । स्त्रीपुत्रगृहादी विचारीं । नित्य समता चित्ताभीतरी । इष्ट अनिष्ट भोग आलिया. ॥ १० ॥ ऐसिये परी अनन्य । जया दुजी भक्ती नाहीं कोण । अनेक हिंडतां देश पूर्ण । आत्मानुसंधान न विसंबे. ॥ ११ ॥ नित्यानित्य अध्यात्मज्ञान । क्षणक्षणा तत्वज्ञानदर्शन । ययातें बोलिजे ज्ञान । किमपी अज्ञान जेथ नाहीं. ॥ १२ ॥ ज्ञेय सांगतों अवधारीं । हें ज्ञान झालिया शरीरीं । मग अनादि ब्रह्म हें भासे चराचरीं । यास नाश नाहीं हें जाणिजे. ॥ १३ ॥ सर्व करचरण इंद्रियीं । मस्तकीं मुखीं अंतर्बाह्यीं । सर्व शास्त्र वेदीं एवं वर्णिलें पाहीं । सर्वांतरीं एकचि असे ॥ १४ ॥ सर्व इंद्रिय गुणचाळिता । जो सर्वेंद्रियातीत सर्वथा । आसक्तपणें सर्वां देहीं वर्तता । तो भोक्ता गुण निर्गुण. ॥ १५ ॥ चर अथवा अचर भूतीं । बाह्य अंतरीं याचीच वस्ती । सूक्ष्म आकाशीं एकची क्षिति । प्रत्ययें झालें तें ज्ञेय पार्था ॥ १६ ॥ अनपेक्ष शुचिर्भूत । उदासीन वय वैराग्यें लोटित । सर्वसंकल्पविकल्पातीत । तो उत्तम भक्त मम प्रिय. ॥ १७ ॥ भक्त अथवा विभक्त । समान परमार्थें मानित । भूतीं पाहे भूत नाथ । तें ज्ञेय यथार्थ अर्जुना! ॥ १८ ॥ ज्योतीमाजी उत्तम आत्मज्योती । ते अज्ञानतमें आवरिली होती । ते सुविवेकें उघडितां निश्चिती । तें ज्ञेय सर्वांतरीं व्यापक. ॥ १९ ॥ ऐसें क्षेत्र क्षेत्रज्ञ ज्ञान । त्यासी ज्ञेयत्वें ज्ञेय पूर्ण । मद्भक्त जाणती विज्ञान । मद्भावें मातें पावती. ॥ २० ॥ आतां प्रकृती आणी पुरुष । अनादी जन्म यांस । विकारी गुण माया प्रकाश । यालागीं प्रकृती जन्मली. ॥ २१ ॥ कार्य कारण कर्तव्य पूर्ण । हे प्रकृतीचे पार्था! गुण । पुरुष सुखदुःखभोक्तृत्वेंकरून । हेतुपासाव बंधन पावला. ॥ २२ ॥ पुरुष प्रकृतीपासोन । सुखदुःखभोग प्रकृतीसंगेंकरून । त्रिपुटी त्रिगुणात्मक

होउन । जन्ममरण कर्में सोसी तो. ॥ २३ ॥ यालागीं जें जें निपजे कर्म । तें भोक्ता अभोक्ता महेश्वर परम । परमात्मा ब्रह्म आत्माराम । पाहें तो प्रकृती अतीत पुरुष. ॥ २४ ॥ प्रकृती गुणातीत होउन । जो वर्ते देहीं त्या अतीत होउन । सर्वथा जन्मकर्मबंधन । नाहीं तयासी अर्जुना! ॥ २५ ॥ ध्यानीं आत्मा एक पाहें । कचित् आत्मयाविणें नेणताहे । सांख्ययोगें तो वर्तताहे । अथवा कर्मयोगें मज पाहूं. ॥ २६ ॥ कोणे मार्गीं आलिया मातें । श्रवणें कीर्तनें उपासक चित्तें । तो तरला संसार प्रकृतीतें । जन्म मृत्यु श्रुत दृष्ट ना हें तेव्हां कळे. ॥ २७ ॥ जेव्हां अनुभवें सांपडलें ब्रह्म । सत्वयुक्त तेव्हां भासे स्थावर जंगम । क्षेत्र आणी क्षेत्रज्ञ वर्म । तें साचार तेव्हां कळे. ॥ २८ ॥ समान सर्वभूतीं असे परमेश्वर । नाशवंत प्रकृति नाशती साचार । जो हें ज्ञान जाणे तो निर्धार । ज्ञानिया ऐसें जाणिजे. ॥ २९ ॥ समान पा- हणें सर्वांतरीं । सुख दुःखीं आपण जयापरी । जो आत्मरूप होउनी भेद दवडी दुरी । तो उत्तम गति पावला. ॥ ३० ॥ प्रकृतिकर्में जें भोगणें । अथवा संचित करणें । तें भोगणें आणी उगाणें । परमात्मा कर्ता जो जाणती. ॥३१॥ ऐशा नाना योनी भूतें । एकात्म पाहे निरुतें । तैसें आकारलें ब्रह्मांडातें । ब्रह्म निश्चितें जाणीतलें. ॥ ३२ ॥ अनादी निर्गुण परमात्मा । तो मी म्हणे स्वयें आत्मा । शरीरकर्मा आणी धर्मा । कर्ता करविता एकची. ॥ ३३ ॥ जरी अ- णुरेणुहुनी लहान । परी आकाशामाजी पूर्ण । तरी त्रैलोक्यांतरीं आत्मा वसोन । अलिप्त नोहे सर्वथा. ॥ ३४ ॥ जैसा सूर्यउदय प्रातःकाळीं । प्रकाशवंत पा- हिजे जनीं सकळीं । क्षेत्रक्षेत्रीं तैसा आत्मा निराळीं । वसोनी प्रकाश भासत. ॥ ३५ ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञलक्षण । जो ज्ञानचक्षूंनीं लक्षी पूर्ण । तो भूतप्रकृतीमाजी जीवन । अंतीं पद निर्वाण पावेल.' ॥ ३६ ॥ धृतराष्ट्रासी म्हणे संजय ऋषी,। ऐसें श्रीकृष्णें अर्जुनासी । कथिलें तेंची जन्मेजयासी । वैशंपायनें क्षेत्रक्षेत्रज्ञ- योग जो. ॥ ३७ ॥ श्रीगुरुविश्वंभर प्रभुसी । शुभानंद लागोनी चरणासी । गीताभावार्थअंश श्रोतयांसी । सादरें ऐका म्हणतसे. ॥ ३८ ॥

---

## अध्याय एकोणिसावा.

'पार्था! बोलतों तें ऐक । ज्ञानामाजी ज्ञान चोख । हें जाणती ऋषी मुनी देख । परमसिद्धीप्रती गेले. ॥ १ ॥ हें ज्ञान ज्यांहीं उपासिलें । ते धर्ममार्गें मातें पावले । स्वर्गमृत्युलोकीं नाहीं जन्मले । जन्म मरण प्रळय नेणती. ॥ २ ॥ मजपासाव जन्मला ब्रह्मा । त्यासी धरिला म्यां नाभिपद्मा । जो निर्माण करी

भूतयामा । कुंलाल भांडीं ज्यापरी. ॥ ३ ॥ चौऱ्याशी लक्ष योनी । उठती पंचात्मक आधारेंकरुनी । ते ब्रह्मादिक जन्मती मजपासुनी । बीजप्रद पिता मी. ॥ ४ ॥ सात्विक राजस तामस । यागुणीं प्रकृतीजन्म अशेष । त्रिगुणात्मक बंध जीवांस । देहदेहांतरें मी रचीं. ॥ ५ ॥ त्यामाजी सत्व निर्मळ गुण । आत्मप्रकाशसाधनीं निपुण । त्यासीच आत्मसुख साधेल जाण । ज्ञानसंगेंकरूनियां. ॥ ६ ॥ रजोगुण हा विषयीं प्रीतिकारक । रजोगुणासी तृष्णा अधिक । तो बंधना पावेल सहज देख । कर्म देहांतरीं हिंडे. ॥ ७ ॥ तम जो कां अज्ञानगुण । विषयद्वारें जीवांसी मोहन । प्रमाद आलस्य निद्रा पूर्ण । तेणेंची बद्ध होय पार्था ! ॥ ८ ॥ सत्वगुणीं पावेल आत्मसुख । रज कर्ममार्गें बंध देख । अज्ञानें ज्ञान आवरिलें आणीक । प्रमाद तो ऐक तमोगुण. ॥ ९ ॥ रजतमाचे मध्यभागीं । सत्वगुण उठतो जगीं । तमोगुण उठतां वेगीं । रज सत्व तरी दडपती. ॥ १० ॥ ज्ञानेंद्रियीं विवेक होय । अध्यात्मपरमार्थीं प्रीती होय । तेव्हां सत्वगुण वाढला निश्चय । ऐसें चित्तीं ओळखिजे. ॥ ११ ॥ लोभ उपजे चित्तीं । कर्ममार्गें चाले प्रवृत्ती । तेव्हां रजोगुण वाढला निश्चिती । ऐसें चित्तीं ओळखिजे. ॥ १२ ॥ परमार्थ विवेक मंद होये । प्रवृत्तिमार्गें वर्तताहे । मोह प्रमाद उपजतां, पाहें । तो तमोगुण ऊठिला. ॥ १३ ॥ जेव्हां सत्वगुण वाढे देहीं । देह सांडितां तयासमयीं । तेव्हां तामस दोष याच्या ठायीं नाहीं । उत्तम गती तो पावला. ॥ १४ ॥ जो जो गुण वाढला पाहीं । देह त्यागी तया समयीं । तेव्हां अवश्य विषयीं । मूढयोनीप्रती जन्मेल. ॥१५॥ निर्मळ कर्म, निर्मळ सुकृत, । निर्मळ सात्विक फळ देत । रजाचें दुःखफळ प्राप्त । अज्ञानफळ तमाचें.[2] ॥ १६ ॥ सत्वगुणापासोनी होय ज्ञान । रजोगुणें लोभ निर्माण । प्रमाद अज्ञान मोह पूर्ण । तमापासोनी पैं होती. ॥ १७ ॥ ऊर्ध्व गती सत्वगुणें । कर्मभूमी रजोगुणें । अधोगती तमोगुणें । प्राणियांतें पैं होय. ॥ १८ ॥ गुणावेगळी करणी नाहीं । ते कर्मानुसार पाहीं । जे गुणातीत वर्तती देहीं । ते माझ्या ठायीं पावले. ॥ १९ ॥ त्रिगुणात्मक झालिया तईं । देहदेहांतीं फिरती पाहीं । गुणातीत वर्ततां तेही । जन्ममरणदुःख नाहीं तयां.' ॥ २० ॥ 'त्रिगुणातीत तो ओळखावा कैसा ? । गुणातीत तो आचरे कैसा ? । हें सांगावें जगदीशा ! । कृष्णा ! परेशा ! मजलागीं.' ॥ २१ ॥ 'प्रकाशप्रवृत्तीमोह-

---

१. या ठिकाणीं 'महत्तत्त्व ब्रह्म' व 'ब्रह्मदेव' या दोहोंत शुभानंदांनीं घोंटाळा केला आहे. शुभानंदांनीं बरेच वेळां गीतावचनांचे विक्षिप्त तऱ्हेनें अर्थ केलेले आढळतात. अशीं स्थळें या व पुढील अध्यायांत बरींच आहेत. २. सर्वसंग्रहपाठः—'अज्ञानफळ तयाचें.'

पूर्ण । विषय आशापाश गहन । कल्पनासंगें जन्मकर्मबंधन । ते त्रिगुणात्मक जाणिजे. ॥ २२ ॥ उदास वर्ते संसारीं । तो गुणातीत जाणावा निर्धारीं । वर्ततां गुणामाजी शरीरीं । तो ब्रह्मीं पाहीं मिसळला. ॥ २३ ॥ जया सुख दुःख समान । समान मृत्तिका कांचन । रिपु मित्र समसमान । निंदा स्तुती सारिखी. ॥ २४ ॥ समान मान अपमान । मित्र वैरी नाहीं परिपूर्ण । सर्व संकल्प कल्पना न असे जाण । तो गुणातीत जाणावा. ॥ २५ ॥ भक्तीच्या ठायीं दुजें नाहीं । एक भावें भातें सेवी पाहीं । सगुणरूप देखतां पंई । ब्रह्मभावें तो मज भावी. ॥ २६ ॥ जो ब्रह्मीं प्रतिष्ठित झाला । जन्म मृत्यू-पासूनि सूटला । शाश्वतधर्मपंथें जो वर्तला । ऐक तं[1] तां माझा भक्त तो पार्था !' ॥ २७ ॥ ऐसा गुणत्रयविभाग जाण । श्रीकृष्णें कथिला अर्जुनाकारण । तोचि संजयें धृतराष्ट्रालागुन । जन्मेजया वैशंपायनें कथिला. ॥ २८ ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभर । शुभानंद विनवी जोडून कर । गीताभावार्थांश सादर । श्रोते ! चतुर परियेसा. ॥ २९ ॥

---

## अध्याय[2] विसावा.

'ऊर्ध्व मूळ खांदिया तळीं । विश्वाश्वत्थवृक्ष वाढे कर्मजळीं । या संसार-वृक्षीं चौऱ्याशी लक्ष दळीं । फळें महदादिक आणी देव. ॥ १ ॥ वरुनी तळीं विस्तारें थोर । लांब खांदे त्रिगुण साचार । विषय मूळें अनिवार । कर्में नर-लोकीं गुंफिले. ॥ २ ॥ इतरवृक्षतळीं मूळ । मारितां पडति तत्काळ । तैसा नव्हे हा भववृक्ष केवळ । ज्ञानशस्त्रें मूळावरी छेदिजे. ॥ ३ ॥ ते उत्तम नर गेले उत्तममार्गीं । ब्रह्मीं पावले न फिरती मागीं । तोचि एक म्हणावा योगी । जो पुरातनब्रह्मीं समरसला[3]. ॥ ४ ॥ जो कां मानमोहातीत । जिंकिले षड्रिपु अद्भुत । अध्यात्ममार्गीं सुखदुःखातीत । तो अमूढ गेला मत्पदीं. ॥ ५ ॥ जेथ चंद्रसूर्यपावकाविणें ज्योती । जेथ पावलिया मागां न फिरती । तें माझें धाम सुनिश्चितीं । कृपेनें तूतें जें दाविलें. ॥ ६ ॥ जीव सकळ माझे अंश । जीवभूतांचा मी ईश । जो मनोमार्गें चाळी इंद्रियांस । प्रकृतीपर होउनी. ॥ ७ ॥ शरीरीं मी कैसा पाहीं । तैसा परिमळ पुष्पाचे ठायीं । प्रकाशी वायु परिमळ तंई । तैसा विस्तारीं मी प्रकृतीगुण. ॥ ८ ॥ कर्णीं नयनीं जिव्हा घ्राणीं । मना अधिष्टानीं मी अलिप्तपणीं । सकळद्वारीं मी वसोनी । विषय मीचि सेवितों. ॥ ९ ॥ उठवीं बैसवीं चालवीं बोलवीं । जेववीं मीचि नीजवीं ।

---

१. तूं. २. यांत गीतेचा पंधरावा अध्याय आला आहे. ३. एकरूप झाला.

मूढजन मातें नेणती स्वभावीं । ज्ञानी मज नयनीं पाहती. ॥ १० ॥ जे जे योगमार्गे आले । ते आत्मदर्शनें धाले । येतांची आत्मरूप झाले । लवण जैसें समुद्रीं. ॥ ११ ॥ सूर्य प्रकाशे तें माझें तेज । जनीं उजेड करी सहज । चंद्र शीतळ मी तेजःपुंज । अग्निही तेज पैं माझें. ॥ १२ ॥ भूतें ग्रामवासी अथवा वनीं । तेज मी तयांचें चक्रपाणी । वृक्ष औषधी मीच जनीं । चंद्र अमृतकर मी पार्था! ॥ १३ ॥ मीचि आहार सेवीं जठराग्नी । प्राणियां उदरीं मी आश्रयोनी । प्राणापानात्मक होउनी । चतुर्विध अन्नें मी पचवीं. ॥ १४ ॥ मी सर्वांच्या हृदयभुवनीं । वेदशास्त्रामृतमतज्ञानप्रेरक मोहनी । वेदमार्गप्रवर्तक मीच जनीं । आणी वेदपर मी वेदवंद्य. ॥ १५ ॥ दोहीं प्रकारें दोघे पुरुष जनीं । मी वर्ते चराचर होउनी । क्षर चर, अक्षर अचर जनीं । चराचरमंडणीं[1] मी पार्था! ॥ १६ ॥ यापरता उत्तम पुरुष । तोचि मी परमात्मा जगदीश । जेणें व्यापिलें त्रैलोक्यास । शाश्वतरूपें मी ईश्वर. ॥ १७ ॥ चरातें खेळवीं अलिप्तपणीं । अथवा करीं अचरसंहारमांडणी । वेदमार्गे कर्मप्रवर्तक जनीं । तो उत्तम पुरुष पुरुषोत्तम मी. ॥ १८ ॥ अज्ञानें आवरिले मूढ । मज पुरुषोत्तमातें नेणती जड । तूं सर्वभावें मजची दृढ । करोनी भजें भारता! ॥ १९ ॥ ऐसें हें गुह्य उत्तम । तुज सांगितलें म्यां शास्त्र सुगम । यामाजी तूं होसी विचक्षण परम । तरी कृतकृत्य होसी भारता! ॥ २० ॥ हा उपदेश श्रीकृष्णें अर्जुनास । केला, म्हणे संजय धृतराष्ट्रास । तोचि जनमेजया राजयास । वैशंपायनें कथियेला. ॥ २१ ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभरास । नमुनी म्हणे श्रोतयांस । गीताभावार्थांशश्रवणास । कीजे सादरें शुभानंद. ॥ २२ ॥

## अध्याय[2] एकविसावा.

'साधनीं निर्भय सत्वशीळ । ज्ञानयोग देहाभिमान दानकुशळ । इंद्रियदम जप यज्ञ अध्ययन तप निर्मळ । आर्जव तो पुरुष दैवी पार्था! ॥ १ ॥ प्राणी न मारी, क्रोध न ये, सत्य बोले,। विषयत्याग शांत परनिंदा न बोले । भूतांवरी कृपा, क्षुधा तृषा पाहूनि[3] चाले । मृदुत्व लज्जित तो दैवी पार्था! ॥ २ ॥ तेजस्वी क्षमाविनीत शाहणे । शौच भूतद्रोह कृत्रिम नेणे । हीं दैवीपुरुषांचीं लक्षणें । तुज संपूर्णे सांगीतलीं. ॥ ३ ॥ दांभिक उग्र अभिमानी । क्रोध स्पर्धा निष्ठुरता जयामनीं । तो आसुरी पुरुष ओळखीजे जनीं । अज्ञान विवेकशून्य जो. ॥ ४ ॥ मुक्तीलागीं दैवीगुण । बद्धतेचें आसुरी लक्षण । दैवी सं-

---

१. व्यापिलें. २. यांत गीतेचा सोळावा अध्याय आला आहे. ३. येथें कदाचित् 'साहूनि' असा पाठ असावा.

पदा उत्तम गुण । ऐक संपूर्ण पांडवा ! ॥ ५ ॥ स्वर्गनरकांचीं[1] दोनी लक्षणें । दैवी आसुरी दोनी गुणें । दैवी सांगीतली विस्तारानें । आसुरी ऐकें पूर्ण अर्जुना ! ॥ ६ ॥ प्रवृत्ती षड्रिपुजननी । निवृत्तीतें घाली दवडुनी । शौच आचार सत्य वाणी । तया कल्पांतीं पैं नाहीं. ॥ ७ ॥ असत्य तेंची प्रतिष्ठा करी । जग नश्वर तें मनीं शाश्वत धरी । परस्परें वर्ततां लोकाचारीं । कामसंकल्प मनीं वाहे. ॥ ८ ॥ कामविषयीं खेळवी नयन । नंष्टात्मा तो अल्पमती पूर्ण । उग्रकर्मी सदा मलिन । हिंसक दुर्जन पापात्मा. ॥ ९ ॥ कामाचारीं आश्रय करी । दांभिक दुरभिमान जन्मे भारीं । मोहाचाचि संग्रह करी । सर्व काळ व्यसनी अशुची. ॥ १० ॥ जंव देह पडे जन्मे निर्धारीं । ऐसा प्रळयकाळवरी । कामादिभोगीं आवडी थोरी । वदे वैखरी विषयलोभें. ॥ ११ ॥ आशापाशें संसारबंधी । कामक्रोधाची उपाधी । वर्ते कामाचे विचारें त्रिशुद्धी । आणीक विचार न करी दुजा. ॥ १२ ॥ म्हणे माझे इच्छे मिळत । मीचि कुलीन मीचि धनवंत । मीचि बहुमानी पंडित । जग चालतें ममाज्ञें. ॥ १३ ॥ विवेकवैराग्यभक्ति गुण । म्हणे म्यां मारिले शत्रुगण । भोगीन विषय भोग पावन । ईश्वर मीचि सिद्धही मी. ॥ १४ ॥ किडा वसोनी महानरकीं । म्हणे मीचि भोगी श्रेष्ठ, मीचि सुखी । कुबेरादिक[2] त्रैलोकीं । माझेचि दास म्हणतसे. ॥ १५ ॥ तैसे असुर दुर्जन । अखंड चंचळ तयांचें मन । मोहपाशीं पडले कामभोगाचेन । अधोगती तयां नरकीं देहांतीं. ॥ १६ ॥ आपण म्हणती चिरंजीव । धनमानमदें मानिती गर्व । करणें यज्ञादीक दांभिक सर्व । मरोनी रौरव भोगिती. ॥ १७ ॥ अहंकारें अती दर्प । कामक्रोधादी वागवीत सर्प । म्हणे विश्वीं मीचि सुखरूप । ऐसा कृपण गर्वधारी. ॥ १८ ॥ तो नर महाद्वेषी क्रूर अधम संसारीं । बंधीं पडला असे साचारीं । चुकला मार्ग सारासारीं । आसुरी प्रकृतीनें गिळिलें तया. ॥ १९ ॥ आसुरयोनी जो जन्मला । जन्मजन्मांतरीं मूढची झाला । पार्था ! तो नयेची मजला । गेला अंधतमामाजीं. ॥ २० ॥ नरकद्वारींचे हे पाहुणे तिनी प्रखर । काम क्रोध लोभ हे साचार । यालागीं पार्था ! सांगतों निर्धार । या तिघांतें आवरिजे. ॥ २१ ॥ यापरी आसुरीहोनी सुटले । पुरुष अथवा स्त्रिया[3] वहिले । जे आचार बरवा आचरले । ते परमगतीतें पावती. ॥ २२ ॥ यया आसुरीशास्त्रा-

---

१. मूळांतील 'द्वौ भूतसर्गौ' या शब्दांवरून 'स्वर्गनरका'विषयीं कल्पना शुभानंदांस सुचलीसें वाटतें. २. मुळांतील 'यक्ष्ये दास्यामि' यावरून 'यक्ष–कुबेर–माझे दास' ही कृति उत्पन्न झाली, अशी शंका येते. ३. 'तमोद्वारैस्त्रिभिर्नरः' हे मूळांतील शब्द.

चेनि मार्गें । कामीक वर्तती कामांगें । तयां सिद्धी नाहीं उभय मार्गें । इहत्रीं ना परत्रीं असे. ॥ २३ ॥ यालागीं धर्मशास्त्रधर्मनिरूपण । कार्याकार्य चालावया प्रमाण । शास्त्रमार्गें करोनियां ज्ञान । तैसें कर्म करीत जावें पार्था! ॥ २४ ॥ ऐसा दैवीआसुरीविभाग । श्रीकृष्णें अर्जुनासी कथिला सांग । धृतराष्ट्रासी संजय म्हणे चांग । वैशंपायनें जन्मेजया निरोपिला. ॥ २५ ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभरानुग्रहें । शुभानंद श्रोत्यांसी म्हणे वाहें । गीताभावार्थांशनिरूपण हें । सादरें ऐका म्हणतसे ॥ २६ ॥

---

## अध्याय बाविसावा.[1]

'यया शास्त्रमार्गातें सोडुन । संसारीं वर्तती सकळ जन । तरी तयांची निष्ठा कोण । सात्विक राजस कीं तामस?' ॥ १ ॥ 'शास्त्रमार्गें वर्तती जन । तयांमाजी **श्रद्धा** तीन । सात्विक राजस तामस गहन । देहप्रकृतीसारिखे. ॥ २ ॥ सात्विक जयाची असे स्थिती । सात्विक श्रद्धा तया निश्चितीं । राजस तामस जयांची प्रकृती । तैसी श्रद्धाही राजस तामस. ॥ ३ ॥ सात्विक उपासिती देवांतें । यक्षराक्षसांस भजती राजस ते । झोटिंगभूतप्रेतांतें । भजती ते जन तामस. ॥ ४ ॥ तपोजन तपीं वनवासी । अशास्त्रमार्गें तेथ वर्तती तामसी । दंभाहंकार तया ज्ञानासी । जया कामक्रोधें मनासी आवरिलें. ॥ ५ ॥ फळाशा धरोनी मनीं । राजसी करिती नाना साधनीं । माझे ठायीं नैराश्यभाव मनीं । धरोनी भजती ते सात्विक. ॥ ६ ॥ **आहार**ही सर्वांतें ऐसेच रीती । तिघांसी तींपरीची प्रीती । यज्ञ तप दान देती । त्यांची भेदस्थिती ऐक पार्था! ॥ ७ ॥ आयुष्य सत्ववृत्ति निरोग । बळ प्रीती भजनीं वाढवी सांग । कंद मूळ क्षीर पवित्र धान्य अनेग । सात्विका प्रिय मधुर आहार. ॥ ८ ॥ अती उष्ण क्षार कडु आंबट । आणखी दाहक तिखट । आहार असे हा राजसां इष्ट । दुःख शोक व्यथा देत जो. ॥ ९ ॥ निषिद्ध अशुभ शिळें । मांसभोजन प्रिय आगळें । उच्छिष्ट अन्नें मन न कंटाळे । तें भोजन प्रिय तामसां. ॥ १० ॥ न धरी फळाची आशा । निष्कामें समर्पी जगदीशा । विनीतपणें कार्य करी साचा । तो सात्विक **यज्ञ** जाणावा. ॥ ११ ॥ फळाशा धरोनी मनीं । मज श्रेष्ठ ऐसें म्हणावें जनीं । ऐसा कर्तव्य करी यज्ञीं । तो राजस यज्ञ अर्जुना! ॥ १२ ॥ अविधिकर्म यज्ञ । कुपात्र द्विजदक्षिणाशून्य । दुजयावरी कल्पोनी न्यून । श्रद्धाहीन तो यज्ञ तामसी. ॥ १३ ॥ देवद्विजगुरुसंतपूजन । शौच

---

१. यांत गीतेचा सतरावा अध्याय आला आहे. २. 'यजंते श्रद्धयान्विताः' असें मूळ.

आर्जव ब्रह्मचर्य नेम गहन । प्राणी न मारी तें संपूर्ण । **पार्था! तप** जाण शरीराचें. ॥ १४ ॥ न बोले उद्वेगी असत्य । प्रिय बोले जें पराचें हित । अखंड वाची पोथी अभ्यासयुक्त । तें तप **पार्था**! वाचेचें. ॥ १५ ॥ मन संतप्रसादें सौम्य । मौनप्रवृत्ति निग्रहें नेम । भावें भजे **पु**रुषोत्तम । तें मनाचें तप **अर्जु**ना! ॥ १६ ॥ त्रिविध श्रद्धातप कोण । तेंही सांगतों ऐक लक्षण । फळआशा सांडोन । मत्प्राप्ती गहन सात्विक तप. ॥ १७ ॥ बहुमान वागवी मनीं । श्रेष्ठ म्हणावें जनीं । यालागीं तपस्वी झाला मुनी । तो राजस तपी बोलिजे. ॥ १८ ॥ मूढपणें करी जप । दुजयासी पीडणें पश्चात्ताप । द्यावया, शरीर आयुष्य वेची अमूप । तो तामस तपी बोलिले. ॥ १९ ॥ दातृत्वें द्विजां देतां दान । देतो न उपकारयुक्त होउन । देश काळ पवित्र पाहोन । तें सात्विक **दान अर्जु**ना! ॥ २० ॥ दुजया करुनी उपकार । फळाशा कल्पोनी अपार । दान देतो तो नर । राजस जाणावा **अर्जु**ना! ॥ २१ ॥ देश अपवित्र काळ अपवित्र । दान घेता ब्राह्मण कुपात्र । श्रद्धाहीन अज्ञान नर । तें दान साचार तामसी. ॥ २२ ॥ पूर्वी ॐकारीं वेद बोलिला ब्रह्म । जगीं निर्दोष त्रयी नेम । ब्राह्मण वेद यज्ञकर्म । विहिताचार बोलिजे. ॥ २३ ॥ त्यामाजी श्रेष्ठ संपूर्ण । यज्ञदानतपःक्रिया पूर्ण । यांचें योगी जाणती विधान । जे ब्रह्म निर्वाण पावले. ॥ २४ ॥ जगीं फळाशा न धरोनी । यज्ञतपःक्रिया कीजे जनीं । दानक्रियाही निष्कामपणीं । मोक्षइच्छुक पैं करिती. ॥ २५ ॥ सद्भावें साधुत्वपणें । देणें घेणें कर्म करणें । मज अर्पी मत्प्राप्तीकारणें । तें कर्म सात्विक बोलिलें. ॥ २६ ॥ यज्ञ आणि तप दान । त्यांचें तुज सांगीतलें लक्षण । फळाशें सांग एकासी बंधन । एकासी मोचन मद्भावें. ॥ २७ ॥ न करोनी तुवां यज्ञ दान । अथवा तप गहन । तरी आतां फळाशा सांडोन । **पार्था**! अर्पण करीं मजलागीं.' ॥ २८ ॥ ऐसियापरी **अर्जु**नासी **श्री**पतीं । कथिलें **सं**जय म्हणे भूपती । तेंचि **जन्मे**जया! म्यां तुजप्रती । कथिलें **श्रीव्यास**कृपेनें. ॥ २९ ॥ श्रीगुरुप्रभु**वि**श्वंभरदास । **शु**भानंद विनवी श्रोतयांस । **गी**ताभावार्थांशश्रवणास । टाकूनि आळस ऐकिजे. ॥ ३० ॥

## अध्याय तेविसावा.[२]

'संन्यासाचें कवण लक्षण ? । गृहदारा त्यागितां संन्यास संपूर्ण । किंवा आणीक असे तत्व कारण ? । तें मज सांगिजे हृषीकेशा!' ॥ १ ॥ 'काम्य

१. येथें मूळांत तीन श्लोकांत 'सत्' आणि 'असत्'क्रिया यांचें विवेचन आहे. परंतु शुभानंदी तीन ओव्यांत त्याचा मुळीं उल्लेखही नाहीं! २. यांत गीतेचा अठरावा अध्याय आला आहे.

सांडोनी केलें कर्म । तो संन्यास **पार्था**! उत्तम । सर्वकर्मफळ त्यागिजे, स्वधर्म। तो संन्यास उत्तम **अर्जुना**! ॥ २ ॥ अथवा गृहस्थाश्रमकर्म त्यागिलें । पूर्ण ज्ञानेंवीण वहिलें । यज्ञ दान तप नित्यनैमित्तिक भलें । दोषीं सांपडले नर. ॥ ३ ॥ तरी निश्चयें ऐक वचना । **त्याग** तो कैसा वीरा! **अर्जुना**! । तरी तयाचा त्रिविधजना । सात्विक राजस तामस. ॥ ४ ॥ यज्ञ दान तप कर्म । त्याज्य करावयाचें वर्म । न त्यजितां तो अधर्म । परम पावन त्यागितां. ॥ ५ ॥ यथायोग्य कर्म कीजे । त्या कर्मफळाची आशा न कीजे । कर्म ब्रह्मार्पण कीजे। तें मत सात्विक उत्तम. ॥ ६ ॥ नेमीक आम्ही संन्यासी । कर्म न लगे आम्हांसी । ब्रह्म नेणतां त्यागी कर्मासी । तो तामस त्याग **पांडवा**! ॥ ७ ॥ कायक्लेशास्तव कर्म त्यागी । दुःख आलियाही कर्म त्यागी । तो राजस त्याग जाणिजे जगीं । त्यागफळ तया कैसें? ॥ ८ ॥ कार्याकारण नित्य नैमित्त । यथायोग्य कर्म आचरत । फळाशा त्यागोनी कर्म त्यागित । तो सात्विक त्याग **पांडवा**! ॥ ९ ॥ व्यंगतेविना कर्म करी कुशळ । यथाकाळें पुण्यक्षेत्रीं निर्मळ । अथवा नित्यनैमित्त फळ । माझिया लाभार्थ जो **पार्था**! ॥ १० ॥ नाहीं देहलोभ जया । क्वचित् फळाशा नसे तया । कर्म ब्रह्मीं अर्पी भावार्थें यया । तो त्याग संन्यास बोलिजे. ॥ ११ ॥ अनिष्ट एकाचें इच्छुनी कर्म करी । अथवा शरीरलोभें परी । अथवा उभय फळें इच्छुनी तरी । तो क्वचित् संन्यासी **पार्था**! ॥ १२ ॥ पांचप्रकारें **कर्मलक्षण** । तेंही तूज सांगतों पूर्ण । **सांख्य**शास्त्रीं केलें निरूपण । ते मतें सर्वकर्मसिद्धि. ॥ १३ ॥ एक कर्तृत्वाभिमानें कर्म करी । एक देहलोभें तरी । एक अनिष्ट लोकांसरी । एक देवप्रीत्यर्थ करी **पार्था**! ॥ १४ ॥ कायिक वाचिक मानसिक । कर्मे करिती जगीं लोक । एक नीतिमार्गे चालती देख । एक विपरीत करी पंच प्रकारींचें. ॥ १५ ॥ परी कार्याकारण ओळखितां । मी हृदयीं आत्मा असें सर्वथा । ज्ञानी मज पाहोनी वर्तती **पार्था**! । मूर्खअज्ञानीं नेणिजे. ॥ १६ ॥ जया नाहीं कर्तृत्वाभिमान । म्हणे कर्ता श्री**भग**वान । तो जरी पावला काळें मरण । कीर्तिजीवनीं तो ज्ञानी मुक्त. ॥ १७ ॥ ज्ञान आणी ज्ञेय परिज्ञान । तिघांचेंही कर्म मुक्त पूर्ण । कर्तृत्वाभिमानें देहलोभें अनिष्ट गुण । कर्मसंग्रह ययाचा. ॥ १८ ॥ जो ज्ञानिया कर्म करी । त्रिगुण भेद हे निर्धारीं । तयां गुणाची कवण परी । ते विस्तारीं ऐक **पार्था**! ॥ १९ ॥ सर्वभूतीं **भग**वंत । समता जया संतकृपे

---

१. याचा मूळाशीं कांहींच संबंध नाहीं. २. मूळगीतावचनांत व या शुभानंदी ओव्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे.

प्राप्त। भक्त विभक्त नोळखे भेद तेथ। तें **ज्ञान** सात्विक अर्जुना! ॥ २० ॥ ज्ञान प्राप्त झालें पूर्वपुण्यें। परी कल्पना सांडिली नाहीं मनें। भेद पाहे भूतीं गुणागुणें। तें ज्ञान राजस पांडवा! ॥ २१ ॥ दावोनि योगियांचें चिन्ह। पोशी रसना आणी शिश्न। वैराग्यविरहित अतत्वार्थवचन। तें तामस ज्ञान भारता! ॥ २२ ॥ नित्यनेमें संगरहित। कामक्रोधद्वेषविवर्जित। फळाशा न धरी विवेकवंत। तें **कर्म** सात्विक अर्जुना! ॥ २३ ॥ फळाशा कामना मनीं। प्रयत्नें कर्म करी जनीं। देहलोभातें स्मरोनी। तें राजस कर्म पैं पार्था! ॥ २४ ॥ परातें द्वेषें मारणें। अथवा कारागारीं बंध करणें। आपणासी लाभ होणें। ऐसें कल्पी तें तामसी. ॥ २५ ॥ मुक्तसंग जो सत्यवादी। विचक्षण युक्त कार्य साधी। सिद्धि असिद्धि निर्विकारविकारबंधी। तो सात्विक **कर्ता** जाणिजे. ॥ २६ ॥ भोगी कर्मफळ आशा। लुब्ध प्राणी मारक ऐसा। हर्ष आपणा, शोक परासी साचा। इच्छूनि कर्ता तो राजस. ॥ २७ ॥ अयुक्त कर्म सर्वदा करी। अज्ञानशठजनातें वरी। विषाद मनीं बहुकाळवरी। दीर्घसूत्री तो तामस कर्ता. ॥ २८ ॥ बुद्धी भेद आणी धृती। ते तिनी गुण ऐक निश्चिती। दुर्गुण सांडावया क्षितीं। धनंजया! तुजप्रती बोलतों. ॥ २९ ॥ प्रवृत्ती मारों निघे निवृत्तीं। कार्यकारणीं भय निर्भय चित्तीं। बंधमोक्षासी उपाय चिंती। ते **बुद्धि** पार्था! सात्विकी. ॥ ३० ॥ कांहीं धर्म कांहीं अधर्म। कांहीं कर्म कांहीं अकर्म। आपुलाची लोभ मने सुगम। ते बुद्धि पार्था! राजसी. ॥ ३१ ॥ अधर्म तोची धर्म मानी। धर्मशास्त्रीं धर्मनिरूपण न मनी। सर्व प्रकारें निष्ठुर करणी। तो तामसबुद्धि अर्जुना! ॥ ३२ ॥ धृतिविवेकें आवरी मन। इंद्रियें ठेविलीं आवरोन। योगमार्गें मजएकाचें भजन। ते सात्विक **धृती** अव्यभिचारी. ॥ ३३ ॥ लोभें देहाचिया धर्म करी। कामसंकल्प अंतरीं। कर्म प्रसंगें फळ इच्छी शरीरीं। ते धृती पार्था! राजसी. ॥ ३४ ॥ स्वप्नभय शोकभय। विषाद मद मनीं ध्याय। द्वैत न तुटे, दुर्बुद्धि न जाय। ते धृती पार्था! तामसी. ॥ ३५ ॥ **सुख** नरातें त्रिविध परी। तेंही ऐक अर्जुना! निर्धारीं!। अभ्यास केलिया ऐशापरी। दुःखांतूनि संसारी जन सुटे. ॥ ३६ ॥ प्रारंभीं केवळ विषाऐसें। परिणाम अमृताहूनि आगळा दिसे। तें सात्विक सुख जाणावें तैसें। जें संतप्रसादें आत्मरूपीं आलें. ॥ ३७ ॥ विषय इंद्रियां भेटतां पूर्ण। पहिलें तें सुख अमृतासमान। परिणामीं संसारबंधन। विषास-

---

१. सर्वसंग्रहाचा 'सार्थक' असा पाठ आहे. २. मूळगीतावचनांत व या शुभानंदी ओवींत जमीनअस्मानाचें अंतर आहे. ३. सर्वसंग्रहाचा 'धृत्ति' असा पाठ आहे.

मान, तें राजस सुख. ॥ ३८ ॥ परिणामीं ग्रास विषाहूनि कडू । जैसें मत्स्यांसी आमिष गोडू । प्रमाद आलस्य निद्रेसी बहु रूढू । तें तामसी सुख अर्जुना ! ॥ ३९ ॥ सात्विक शुद्धसत्वें जीवन्मुक्त । राजसां येराझार स्वर्गमृत्य । तामसां पृथ्वीवरी योनी अनंत । हे गुण निश्चित त्रिगुणाचे. ॥ ४० ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । यांचे कोण गुण स्वभाव प्रसिद्ध । तेही ऐक म्हणे **गोविंद** । **अर्जुना**तें आवडी. ॥ ४१ ॥ शमदमादी अष्टांगसाधन । तप शौच शांती आर्जव गहन । ज्ञान पावोनि व्हावें विज्ञान । हें **ब्राह्मणकर्म अर्जुना** ! ॥४२॥ शुचि तेजस्वी विवेकी शहाणा । युद्ध न सोडी सांडितांही प्राणा । दानीं उदार ईश्वरभावना । तें सहज **कर्म क्षत्रियांचें**. ॥ ४३ ॥ कष्टें करोनी शेत करणें । गुरें रक्षोनी वणिज होणें । **वैश्यकर्म** हें जाणणें । सेवा करणें पैं **शूद्रें** ॥ ४४ ॥ स्वकर्मे निवडिलीं जयापरी । जनीं वर्ततां ते सिद्धी पावे निर्धारीं । स्वकर्मसिद्धी कैशियापरी । म्हणसी तें ऐक **अर्जुना** ! ॥ ४५ ॥ एवढी भूत-सृष्टी जाहाली । ते मद्रूपीं विस्तारली । स्वकर्मे [2]चालाया म्यां आज्ञा केली । तैसेंचि चालतां ते निर्दोष. ॥ ४६ ॥ स्वधर्म श्रेय सांडोनि दुरी । जो पर-धर्माचें आचरण करी । तेणें वेदाज्ञागळसरी । तोडोनि, नरकीं तो गेला. ॥ ४७ ॥ यालागीं सहज वर्णकुळकर्म । दुष्ट सांडी तोचि अधम । सर्वे प्रकारें धूम्र निंद्य परम । परी अग्नी तया न सोडी. ॥ ४८ ॥ असक्तबुद्धी सांडी संसारविषयीं । जो संतप्रसादें जितात्मा निष्क्रिय विषयीं । [3]नैष्कर्म्यसि-द्धीच्या लागल्या पाहीं । तो [1]परंपरा संन्यासी ब्रह्मीं गेला. ॥ ४९ ॥ जे जे मार्गे सिद्धि पावे ब्रह्म । तें तें तुज बोधिलें वर्म । तरी करोनी इंद्रियांसी नेम । निष्ठा ज्ञानें भोगीं **पार्था** ! ॥ ५० ॥ बुद्धीचे निंद्यविषय त्यागी । विवेकी मन नेमी आत्ममार्गी । शब्दादि विषयां त्यागी । काम्यकल्पनासमवेत. ॥ ५१ ॥ अवाच्य वाचेसी ये बहू बोलतां । तेणें मनीं ज्ञानाभिमान वाढे सर्वथा । या-लागीं मन लावी अभ्यासध्यानपंथा । वैराग्य आश्रय करोनी. ॥ ५२ ॥ अहंकारें बल दर्प स्पर्शो नये मनीं । कामक्रोधादि घालावे दवडुनी । तो सूटला संसारबंधनीं । ब्रह्मसदनीं पाविजे. ॥ ५३ ॥ ब्रह्म पा-वोनी सुप्रसन्न । शंकाकांक्षा कैसी हें नाठवी मन । जया अनुभवी सर्वांतरीं पाहे भगवान । मद्भक्त मद्भजनें मज पावला. ॥ ५४ ॥ भक्ती माजी

---

१. मूळगीतावचनांत व या शुभानंदी ओवींत जमीनअस्मानाचें अंतर आहे. २. 'चालाव्या' असा सर्वसंग्रहाचा पाठ. ३. 'नैष्कर्मसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति' असें मूळ.

नकळे जना । जेणें भक्ती मजमाजी येईल जाणा । तरी जो पावला तत्वज्ञान अर्जुना! । तो मग विशेषभक्त पुरा. ॥ ५५ ॥ यालागीं सर्व कर्म जें करणें । त्याभाजी फळत्यागें ममाश्रयें येणें । मग माजे प्रसादें पावणें । शाश्वत पद पैं माजें. ॥ ५६ ॥ तरी कायिक वाचिक मानसिक । कर्म मज एकचित्तें अर्पावें देख । बुद्धी प्रबुद्धयोगीं मदाश्रयीं चोख । राजसमान तो होय. ॥ ५७ ॥ एकचित्तें आश्रयितां मातें । तो मत्प्रसादें तरला भवाब्धीतें । कचित् अहंकार आलिया चित्तें । जन्ममरण त्यातें सुटेना. ॥ ५८ ॥ यालागीं अहंकार-कर्तृत्व न कीजे । केलिया संसारदुःख अनुभविजे । मिथ्याव्यवसायीं न धरिजे । देहाभिमान मी कर्ता. ॥ ५९ ॥ यास्तव स्वभावें जें जें आलें । स्वकर्मे चा-लतां बद्ध नव्हे वहिलें । कर्तृत्वमाजी जेणें अभिमान केले । तयाचें गेले नर-देह वृथा. ॥ ६० ॥ ईश्वर सर्वभूतीं वसे । तो तों नानासूत्रें खेळवीतसे । तयातें नेणोनी जग झालें पिसें । जैसा शुक नळिके कवळितां. ॥ ६१ ॥ यालागीं तुझिया हृदयस्थातें । पार्था! शरण जाई तूं एकचित्तें । त्याचेनि प्रसादें परमशांतीतें । शाश्वतरूपातें पावसी. ॥ ६२ ॥ ऐसें ज्ञान म्यां तुज केलें । गुह्याहुनी गुह्य कथिलें । जैसें तुझिया मनीं आलें । तैसें करीं पांडवा! ॥ ६३ ॥ सर्व गुह्य तुज सांगीतलें । माझेनि मुखें त्वां ऐकिलें । तरी माझा इष्ट तूं होसी वहिलें । यालागीं कथिलें तुझें हित. ॥ ६४ ॥ मननेमेंसीं माझा भक्त होई । सर्वांतरीं मज नमस्कारी पई । मज आश्रयितां तूतें पाहीं । प्रीति-पूर्वक तूं प्रिय माझा. ॥ ६५ ॥ यालागीं सर्व धर्म सांडीं । मज एकाचे चरण जोडीं । सकळ दोषां करोनी देशधडी । मोक्ष गुडी लाविसी. ॥ ६६ ॥ तरी हा उपदेश नेदीं कोणा । तापसांविना माझिया भक्तीविना । अशौचां अनाचारियां खुणा । न बोलें सर्वथा अर्जुना! ॥ ६७ ॥ हें गुह्यामाजी गुह्य परम । मद्भक्त पावती मजसम । होउनी, माझे भक्ति पाहीं जया नेम । त्यासी सर्व उपदेशीं. ॥ ६८ ॥ यालागीं इतर मनुष्यांप्रती । कचित् न बो-लावी उपपत्ती । तुजविण प्रिय मज नाहीं क्षितीं । म्हणोनी निश्चितीं तुज कथिलें. ॥ ६९ ॥ आधींच तूतें असे मी । यालागीं धर्मसंवाद केला आम्हीं । ज्ञानयज्ञें तो रचिला मीं । तुझे स्वहितइच्छेकारणें. ॥ ७० ॥ तरी श्रद्धावंताचे संगतीं । जड मूढ जन हे श्लोक ऐकती । मननें तयां होय मुक्ती । पुण्य-प्राप्ती अनंता. ॥ ७१ ॥ तरी किंचित तुवां वहिलें । जें एकचित्तें ऐकिलें । तरी मोह अज्ञान नाशलें । कीं राहिलें? सांगें अर्जुना!' ॥ ७२ ॥

१. या ओवीचा मूळ श्लोकांशीं मुळींच मेळ नाहीं.

'नाशला माझा अज्ञानमोहो । तुझेनि प्रसादें अच्युता! पाहो । संदेहाविरहित झाला देहो । तुझी आज्ञा वंदीन मस्तकीं.' ॥ ७३ ॥ 'ईतुका वासुदेवें अर्जुनाप्रती । संवाद केला निश्चितीं । तो ऐकतां मातें नृपती । रोमांच उठिले सर्वांगीं. ॥ ७४ ॥ व्याससद्गुरुप्रसादेंकरुन । गुह्य तें प्राप्त मजलागुन । जें योगेश्वर श्रीकृष्ण भगवान । कथिलें स्वमुखें पार्थासी. ॥ ७५ ॥ ऐसें ऐकें धृतराष्ट्रनृपती! । हा संवाद दुर्लभ क्षितीं । केशवें अर्जुनपुण्यास्तव निश्चितीं । प्रकट केला दीनोद्धारा. ॥ ७६ ॥ तें एक ऐक बरव्या परी । जें विश्वरूप दाविलें श्रीहरी । तो विस्मय काय निर्धारीं । पुनःपुनः अनुवादें. ॥ ७७ ॥ जय येईल आपुलिया सुता । ऐसें वाटे तुझिया चित्ता । जेथ योगेश्वर, पार्थ धनुर्धर असतां । विजयलक्ष्मी तेथ असे. ॥ ७८ ॥ वैशंपायन म्हणे जन्मेजया! । श्रीकृष्णें कथिलें धनंजया । तें संजयें धृतराष्ट्रराया । कथिलें तेंची तुजलागीं. ॥ ७९ ॥ हें जो ऐकेल भक्तिपूर्वक । किंवा वाचील प्रीतिपूर्वक । त्यासी ज्ञान होउनी देख । पावेल मोक्ष श्रद्धेनें. ॥ ८० ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभर । शुभानंद विनवी जोडून कर । श्रोत्यांसी म्हणे वारंवार । ऐका सादर [२]भीष्मपर्व. ॥ ८१ ॥

## अध्याय चोविसावा.

संजय म्हणे, 'धृतराष्ट्राजया! । श्रीकृष्णें अर्जुना उपदेशूनियां । अर्जुनाचा मोह नेला विलया । तया रणठाया ते समयीं. ॥ १ ॥ गीता हे भवानी सतेजा । अष्टादशाध्याय तिच्या भुजा । बोध त्रिशूळ घेऊनि राजा! । दैत्य कुतर्क मर्दिले. ॥ २ ॥ पार्थाचे हृदयीं मोह थोर । हाचि माजला होता महिषासुर । बोधशस्त्रें छेदुनी शिर । पांयाखालीं बैसविला. ॥ ३ ॥ अर्जुनाचे हृदयीं अंधार । पडला असतां निबिड घोर । तेथें सातशें श्लोक दिवाकर । उदया पावले एकदांची. ॥ ४ ॥ धृतराष्ट्राचा एक श्लोक । दुर्योधनाचे नव देख । संजयाचे बत्तिस आणीक । ऐशी चारी पैं पार्थाचे. ॥ ५ ॥ पांचशें चौऱ्याहात्तर सुरस । ते स्वयें बोलिला जगन्निवास । एवं सातशतें गीता निःशेष । महापुरुष उपासिती. ॥ ६ ॥ [३]गीता हे कामधेनु जाणा । अर्जुनवत्सासी घातला प्रेमपान्हा । तेंच दुभतें संतजना । परिपूर्ण अद्यापी. ॥ ७ ॥ कीं गीता हे पदक अवधारा । त्यावरी जोडिले हिरे अठरा । पार्थ प्राणसखा जाणोनी खरा । कंठीं

---

१. येथून संजयाचें भाषण आहे. २. भीष्मपर्वांतर्गत भगवद्गीतापर्व येथें संपलें. ३. ओवी ७–१० यांतील विचार खुद्द शुभानंदस्वामीचे आहेत.

त्याचे घातलें. ॥ ८ ॥ अष्टादशपुराणांचें सार । कीं अष्टादश पुराणें कोंदलीं द्रव्यें अपार । [1]गीतामांदुसेंत भरुनी कमळावर । समर्पीत अर्जुनातें. ॥ ९ ॥ साहा अध्याय कर्मकांड जाण । अध्याय साहा पूर्ण उपासन । साहा अध्याय दिव्य ज्ञान । त्रिकांड संपूर्ण वेद हा. ॥ १० ॥ असो अर्जुनासी ज्ञान अद्भुत । गीता बोधूनि क्षीराब्धिजामात । निजरथावरी बैसविला स्वस्थ । पुढें कथार्थ परिसिजें. ॥ ११ ॥ वैशंपायन म्हणे जन्मेजयनृपती ! । अर्जुन उपदेशूनि श्रीपती । पुढां कैसें केलें रणक्षिती । तें तूं निश्चितीं श्रवण करीं. ॥ १२ ॥ धर्म रथाखालीं उतरोन । शस्त्रें कवचें सर्व ठेवुन । दोनी हात जोडोन । कौरवसेनेंत चालिला. ॥ १३ ॥ कौरव धर्मासी निंदिती । क्षत्रियधर्मा टाकिलें म्हणती । जीवभयें शरण येती । भीष्मालागीं वाटतें. ॥ १४ ॥ चौघेही बंधु वेगें । धांवती धर्माचे पाठिमागें । कौरवां आनंद सर्वांगें । म्हणती बरें झालेंसे. ॥ १५ ॥ दोनीं दळींचे राजे समस्त । म्हणती काय झालें विपरीत । पांडव झाले शरणागत । परम नीच कर्म हें. ॥ १६ ॥ कौरवीं वस्त्र उडविलें वहिलें । म्हणती पांडव शरण आले । तेव्हां वाद्यघोष उगेची राहिले । शब्द न बोले कोणी तेथें. ॥ १७ ॥ कां पांडव गेले कर जोडुन । हें एक जाणे श्रीकृष्ण । इतर दोहीं दळींचे वीर पूर्ण । भ्रमणचक्रीं पडियेले. ॥ १८ ॥ असो भीष्माजवळी येउन । पांडवीं अनुक्रमें वंदुन । पुढें बद्धांजळी उभा राहोन । अजातशत्रु विनवीत. ॥ १९ ॥ म्हणे, '[2]जनकजनका ! गुरुनायका ! । निजकुळवल्लीपाळका ! । युद्ध करावया आम्हां सेवकां । आज्ञा यावरी होय कीं ?' ॥ २० ॥ मग बोलिलें देवव्रतें, । 'तुम्ही जरी न पुसतां येउनी मातें । तरी मी कोपोनी तुम्हातें । पुसणार होतों निश्चयें. ॥ २१ ॥ आतां तुम्हांसी मी प्रसन्न । जय पावाल निश्चयेंकरून । तुम्हीं भिडावें निर्भय होउन । समरागारीं आम्हांसीं.' ॥ २२ ॥ धर्म म्हणे, 'जी ! निजविचार । सर्वज्ञा ! सांगें वारंवार । भेटीस येईन मी साचार । क्षणक्षणा महाराजा ! ॥ २३ ॥ तुजपासोनी सत्य । आम्हासीं कैसा जय प्राप्त ?' । भीष्म म्हणे, 'हा वृत्तांत । पुढें येईं, तुज सांगेन.' ॥ २४ ॥ मग पितामह नमुन । द्रोणाचे वंदिती चरण । कर जोडोनी स्तवन । करिती प्रेमें आवडीं. ॥ २५ ॥ अर्जुन सद्गद होउनी । भाळ ठेविलें द्रोणचरणीं । म्हणे, 'गुरुवर्या ! समरांगणीं । तुज मी कैसें युद्ध करूं ? ॥ २६ ॥ या शरिराच्या पादुका करुन । तुझे चरणीं लेवविल्या पूर्ण । तरी तुझे उपकारा नव्हे

---

१. गीतारूपी संदुकेंत, पेटींत. २. आजोबा !

उत्तीर्ण । कधींही निश्चयें गुरुवर्या ! ॥ २७ ॥ तुझिया उपकारें दाटलों फार । कैसे सोडूं मी तुजवरी शर?' । द्रोण म्हणे, 'धर्मयुद्ध साचार । करितां दोष कष्ट नसे. ॥ २८ ॥ तुम्हांसी जय होईल प्राप्त । कौरव क्षय पावती समस्त । तुम्हीं आरंभीं येऊनि भेटलेत । इतुकेन तृप्त मी असें. ॥ २९ ॥ जिकडे आहे वैकुंठविलासी । तिकडेच जय यश निर्दोषीं । धर्मा! तुझें मानस इच्छी । तें मी पुरवीन जाण पां.' ॥ ३० ॥ तरी धर्म म्हणे, 'आम्हांसी जय । तुज पासूनि कैसा प्राप्त होय?' । मग संतोषोनी द्रोणाचार्य । वर्म सांगे शेवटींचें.॥३१॥ 'मजसीं अर्जुनावांचोनी । भिडेसा नसे समरांगणीं । शेवटीं महामुनेश्वर येवोनी । माझिये कर्णीं सांगतील. ॥ ३२ ॥ तद्बोध कर्णीं ऐकोनी । शस्त्रें माझीं मीचि ठेवुनी । योगदीक्षा आकळोनी । मी जाईन निजधामा.' ॥ ३३ ॥ कृपाचार्य मनें सुप्रसन्न । म्हणे, 'तुम्हांसी होय जय कल्याण । मी चिरंजीवी, मज नाहीं मरण । युद्ध निर्वाण करा तुम्ही.' ॥ ३४ ॥ 'तुम्हांसी जय हो प्राप्त' । म्हणतां, तोषले पंडुसुत । मग गुरुसी पुसुनी, शारद्वत । वंदोनी प्रेमें स्तविला. ॥ ३५ ॥ मग कर्णशल्यासी जाणा । भेटले पांडव पांचहीजण. । धर्म बोले कर जोडुन । नेमवचन रक्षावया. ॥ ३६ ॥ 'कर्णाचें सारथ्य करोनी । तेज भंग करावें क्षणक्षणीं'. । शल्यें 'अवश्य' म्हणोनी । आज्ञा देता पैं झाला. ॥ ३७ ॥ मग स्वदळांत येऊन । रथारूढ झाले पांचहीजण । कीं ते पंच चंडकिरण । कृष्णकृपांबरीं उगवले. ॥ ३८ ॥ कृष्णकृपेनें बळाद्भुत । दिसती पांडव समर्थ । कवचें अळंकारमंडित । सिद्ध झाले दळभारें. ॥ ३९ ॥ तेव्हां रणतुरांची घायी लागली । एकेचि वेळे दोहींदळीं । त्यांत भीमें हाक फोडिली । भयें दचकला [2]बळी तेव्हां. ॥ ४० ॥ पांच पांडव आणी वनमाळी । यांहीं [3]त्राहटिले शंख बळीं । दोहींदळीं वीरांच्या हाकेतळीं । डोलों लागली [4]कुंभिनी. ॥ ४१ ॥ महारथी कांपले सर्वत्र । गजाश्व करिती मूत्र । त्रिभुवन कांपलें सर्वत्र । म्हणे कृतांत दुसरा हा. ॥ ४२ ॥ चपळा चपळत्वें धावे परम । तैसा परदळीं प्रवेशे भीम । कीं असंख्यपापांवरी नाम । श्रीकृष्णाचें एक जैसें. ॥ ४३ ॥ कीं [5]असंख्यदंदशूकांसी विहंगमनायक । कीं अजाभारीं प्रवेशे निर्भय वृक । तैसा प्रवेशतां कौरवसैन्यीं देख । म्हणती कृतांत दुसरा हा. ॥ ४४ ॥

---

१. मुळांत थोडा फरक आहे तो असाः—धर्मराज हे भीष्म, द्रोण, कृप आणि शल्य यांजकडे युद्ध करण्याबद्दल आज्ञा आणि आशीर्वाद मागण्यास गेले. नंतर श्रीकृष्ण कर्णाकडे साहाय्य मागण्यास गेले, पण तें त्यानें नाकारिलें. (अ० ४३ श्लो० ८९,) २. पातालांतील राजा. ३. वाजविले. ४. भूमी. ५. असंख्यसर्पांसी.

तंव दुर्योधनादी बंधु समग्र। शतही धांवले महावीर। अपार सोडिती महाशर। भीमावरी एकसरें. ॥ ४५ ॥ तितुक्यांचेही बाण। छेदोनि पाडी भीमसेन। शरशरांसी होतां घर्षण। होय कृशानवृष्टी तेथें. ॥ ४६ ॥ तंव महाराज तो देवव्रत। सर्वांत श्रेष्ठ रणपंडित। तेणें लक्षोनी वीर पार्थ। शर सोडित धाविन्नला. ॥ ४७ ॥ मेरु मंदार करिती चूर्ण। ऐसे भीष्माचे तीक्ष्ण बाण। ते अर्जुनें समरीं सोसून। सोडी आपण चपलत्वें. ॥ ४८ ॥ प्रळयशर पार्थाचे पाहीं। खडतरले गंगात्मजाच्या हृदयीं। परी कंपायमान सर्वथाही। शरीर त्याचें न झालें. ॥ ४९ ॥ सात्यकी कृतवर्मा दोघेजण। युद्ध करिते झाले निर्वाण। बृहद्बळ आणी अभिमन्य। भीडती जाण समरभूमीं. ॥ ५० ॥ दुर्योधन आणी भीम। घोर करिती संग्राम। दुराधर्ष सहदेव परम। भीडती निःसीम समरभूमी. ॥ ५१ ॥ दुर्मुखावरी नकुळ। धर्मावरी धाविन्नला शल्य। धृष्टद्युम्न गुरु द्रोण चपळ। युद्ध करिती अतिनिकुरें. ॥ ५२ ॥ शंखनामा विराटसुत। तेणें पाचारिला सोमदत्त,। बाल्हिक आणी धृष्टकेत। शिशुपाळाचा पुत्र तो. ॥ ५३ ॥ अलंबुष घटोत्कच पाहीं। असुर दोघे भिडती शंका नाहीं,। शिखंडी द्रौणी लवलाहीं। शर सोडिती अतिवेंरें. ॥ ५४ ॥ विराट आणी भगदत्त। बृहत्क्षत्र गौतमसुत। द्रुपद आणी जयद्रथ। निकुरेंकरोनी भीडती. ॥ ५५ ॥ श्रुतसोम आणी विकर्ण। सुशर्मा आणी चेकितान। शकुनी प्रतिविंध्य दोघेजण। सुदक्षण श्रुतकर्मा. ॥ ५६ ॥ श्रुतायुध इरावान भीडती सतेज। विंदअनुविंदावरी कुंतिभोज। पंच बंधु कैकयराज। त्रिगर्तावरी लोटले. ॥ ५७ ॥ वीरबाहू आणी उत्तर। चेदिराज उलूक शकुनिपुत्र। ऐसें द्वंद्वयुद्धसहस्र। एक प्रहर युद्ध झालें. ॥ ५८ ॥ सुर विमानीं पाहती। एकाचे रथ एक छेदिती। उसणें परस्परें फेडिती। वाद्यें वाजविती दोहीं दळीं. ॥ ५९ ॥ परस्परें मारिती सारथी। सवेंचि हृदयीं शर भेदिती। तूणीर सायकासनें क्षिती-। वरी पाडिती ध्वजातें. ॥ ६० ॥ भारतीयुद्ध अद्भुत पाहीं। त्यास उपमा कोठेंचि नाहीं। ऐसे वीर निर्वाणघायीं। कोठें नाहीं झुंजले. ॥ ६१ ॥ बाणजाळ पसरलें अमूप। तेणें झांकला आकाशमंडप। परम धीट त्यांसी चळ कंप। हिमज्वरें व्यापिलें. ॥ ६२ ॥ वीर विदेह होउनी। रणांगणीं भीडती बाणीं। सुहृद माया पुत्र

---

१. अग्निवृष्टि. २. मुळांत धृतराष्ट्रपुत्र दुर्धर्ष ह्याचें नकुलाबरोबर व दुर्मुखाचें सहदेवाबरोबर युद्ध झालें आहे. (अ० ४५ श्लो० २४।२५.) ३. कृपपुत्र. ४. मुळांत विकर्णाविरुद्ध सुतसोम आणि इरावानाविरुद्ध श्रुतायु असें आहे. (अ० ४५ श्लो० ५८।६९.)

पौत्र मनीं । सेवक धणी हें नाठवेची. ॥ ६३ ॥ देहाचें स्मरण नाहीं त्यांप्रती । म्हणोनी वीरांसी समरीं मुक्ती । पूर्वापार बोलिजे पंडितीं । अश्व नेती रथ रिते. ॥ ६४ ॥ थोर मांडली रणधुमाळी । रिक्त कुंजर धांवती दळीं । ध्वज अपार पडिले भूतळीं । शस्त्रें रितीं निर्धारें. ॥ ६५ ॥ शस्त्रें नग्न पडिलीं अपार । वीरांचे पसरले अळंकार । जैसा उदयाचळावरी सहस्रकर । तेंवी गंगाकुमर दिसतसे. ॥ ६६ ॥ पंचपताकीं शोभे रथ । महारथी पाठीसी अपरिमित । अखंड बाण तेव्हां वर्षत । खिळिती पांडवसैन्यातें. ॥ ६७ ॥ बहुत वीरांचीं शस्त्रें । छेदोनी पाडिलीं क्षणमात्रें । तंव श्रीरंगभगिनीपुत्रें । केलें धांवणें सत्वर. ॥ ६८ ॥ तो केवळ प्रतिअर्जुन । दोहीं हातांचें शरसंधान । शतबाणीं गंगानंदन । भेदिला तेव्हां समरांगणीं. ॥ ६९ ॥ कृतवर्मा खिळिला नवबाणीं । तैसाचि शल्य खिळिला तेच क्षणीं । सारथियांचीं शिरें धरणीं । सहस्रावधी पाडिलीं. ॥ ७० ॥ हस्तलाघव देखोनी । वीर सर्व डोलविती मूर्ध्नी । सव्य तर्जनी उचलोनी । 'धन्य' शूर सर्व म्हणती. ॥ ७१ ॥ मग सर्व वीर मिळोन । सौभद्रावरी टांकिती बाण । तितुक्यांचेंही संधान । टांकी छेदुन क्षणमात्रें. ॥ ७२ ॥ आणीक घालोनी बाणजाळ । खिळिलें सर्व कौरवदळ । मग तो भीष्म केवळ काळ । कोपला प्रळयानळाऐसा. ॥ ७३ ॥ घालोनियां निर्वाण बाणु । सर्वांगीं खिळिला अभिमन्यु । कठीण देखोनी दहाजणु । महारथी धांवले. ॥ ७४ ॥ दळासहीत धांवला विराट । भीमें हाक दीधली अचाट । बाण वर्षती सैंघट । भीष्मावरी ते काळीं. ॥ ७५ ॥ तिनीं बाणीं भीमसेन । भेदिता झाला गंगानंदन । शल्य गजावरी बैसोन । उत्तरावरी धाविन्नला. ॥ ७६ ॥ उत्तर सावध होउनी सवेग । मारिले शल्याचे रथ तुरंग । भीमें बाणजाळ सवेग । शल्यावरी घातलें. ॥ ७७ ॥ शल्यें टांकिली दिव्य शक्ती । उत्तर मूर्छित पाडिला क्षितीं । उत्तराचा चपळ हस्ती । बाणघायें मारिला. ॥ ७८ ॥ भीष्माचे लागले नाहींत बाण । ऐसा उरला नाहींच कोण । जैसे मयूर पिच्छें पसरुन । तैसे वीर सर्व दीसती. ॥ ७९ ॥ श्वेतनामा विराटपुत्र । तो प्रळययोद्धा परम अद्भुत । तेणें युद्ध अपरिमित । भीष्मासी केलें ते काळीं. ॥ ८० ॥ एकाच दिवसीं संपूर्ण । सेना आटीत गंगानंदन । परी श्वेतें युद्ध निर्वाण । करुनी भीष्म आवरिला. ॥ ८१ ॥ श्वेतें बहूत आगळें दाविलें । शतही कौरव

१. अभिमन्यूनें. २. सगळे.

जर्जर केले । पळूं लागलीं शत्रुकुळें । पाठी देउनी रणभूमीं. ॥ ८२ ॥ सर्वेंची श्वेत परतोन । शतबाणीं खिळिला गंगानंदन । भीष्मेंही शर टाकोन । सर्वांगीं तो खिळिला. ॥ ८३ ॥ परी तो दांडगा वीर तेक्षणीं । न निघे कदा समरींहूनी । तेणें भीष्माचें चाप छेदुनी । दहा वेळा टांकिलें. ॥ ८४ ॥ भीष्माचा ध्वज सारथी । श्वेतें छेदिला त्वरितगती । हाहाकार कौरव करिती । वाजवीत जयवाद्यें पांडव. ॥ ८५ ॥ मग दुर्योधनें ते अवसरीं । सर्व सेना प्रेरिली तयावरी । श्वेतें ख्याती केली समरीं । सर्व शरीं खिळिले. ॥ ८६ ॥ पांडव माथा डोलविती । धन्य विराटपुत्र मानिती । शरजाळीं भीष्माप्रती । त्रासिलें त्याणें पराक्रमें. ॥ ८७ ॥ मग प्रळयीं खवळे कृतांत । तैसा धाविन्नला शंतनुसुत । घोडे सारथी ध्वज रथ । भीष्में छेदोनी पाडिले. ॥ ८८ ॥ धरणीवरी आला श्वेत । शक्ती घेउनी हस्तीं त्वरित । तीक्ष्ण बाणजाळ वर्षत । धांवला श्वेत भीष्मावरी. ॥ ८९ ॥ बळें सोडली शक्ती । अनिवार वाटे भीष्माप्रती । मग नवाठायीं निश्चितीं । छेदोनी क्षितीं टांकिली. ॥ ९० ॥ श्वेत धाविन्नला गदा घेउन । केला भीष्माचा रथ चूर्ण । सारथी तुरंग संहारुन । महावीरें टाकिले. ॥ ९१ ॥ धरणीवरी गंगाकुमर । धाविन्नले कौरवांचे भार । दुसरे रथीं सत्वर । शंतनुज आरूढे. ॥ ९२ ॥ तंव श्वेतवीरें खड्ग । भीष्म रथीं चढतां सवेग । हातींचें चाप सुरंग । एकाच घायें तोडिलें. ॥ ९३ ॥ मग भार्गवदत्त बाण । नूतनचापावरी लावुन । काळदंडाऐसा सोडुन । गंगात्मजें दीधला. ॥ ९४ ॥ तेणें श्वेताचें हृदय भेदुन । गेला पृथ्वीतळ फोडुन । जैसा सूर्य पावे अस्तमान । तैसा श्वेत रणीं पडियेला. ॥ ९५ ॥ तव श्वेताचा बंधु शंखवीर । तेणें पाचारिला गंगाकुमर । चारि घटिका घोरांदर । युद्ध त्याणें माजविलें. ॥ ९६ ॥ द्रुपदाचें सैन्य तेक्षणीं । भीष्में आटिलें निर्वाण बाणीं । माध्यान्हींचा तीव्र तरणी । तैसा गंगात्मज दिसे. ॥ ९७ ॥ रवी गेला अस्तमानास । ऐसा झाला पूर्ण दिवस । वाजविती वाद्यघोष । दळें परतलीं स्वस्थाना. ॥ ९८ ॥ ऐसें राया रणासीं । जन्मेजया! परियेसीं । संजयें कथिलें धृतराष्ट्रासीं । तेंचि मीं तुजसीं कथियेलें. ॥ ९९ ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभर । शुभानंद तयाचा किंकर । श्रोतयांसी विनवी कर । जोडोनियां श्रवणासी. ॥ १०० ॥ इति श्रीमन्महाभारत । भीष्मपर्व व्यासोद्गीत । श्रवणमुखें जो प्राशित । आवडीं तरत भवपार. ॥ १०१ ॥

---

## अध्याय पंचविसावा.

**ध**र्म आपुल्या शिबिरांत । बैसला जावोनि चिंताक्रांत । **श्री**रंगाप्रती बोलत, । 'विचार कैसा करावा? ॥ १ ॥ **भी**ष्मास समरीं जिंकी । ऐसा वीर नाहीं त्रिलोकीं । आमुचे राजे सर्व पर्यंकीं । पहुडवील समरीं हा **भीष्म.** ॥ २ ॥ माझिया बंधूचा प्राण । **भी**ष्म घेईल नलगतां क्षण । **ह**री! मज नलगे राज्यासन । मी करीन वनवास.' ॥ ३ ॥ मग बोले **वै**कुंठनायक । **ध**र्मा! तूं कदा न करीं शोक । तुझे बंधु आणी हे नृपनायक । प्रलय उदईक करितील.' ॥ ४ ॥ ऐसें बोलतां रजनी सरली । दोहींदळीं सत्कर्मे सारिलीं । दाट वाद्यांची घायी लागली । सेना लोटली समरांगणीं. ॥ ५ ॥ **दु**र्योधन म्हणे, '**गं**गानंदना! । तुम्हीं काल आटिली सेना । तरी सतेज पाहातां नयना । अधिकाधिक दिसतसे.' ॥ ६ ॥ **म**करविभू रचिला **कौ**रववीरीं । **धृष्टद्युम्न क्रौं**चविभू करी । शंख त्राहटिले तेव्हां, थरारी । पृथ्वीतळ तेधवां. ॥ ७ ॥ **पांचजन्यदे**वदत्त । वाजवी **पा**र्थ**म**दनतात । **अ**नंतविजय सत्य । **यु**धिष्ठिरें त्राहटिला. ॥ ८ ॥ **भी**मकर्मा **वृ**कोदरें । **सु**घोष**म**णिपुष्पक **मा**द्रीकुमरें । दुमदुमिलीं दिशांचीं अंतरें । एक हाक गाजली. ॥ ९ ॥ प्रळयीं खवळे जैसा **कृ**तांत । विश्व भक्षूं पाहे क्षुधित । तैसा **भी**ष्म देखुनी **पा**र्थ । म्हणे, 'ऐकें **ज**गदीशा! ॥ १० ॥ लोटीं वेगें स्यंदन' । म्हणतांचि लोटी **ज**गजीवन । तंव पवनास मागें टांकोन । रथ आला त्वरेनें. ॥ ११ ॥ **अ**र्जुन आणि **गं**गाकुमर । उभे राहिले रणीं समोर । कीं ते **मे**रु आणी **मं**दार । नातरी **र**मा कीं **उ**मावर. ॥ १२ ॥ **भी**ष्में वोढिलें सायकासन । सोडिले सत्याहात्तर बाण । तंव **गां**डीव सजवुनी **अ**र्जुन । उडविले बाण वरिच्यावरी. ॥ १३ ॥ शतबाणीं **गं**गानंदन । **पा**र्थे ताडिला न लगतां क्षण । तंव **द्रो**णें पंचवीस मार्गण । **पा**र्थावरी टांकिले. ॥ १४ ॥ **दु**र्योधनें चौसष्टी बाण । **पा**र्थावरी दीधले सोडून । शतार्धबाणीं **गौ**तमनंदन । भेदिता झाला सक्रोधें. ॥ १५ ॥ **पा**र्थें त्याचिये द्विगुणी । सायक सोडिले ते क्षणीं । तितुकेहि खिळिले समरांगणीं । पराक्रमें करोनियां. ॥ १६ ॥ सर्वेचि **भी**ष्मावरी ऐशीं शर । टांकी क्रोधें **सु**भद्रावर । तेणें विकळ **गं**गाकुमर । घटिका एक पैं झाला. ॥ १७ ॥ **भी**ष्म मूर्छित जाणोन । **कौ**रवसेनेंत पातला **अ**र्जुन । जैसे असंख्य भोगी देखोन । [३]**अ**रुणा-

---

१. भूमीरूप शय्येवर. २. अर्जुन व कृष्ण. कृष्णानें वाजविला पांचजन्य व अर्जुनानें देवदत्त.
३. गरुड.

नुज संहारी. ॥ १८ ॥ लक्ष वीर समरांगणीं । **पार्थें** मारिले तये क्षणीं । धड-मुंडांकित रणमेदिनी । झांकोनि गेली दिसेना. ॥ १९ ॥ **पार्थें** वीरांची ला-खोली । भूलिंगासी समर्पिली । **भीष्मा**प्रती तये वेळीं । **दुर्योधन** बोलतसे. ॥ २० ॥ 'बहूत माजला **अर्जुन** । पृतना टांकिली संहारुन । तुम्हानिमित्तें वीर **कर्ण** । नेम करोनी बैसला. ॥ २१ ॥ काय कौतुक पहातां येथ? । आजी समरीं मारावा **पार्थ.**' । मग **भीष्में** लोटिला रथ । उभय **कृष्ण** लक्षोनी. ॥ २२ ॥ नवबाणीं करुनी **पार्थ** । भेदिता झाला **गंगा**सुत । सर्वेची शतबाणीं रणपंडित । भेदिता झाला **भीष्मा**तें. ॥ २३ ॥ **श्री**रंगाचे हृदयीं तीन बाण । **भीष्में** भेदिले दारुण । **पार्थें** **भीष्म**सारथी लक्षोन । सत्तरबाणीं खिळियेला. ॥ २४ ॥ हस्तलाघव दावी **गंगा**नंदन । त्याहूनि विशेष करी **अर्जुन** । इकडे **द्रोण, धृष्टद्युम्न** । नाहीं भ्याला तयासी. ॥ २५ ॥ निर्वाणींचा एक बाण । **द्रोणें** सोडिला जैसा चंडकिरण । परी अग्निगर्भी **धृष्टद्युम्न** । नाहीं म्हणून भ्यालासे. ॥ २६ ॥ बाण येती जेंवी **कृ**तांत । परी तेणें तोडिले अकस्मात् । **अरुणानुज** जैसा खंडित । अंतराल व्याळातें. ॥ २७ ॥ वीर म्हणती धन्य धन्य । प्रतापी वीर धृष्टद्युम्न । यावरी **पांचाळें** शक्ती घेउन । **द्रोणा**वरी सो-डिली. ॥ २८ ॥ **द्रोणें** दिव्य शर सोडोनी । शक्ती खंडोनी पाडिली धरणीं । सर्वांग भेदिलें बाणीं । मयूराऐसे दीसती. ॥ २९ ॥ **कलिंगदेशींचा नृपनाथ** । नाम तयाचें **केतुमंत** । **भीमासीं** युद्ध अद्भुत । तेणें केलें तेधवां. ॥ ३० ॥ अश्वावरी बैसोन । **भीमा**वरी सोडी बाण । त्यासी **वृकोदरें** गदा भेवंडुन[1] । मृत्युठायासीं धाडिला. ॥ ३१ ॥ त्याचें नाम **चक्रवीर** । **भीमें** केला तयाचा संहार । असिलता घेवोनी **वृकोदर** । **कौरवभारीं** मिसळला. ॥ ३२ ॥ चहूं-कडोनी बाणांचा पूर । **भीमा**वरी येत अपार । असिलतेनें **वृकोदर** । तोडोनि पाडी सर्वही. ॥ ३३ ॥ **कलिंगाचा** दुसरा सुत । नाम तयाचें **भानुमंत** । श-लभ विजूशीं धरुं धांवत । तैसा लोटला **भीमा**वरी. ॥ ३४ ॥ **भीमाकरींची** असिलता । झळके जैसी विद्युल्लता । एकाच घायें **भानुमंता** । **यमसदना** धा-डिला. ॥ ३५ ॥ **कलिंगाचा** तिसरा सुत । **शतायुनामा** वीर धांवत । **मातो-नियां** थोर बेस्त[2] । महाव्याघ्रावरी पडियेला. ॥ ३६ ॥ जैसा **मृद्घट** होय **चूर्ण** । तेंवी **भीमें** मारिला न लगतां क्षण । शेवटीं **कलिंग** आपण । **उसणें** घ्यावया धाविन्नला. ॥ ३७ ॥ **वृकोदराचा** मार अनिवार । उडविलें **कलिंगाचें**

---

१. गरगर फिरवून, गरगर फिरवून हाणून. २. बोकड.

शिर । भेदीत गेलें अंबर । कौरव पाहती ऊर्ध्वमुखें. ॥ ३८ ॥ दोनी सहस्र हस्ती । सातशत महारथी । कलिंगाचे रणपंथीं । संहारिले भीमसेनें. ॥ ३९ ॥ तैसीच धृतराष्ट्रीय वाहिनी[1] । धृष्टद्युम्नें संहारिली ते क्षणीं । तें भीष्मवीरें देखोनी । बाण वर्षत धाविन्नला. ॥ ४० ॥ भीष्मावरी शक्ती । भीमें टांकिली अवचितीं । ते तत्काळ छेदोनी क्षितीं । देवव्रतें टांकिली. ॥ ४१ ॥ अश्वत्थामा धृष्टद्युम्न । युद्ध करिती अतिनिर्वाणु । त्याची पाठी राखत अभिमन्यु । बाण वर्षतु ऊठिला. ॥ ४२ ॥ महावीर ते क्षणीं । सौभद्रें खिळिले समरांगणीं । दुर्योधनपुत्र येवोनी । लक्ष्मण पुढें पातला. ॥ ४३ ॥ जैसें मूर्खाचें वाग्जाळ समस्त । एके वचनें छेदी पंडित । तैसे लक्ष्मणाचे शर समस्त । एकेंच शरें तोडिले. ॥ ४४ ॥ सौभद्रासीं सकळीं वेढिलें । तें कपिध्वजें दुरुनी देखिलें । तेव्हां कपिवरध्वजें ते वेळे । स्यंदन वेगें पीटिला. ॥ ४५ ॥ मग अभिमन्यें निर्वाणबाणीं । लक्ष्मण मूर्छित पाडिला धरणीं । तें सुयोधनें देखोनी । सैन्यासहित धाविन्नला. ॥ ४६ ॥ वीज पडे जैसी पर्वतीं । तैसा कौरवांत आला सुभद्रापती । तितुकेही वीर शरपंथीं । जर्जर केले पराक्रमें. ॥ ४७ ॥ सूर्यमंडळापर्यंत । धुळोरा दाटला तेथ । कौरवभार पळत । पार्थभयेंकरूनियां. ॥ ४८ ॥ रणभूमी माजली बहुत थोर । रिते धांवती कुंजर । मोकळे रथ अपार । गगनमार्गें झुगारिती. ॥ ४९ ॥ शस्त्रांसहित हस्त । अपार पडिले भूषणमंडित । किरीटकुंडलांसहित । शिरें पडिलीं गणित नसे. ॥ ५० ॥ ग्रीदांसहित[2] पडिले चरण । हातीं अंकुश घेउन । गजआकर्षक[3] मारोन । चोहींकडे पाडिले. ॥ ५१ ॥ वाग्दोरे[4] घेउनी हातीं । स्वार पडिले बहुत क्षितीं । भीष्म म्हणे द्रोणाप्रती, । 'धन्य! जगतीं वीर पार्थ.' ॥ ५२ ॥ सूर्य पावला अस्तमान । संपूर्ण झाला द्वितीय दिन । आपुल्याले शिबिरांलागुन । जातीं झालीं दोनी दळें. ॥ ५३ ॥ संजय म्हणे, 'धृतराष्ट्रराया! । आजी घडलें ऐसें रणठाया । वैशंपायन सांगे जन्मेजया । सादरें ऐकें पुढिलार्थ.' ॥ ५४ ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभर । शुभानंद विनवी वारंवार । श्रोतयांसी म्हणे सादर । श्रवणासीं आदर करिजे. ॥ ५५ ॥ इती श्रीमन्महाभारत । श्रीव्यासमुखोद्गीत । भीष्मपर्व रसिकाद्भुत । श्रवणद्वारीं प्राशिजे. ॥ ५६ ॥

---

१. सेना. २. तोडे, तोरडे वगैरेंसह. ३. माहात. ४. वागदोर.

## अध्याय सव्विसावा.

वैशंपायन म्हणे, 'जन्मेजया! । संजयें कथिलें धृतराष्ट्राया । तृतीय दिवसीं रणठाया । कथिलें तेंची श्रवण करीं. ॥ १ ॥ येरेदिवसीं सूर्योदयासी । सत्कर्मे सारुनी, युद्धासी । दोनी सेना रणभूमीसी । वाद्यगजरें पातल्या. ॥ २ ॥ पांडवसैन्यासी रक्षक पार्थवीर । पार्थासी रक्षक जगदीश्वर । मांडलें युद्धाचें घनचक्र । शिरें अपार पडती. ॥ ३ ॥ सात्यकी आणी शकुनी । भीडती तेव्हां रणमेदिनीं । तंव कपीनें विरथ करुनी । रणाहूनी पळविला. ॥ ४ ॥ भीमसेनावरी सुयोधन । उठिला वर्षत वज्रबाण । तों घटोत्कच गदा घेउन । भीमासि साह्य जाहाला. ॥ ५ ॥ एक काल एक कृतांत । तैसे भीम आणी हिडिंबासुत । कौरवदळाचा निष्पात । केला बहुत तेक्षणीं. ॥ ६ ॥ तंव भीष्मासी हिणावी दुर्योधन, । 'तूं वीरांमाजी सहस्रकिरण । पांडवांचीं मुलें येउन । तुज शरीं जर्जर करिताती. ॥ ७ ॥ तुझे मनीं त्यांचें कल्याण । व्हावें तें मी जाणे पूर्ण । प्रतिज्ञा करोनि वीर कर्ण । राहिला पुढें नयेची.' ॥ ८ ॥ भीष्म म्हणे, 'पूर्वीं समस्त । तुज म्यां कथुनी केलें श्रुत । पांडव वीर अतिसमर्थ । कळिकाळासी नाटोपती. ॥ ९ ॥ तरी मी आजी निर्वाण । पाहें नयनीं युद्ध करीन;' । म्हणोनी महावीरें स्यंदन । पांडवसैन्यीं लोटिला. ॥ १० ॥ पांडवचमूचा संहार । भीष्में केला अपार । फुलले किंशुक[2] तरुवर । तैसे वीर दीसती. ॥ ११ ॥ परम चपळ देवव्रत[3] । क्षणांत पूर्वे जाय रथ । सवेंची पश्चिमेसी जात । त्रुटी[4] मात्र न वाजतां. ॥ १२ ॥ क्षणांत दक्षिणे गमन । क्षणांत उत्तरेसी गमन । अलातचक्रवत्[5] फिरे स्यंदन । पांडवदळीं लोटला. ॥ १३ ॥ पांडवचमूचा संहार । भीष्में केला अपार । श्येनपक्षी जैसा फिरे अंतर । तैसा रहंवर[6] जाय त्वरें. ॥ १४ ॥ चतुरंग दळ अपार । संहारीत भीष्मवीर । रण माजलें घोरांदर । तेदिवसीं परियेसा. ॥ १५ ॥ तें देखून कृष्णार्जुन । म्हणती, 'धन्य वीर गंगानंदन । धांडोळितां त्रिभुवन । ऐसा शूर दुजा नसे.' ॥ १६ ॥ श्रीरंग म्हणे, 'अर्जुना! । भीष्में आटिली सर्व सेना । वेग करीं युद्धकदना' । ऐसें समरंगणीं बोलिले. ॥ १७ ॥ कृष्ण म्हणे, 'श्रीकृष्णा! । आतां प्रेरीं सत्वर स्यंदना'. । तंव निमिष्य न लगतां जाणा । अर्जुनें केलें अद्भुत. ॥ १८ ॥ लघुलाघव हस्तवेग जाण । दावी

---

१. येथें मुळांतील व्यूहरचनेचें वर्णन सबंध गाळलें आहे. २. पळस. ३. भीष्म. ४. क्षण, टिचकी वाजवावयास लागणारा वेळ. ५. कोलित वाटोळें भवंडलें असतां जें तेजाचें वर्तुळ दिसतें, त्याप्रमाणें. ६. रथ.

भीष्माहूनी दशगुण । हरी म्हणे, 'पार्था! स्यंदन । चालवितों पाहें कैसा.' ॥ १९ ॥ पार्थें सोडिला आदीं बाण । मग श्रीरंगें प्रेरिला स्यंदन । बाणास मागें टाकोन । रथ गेला त्वरेनें. ॥ २० ॥ सवेंचि परतविला रहंवर । तंव येऊनि पडला पुढें शर । अर्जुन स्तवन करी अपार । म्हणे, 'पार न करवे तुझा. ॥ २१ ॥ स्वामी! सर्वज्ञा! श्रीकरधरा! । अश्वांमाजी हे कैंची त्वरा? । विश्वव्यापका! त्रिभुवनेश्वरा! । गती समग्रा तुझ्याच कीं.' ॥ २२ ॥ ऐसा नरवीरें बाण टांकोन । छेदिलें भीष्माचें सायकासन । भीष्म म्हणे, 'पार्था! धन्य धन्य । तुज देखोनी तोषलों.' ॥ २३ ॥ माध्यान्हींचा चंडकिरण । तैसा दिसे तीव्र अर्जुन । भीष्म म्हणे, 'निर्वाण । तुझें आजी मजसवें.' ॥ २४ ॥ त्यादिवसीं भीष्में अर्जुनासी । झांकोनि बाणें सैन्यासी । अमित वीर धरणीसी । गतप्राण पाडिले. ॥ २५ ॥ हें देखोनि दुर्योधन । म्हणे, 'धन्य गंगानंदन' । म्हणे, 'ताता! निष्पांडव संपूर्ण । मही केल्या आपुली.' ॥ २६ ॥ बोलोनि ऐसें दुर्योधन । सोडी पांडवसैन्यीं निर्वाणबाण । तें देखोनि भीमसेन । पंचानननापरी धांवला. ॥ २७ ॥ प्रळयीं खवळे जैसा कृतांत । तैसा दिसे वायुसुत । करोनी सिंहगर्जना अद्भुत । लोटला निःसीम कौरवीं. ॥ २८ ॥ कौरव रथारूढ होउनी । सेनामुखीं आले ठाकोनी । दुरोनि देखती भीम नयनीं । प्रळयरुद्रासारिखा. ॥ २९ ॥ द्रोण म्हणे कौरवांतें, । 'कां जातां रे! मरायातें । क्षणें भीमाचे गदाघातें । कुबुद्धी मृत्यु पावाल.' ॥ ३० ॥ ऐसा द्रोणाचार्य बोलिला । तंव भीम सन्मुख पातला । कौरवसमुदाय सर्वही भ्याला । आड जाती भीष्माच्या. ॥ ३१ ॥ भीमासी आवेश अद्भुत । मोडी शतानुशत रथ । सैन्य पाडिता झाला असंख्यात । कौरवांचें गदाघातें. ॥ ३२ ॥ बाणें ताडिले विकळ वीर । हें देखूनि गंगाकुमर । भीमासी तो बाण प्रखर । मारितां पार्थ आला तेथें. ॥ ३३ ॥ पार्थें भीष्माचे बाण । उडविले न लगतां क्षण । भीष्म म्हणे पार्थालागुन । साहसी संधान केंवी माझें? ॥ ३४ ॥ तूं पृथेचें बाळक अज्ञान । तुज जरी साह्य जगजीवन । तरी म्यां जिंकिला भृगुनंदन । क्षत्रियांतक प्रतापी. ॥ ३५ ॥ ऐसें असतां गांधारासी[1] । संकल्प करुनीयां युद्धासी । तुज मित्र तो हृषीकेशी । तेणें तुम्हासी चाळविलें. ॥ ३६ ॥ जरी तो न करीं युद्ध म्हणे तरी । श्रीकृष्णसख्या! ऐकें निर्धारीं । अरे! मी धरवीन शस्त्र हरी! । नातरी तुझी उरी उरे कैसी? ॥ ३७ ॥ [2]श्रीकृष्ण न धरी

१. दुर्योधनाबरोबर. २. पुढें अ० ३२ ओ० १ मधील नवम शब्दावरील टीप पहा.

शस्त्र जरी। तरी वांचसी रणीं कैसेपरी?। नेणसी भीष्मबाणाची थोरी। तूं अज्ञानपणें अर्जुना!' ॥ ३८ ॥ पार्थ बोले कर जोडून, । 'सत्यापासीं जनार्दन। तुम्ही तव धर्मनीतिवर्तन। हा विचार कां नेणा?॥ ३९ ॥ राज्य हारविलें कपटद्यूतीं। सभेसी गांजिली द्रौपदी सती। तिसी नग्न करितां धर्मनीती। तुम्हीं त्यासी न कथिली. ॥ ४० ॥ तेव्हां लज्जा रक्षिली कवणें। वस्त्रें पुरविलीं नानावर्णें। मध्यरात्रीसी असतां वनें। दुर्वास आला भोजना. ॥ ४१ ॥ तयासी देवोनियां भोजन। तृप्त कर्ता जनार्दन। तैसा या संकटीं भगवान। प्राणसंरक्षणा करील. ॥ ४२ ॥ तुम्हीं केली आमुची उपेक्षा। परी तो भार पडला जगदीशा.'। ऐसें बोलोनी अर्जुनें सरिसा। अमित सैन्य पाडिलें. ॥ ४३ ॥ तों इकडे भीमसेन। करीत कुंजरांचें हनन। सवें भिरकावितां गगन। वायुचक्रीं ते पडती. ॥ ४४ ॥ तंव द्रोण म्हणे भीमासी, । 'साहें माझिया सायकांसी। शतबाणीं भीमसेनासी। ताडितां धृष्टद्युम्न पातला. ॥ ४५ ॥ भीमावरी बाण येऊं सरले। ते धृष्टद्युम्नें देखत पाहिले। वरचावरी छेदिले। पाडिले जैसे गरुडें अही. ॥ ४६ ॥ द्रोणाचार्यें संधान केलें। तें धृष्टद्युम्नें पाहिलें। तें खंडितांची वहिलें। द्रोणाचार्य कोपला. ॥ ४७ ॥ मग शतबाण धृष्टद्युम्नावरी। टाकितां बाणें बाण निवारी.। मग धृष्टद्युम्नें दाहा बाण उरीं। आचार्याच्या मारिले. ॥ ४८ ॥ द्रोणासीं धृष्टद्युम्नकरें मरण। तत्काळ विसरला देहस्मरण। म्हणे, 'मांडलें निर्वाण। रथ माघारें फिरविला. ॥ ४९ ॥ तो इच्छामरणी वीर। यालागींच धरिलासे धीर.'। तंव पावला वृकोदर। गदा तुळीत सत्वरां. ॥ ५० ॥ हाणीतला गदाघात। वारुसारथियां निष्पात। तंव अश्वत्थामा अति त्वरित। बाण सोडित पातला. ॥ ५१ ॥ इतकियांत सूर्यासी अस्तमान। तृतीय दिन झाला संपूर्ण। वाद्य गजरें सर्व सैन्य। सर्वही शिबिरा पातले. ॥ ५२ ॥ रात्री झालिया कुरुक्षेत्रीं। हनुमंत नेमें जाय लंकापुरीं। तयाप्रती पुसे मंदोदरी, । 'काय पृथ्वीवरी होतसे?' ॥ ५३ ॥ बिभीषणें करूनि नमन। कपीसी दिधलें उत्तमासन, । म्हणे, 'भूमीवरी नाद उठे गहन। कोठें काय होतसे?' ॥ ५४ ॥ मारुती म्हणे, 'धराभार। फेडावया श्रीयदुवीर। अवतरला यादवेंद्र। नरावतार अर्जुन. ॥ ५५ ॥ कौरव ते धृतराष्ट्रकुमर। दुर्योधन कलीचा तो अवतार। पांडव ते पंडूचे पुत्र। धर्मभीमादी पांच पैं. ॥ ५६ ॥ राज्यविभागी पितृव्यबंधु। युद्धाचा झाला

---

१. हा मंदोदरी व हनुमान् यांचा संवाद मुळांत नाहीं. २. चुलत भाऊ.

संबंधु । पांडवां साह्य श्रीगोविंदु । भूभार हरवी त्यांकरीं. ॥ ५७ ॥ त्रेतायुगीं श्रीरामचंद्र । तोची द्वापारीं यादवेंद्र । पार्थ जो तो पंडुकुमर । नरनारायण दोघे हे. ॥ ५८ ॥ तयां युद्ध होत निश्चितें । सेतुपणीं जिंकिलें मज पार्थें । श्रीकृष्णें नेमुनी मातें । बैसविलें ध्वजातें रथावरी. ॥ ५९ ॥ संग्रामसमयीं मुरारी । अर्जुनाचें सारथ्य करी । शंख आस्फुरी[1] श्रीहरी । आणी धनंजय वाजवी. ॥ ६० ॥ तेणें नादें गर्जे गगन । भूकंप होत थरथरोन । श्रीकृष्णें तुम्हासी आज्ञावचन । सांगीतलें मजप्रती असे. ॥ ६१ ॥ कौरवांचें सैन्य बहुत । पांडवांचें स्वल्प तेथ । यालागीं तुम्हासी दळ किंचित । साह्यासी पाठवावें म्हणोनी.' ॥ ६२ ॥ ऐकोनी हनुमंताचें वचन । मंदोदरी पुसे, 'कौरवा किती सैन्य?' । येर म्हणे, 'अकराक्षोणी पूर्ण । पांडवांतें सात क्षोणी.' ॥ ६३ ॥ ऐकोनी हांसे मंदोदरी, । 'अठराक्षोणी जया वाजंतरी । इतर सैन्याची कोण गणती करी? । त्या रावणासी रामें वधियेला. ॥ ६४ ॥ तरी राम तोची श्रीकृष्ण । द्वापारीं अवतरला नारायण । अकराक्षोणींची आंगवण[2] । एवढी काय नरनारायणा? ॥ ६५ ॥ इतुकियांत प्रातःकाळ झाला । हनुमंत कुरुक्षेत्रीं आला । तो इकडे दोनी सेनेला । सिद्ध करिती सैनिक. ॥ ६६ ॥ तृतीयदिनीं ऐसें वर्तलें । संजयें धृतराष्ट्रासी कथिलें । वैशपायन म्हणे, 'सादरें वहिलें । जन्मेजया! परियेसीं.' ॥ ६७ ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभर । श्रोतयांसी जोडोनी कर । शुभानंद विनवी निरंतर । व्हावें सादर श्रवणासी. ॥ ६८ ॥ इति श्रीभीष्मपर्व पुण्यवंत । महाभारत व्यासविरचित । ऐकतां एकभावें निश्चित । तरती बहूत जड मूढ. ॥ ६९ ॥

---

## अध्याय सत्ताविसावा.

[3]संजय म्हणे धृतराष्ट्रासी । चतुर्थ दिवसीं रणभूमीसी । दिवाकर येतां उदयासी । हनुमंत आला कुरुक्षेत्रा. ॥ १ ॥ जन्मेजया! राजेंद्रा! गुणी! । वैशंपायन म्हणे ऐक श्रवणीं । जी प्रज्ञाचक्षुसी संजयें वाणी । सुरस श्रवणीं कथियेली. ॥ २ ॥ तेच तुजप्रती बोलतों । व्यासगुरूचेनी आज्ञा तों । तो विचार चतुर्थ दिवसीं तों । हनुमंतें श्रीकृष्णा बोलिजे. ॥ ३ ॥ उदयाचळीं नित्यनेम सारुन । दोनी दळीं सिद्ध होउन । वाद्यगजरेंसी रणांगण । पावते झाले तेकाळीं. ॥ ४ ॥ तेन्हां भुभुक्कारें गर्जित । श्रीकृष्णासी भेटला हनु-

---

१. वाजवी. २. प्रौढी, मातब्बरी. ३. ओ० १ ते १२ मध्यें वर्णिलेली हकीकत मुळांत नाहीं.

मंत । नमस्कारोनी अवनिजाकांत । रात्रीचा आज्ञार्थ निरोपी. ॥ ५ ॥ 'सांगीतली तुमची आज्ञा । लंकेशा म्यां बिभीषणा । तेव्हा मयजेची विवंचना । तेच तुम्हासी निरोपूं. ॥ ६ ॥ जरी अवतरला भगवंत । साह्यासी तों नरावतार पार्थ । ऐसें असतां कायसी मात । एकादशक्षोणीची? ॥ ७ ॥ तरी माझे पतीचें दळ । अमित होतें कीं सकळ । वाजंत्री अठराक्षोणी त्या वेळ । श्रीरामें एकें मारिलें. ॥ ८ ॥ ऐसा रावण राक्षसेंद्र । त्यासी वधी श्रीरामचंद्र । तोची अवतार यादवेंद्र । श्रीकृष्ण पांडवां साह्य तो. ॥ ९ ॥ तो एकादशक्षोणीसीं कौरवा । भयभीत होय, या भावा । म्हणोनी राक्षससमूहा । साह्यार्थ पाठवा म्हणतसे?' ॥ १० ॥ ऐसी मयजेची मात । संशयीं भरलें तीचें चित्त । हनुमंतें सांगतां तेथ । श्रीकृष्णनाथ क्षोभला. ॥ ११ ॥ मग भीमातें आज्ञा करीत । गज टाकिसी गगनांत । ते नैर्ऋत्येसी टाकी निश्चित । ममाज्ञेनें पैं आजी. ॥ १२ ॥ तेव्हां रणतुरांची घाय लागली । दोनी दळीं वीरांची आरोळी । ऐकोनी काळ कांपे चळाळीं । पृथ्वी डळमळी ते काळीं. ॥ १३ ॥ त्यांत भुभुक्कारें अंजनीनंदन । गाजवीतसे पैं त्रिभुवन । भोंवती भूतांची आरोळीकरुन । गजाश्व मूत्र करिती. ॥ १४ ॥ ऐसिया आकांतप्रळयीं जाण । भीमसेनें सिंहगर्जना करुन । तेणें शेषकूर्म दचकोन । ग्रीवापृष्ठी सांवरिती. ॥ १५ ॥ पार्थसारथी जगदीश्वर । वारू नाचवी कौतुकें थोर । नंदीघोक रथ सत्वर । हुडा जैसा स्वर्गीचा. ॥ १६ ॥ पदाती पदातिया दारुण । अश्वारूढीं अश्वारूढ जाण । कुंजर कुंजरासी निर्वाण । रथी रथियां लक्षुनी; ॥ १७ ॥ युद्ध सैन्यासी ऐसें क्रमें । आप पर नोळखती पराक्रमें । तुटती शिरें हस्तपाद, वर्में । लक्षोनियां मारिती. ॥ १८ ॥ बाणबाणातें घर्षण होतां । अग्नी प्रगटे तेथें तत्वतां । यंत्रधूम्रें गगनाआंतौता । बाणें गगन रोधिलें. ॥ १९ ॥ तुटती अनेकांचीं शिरें । गृध्र घेउनी जाती परस्परें । अश्वकळेवरें हस्तिकळेवरें । पक्षी नेती भक्षणा. ॥ २० ॥ यापरी युद्ध चारी घटिका । झालियावरी कुरुनायका । महावीर उठावले देखा । जन्मेजयराजया! ॥ २१ ॥ मुख्य भीष्माचार्य महारथी । त्यांसी युद्ध करी सुभद्रापती । द्रोणाचार्य प्रतापकीर्ती । त्यावरी द्रुपद उठावला. ॥ २२ ॥ जयद्रथाप्रती आपण । काशिराजा माजवी रण । दोघेही भिडती निर्वाण । घ्यावया प्राण विंधिती. ॥ २३ ॥

---

१. सीतापति, राम, विष्णु, कृष्ण. २. मंदोदरीची. ३. रणवाद्यांची. ४. घाई, त्वरा. ५. नंदिघोष नांवाचा अर्जुनाचा रथ. ६. बुरुज. ७. आंतआंत, अगदीं आंतल्या भागांत.

मद्रराजा शल्यनृपती । तया प्रतियोद्धा धर्ममूर्ती । शकुनीसी सहदेव सुमती । भीडती दु:शासन अभिमन्यु. ॥ २४ ॥ सोमदत्तीरायाप्रती । युद्ध करी शैब्यनृपती । उलूकनाम राजयाप्रती । कुंतिभोज करी युद्ध. ॥ २५ ॥ कृतवर्मा तो कौरवांचा । त्या प्रतिमल्ल शिखंडी साचा । भीमासी द्वेष दुर्योधनाचा । युद्धालागीं इच्छिती. ॥ २६ ॥ गांधारीतनय शतभरी । त्यांसी प्रतिविंध्यादी युद्ध करी । जे द्रौपदीचे कुमर पांचही निर्धारी । पांचांपासोनी जे जन्मले. ॥ २७ ॥ पार्थभीष्मा युद्ध दारुण । होइल तें असे पुढें कथन । भीडती द्रुपद आणी द्रोण । तेंची निरोपण परियेसा. ॥ २८ ॥ अग्निवेश्याचे[1] ते शिष्य पाहीं । प्रयोजन जाणती दोघेही । महाद्वेषें[2] झुंजती तिहीं । बाणीं आकाश पूर्ण केलें. ॥ २९ ॥ ऐसें बाणयुद्ध झालें । द्रोणें शूळअस्त्रातें सोडिलें । द्रुपदें दाहाबाणीं छेदिलें । सवेंची घेतलें अग्न्यस्त्र. ॥ ३० ॥ अग्न्यस्त्र गेलें गगनीं । देखतां, द्रोणें मोकलिलें पाणी । येणें अनिळास्त्र जपोनी । तेणें पर्वतास्त्र सोडिलें. ॥ ३१ ॥ द्रोणें वज्रबाण टाकिला । पर्वतांचा चुरा केला । त्याचि वेळां मुकुट छेदिला । द्रोणाचार्याचा रणांगणीं. ॥ ३२ ॥ मोकळे होतां कबरीभार । चक्र एक सोडिलें सत्वर । कोपोनी प्रळयरुद्रासारिखा क्रूर । मंत्रोनियां द्रुपदावरी. ॥ ३३ ॥ न सांवरत पातलें चक्र । द्रुपदाचें धनुष्य छेदिलें सत्वर । तों आला धृष्टद्युम्न कुमर । द्रोण सत्वर माघारला. ॥ ३४ ॥ धृष्टद्युम्नासी देखोनी सत्वरें । अश्वत्थामया तेवक नेधरे[3] । दोघे युद्ध करिती अतिनिकुरें । जेवीं भार्गव दाशरथी. ॥ ३५ ॥ तों बाण सोडी सैंधवपती । काशिराजा छेदित त्वरितीं । सवेंची सप्तबाणें सिंधुपती । जयद्रथ विरथ केला पैं. ॥ ३६ ॥ रथ भंगोनि गेलियावरी । जयद्रथ सरला माघारीं । धर्मराजें तया अवसरीं । धनुर्ष्यीं शर योजिले. ॥ ३७ ॥ शल्य वर्षे बाणांचा पूर । तो छेदितो युधिष्ठिर । सवेंची पांच शर सत्वर । धर्मरायें सोडिले. ॥ ३८ ॥ एक बाणें सारथियातें । एकें संहारिलें अश्वातें । एकें मोडिलें ध्वजातें । दोनी शल्यातें भेदले. ॥ ३९॥ धर्माहस्तें मृत्यु त्यासी । भविष्य बोलिला व्यासऋषी । हें जाणोनी शल्य माघारेंसी । परतता झाला सत्वरीं. ॥ ४० ॥ शकुनी आणी सहदेव । खड्गपाणी झुजती अपूर्व । सहदेव म्हणे मृत्युपुरा ठाव । नेमूनि देईन तुज खळा; ॥ ४१ ॥ कपटफांसे टाकिले ते कर । छेदून सांडीन सत्वर.' । म्हणोनि धांवला प्रळयरुद्र । तों शकुनी लौकर पळाला. ॥ ४२ ॥ शकुनी घालोनि माघारीं । कृपाचार्य पातला पुढारीं । सहदेव बोले तया अवसरीं ।

---

१. अग्निवेश हा द्रोण आणि द्रुपद यांचा गुरु होता. २, राग. ३. न आवरे.

म्हणे तूं गुरु पित्याचा. ॥ ४३ ॥ तुजसवें आम्हीं न कीजे झुंजु । म्हणोनी परतला पंडुतनुजु । दुःशासनें अभिमन्यु उजु । गज अद्भुत लोटिला. ॥४४॥ अभिमन्यू म्हणे 'रे! दुर्जना! । महामळिना दुःशासना! । द्रौपदी सभेसी नेली हीना! । तुवां पापिया गांजिली. ॥ ४५ ॥ तरी तुतें वधिता वृकोदर । रक्त प्राशील प्रळयरुद्र । म्यां मारिलीया मजवर । सत्वर कोपेल ऐकतां. ॥ ४६ ॥ तरी घेई तयाची सेवा । राहे मर्यादादिन अठरावा । मग रथ उचलोनी तेधवां । भूमीवरी आपटिला. ॥ ४७ ॥ धनुष्य बाण आणी मुकुट । अभिमन्यूनें केला पिष्ट । थरथरां कांपे कपटी दुष्ट । प्राणदानें सोडिला. ॥ ४८ ॥ दुःशासनाचें शिरच्छेदन । पार्थसुतासी जैसें तृण । ऐकोन भीमसेनाचा पण । नेघेची प्राण सर्वथा. ॥ ४९ ॥ सोमदत्तीराजयाप्रती । युद्ध करीत शैब्यनृपती । बाणीं व्यापिली सर्व जगती । शैब्यें तयासी ख्याती लाविली. ॥ ५० ॥ उलूका कुंतिभोजा युद्ध दारुण । कुंतिभोजें लाविली आंगवण । सोडोनियां शत बाण । उलूकाचा रथ छेदिला. ॥ ५१ ॥ सर्वेची विंधोनी सात बाण । घेतला उलूकाचा प्राण । कृतवर्मा शिखंडी दोघेजण । मल्लयुद्धें भीडती. ॥ ५२ ॥ संग्राम करितां दारुण । सुटलें शिखंडीचें वसन । स्तनें पाहती बाहेर जन । म्हणोनी लज्जित पळाला. ॥ ५३ ॥ वारु चौताळती अद्भुत । उभय सैनिकां युद्ध होत । यंत्रबाण सोडितां तटतटीत । अग्निवर्षाव पैं होती. ॥ ५४ ॥ धूम्रमय झालें आकाश । कोण न देखती कोणास । शस्त्रें वर्षती आसपास । उभयदळीं महावीर. ॥ ५५ ॥ कौरवांचें सैन्य बहुत । पांडवदळ माघारलें किंचित् । हें देखोनी काळकृतांत । भीम भीमपराक्रमी. ॥ ५६ ॥ रथेंसी पातला पुढारीं । सैन्य घातलें माघारीं । उडी घालोनी एकसरीं । गदा भंवडीत चालिला. ॥ ५७ ॥ गदाघातें महाबळी, । करीत वीरांची रांगोळी । घाव घालितां कुंजरमौळीं[2] । भूमंडळीं रूळती. ॥ ५८ ॥ फुटती गजांचीं वदनें । दंत उसळती श्वेतवर्णें । शुंडा खंडोनी संपूर्णे । अशुद्ध स्रवे भूमीवरी. ॥ ५९ ॥ तैसेच भिरकावीत गगनातें । कृष्णाज्ञेनें नैर्ऋत्यदिशेतें । ते जाउनी लंकापुरातें । पडती जैसे पर्वतापरी. ॥ ६० ॥ त्या वेळीं अनेक गज । भीमें उडविले पैं सहज । ऐसा करीत चालिला झुज । महापराक्रमी बळियाढा[3]. ॥ ६१ ॥ त्यानंतरें रथियां सन्मुख । रथ रथासी आपटीत । स्वार स्वारांचें अनेक प्रेत । धाडी निमिषांत मृत्युपुरा. ॥ ६२ ॥ ऐसा रणकंदळ

---

१. शक्ति, पराक्रम. २. हत्तीच्या मस्तकीं. ३. बलाढ्य.

करीत जानां । अवचीत पाहिलें कौरवनाथा । येर भयें झाला पळता । दुर्योधन ते समयीं. ॥ ६३ ॥ राजा पळे सैन्यामाझारीं । रथ सोडोनी ते अवसरीं । तंव अकस्मात् धांवोनी करीं । भीमसेनें धरियेला. ॥ ६४ ॥ तोही गदापाणी बळोन्मत्त । भीमासवें युद्ध करीत । तों इकडे पार्थ गंगासुत । संग्राम करिती अतिक्रोधें. ॥ ६५ ॥ धनुष्यासी चढवुनी गुण । विंधिला एकशतबाणेंकरुन । तेणें अर्जुनरथ लोटोन । योजन एक मागें करी. ॥ ६६ ॥ तेणें पंचयोजनें भीष्म । रथेंसी टाकी वीरोत्तम । तेव्हां म्हणे पुरुषोत्तम । 'सामर्थ्य गहन भीष्माचें.' ॥ ६७ ॥ पार्थरथ माघारें जेव्हां होत । क्षणांत आणी श्रीकृष्णनाथ । अर्जुन देवदत्तबाणें उडवित । क्षणक्षणा दोघेही. ॥ ६८ ॥ अर्जुन म्हणे श्रीकृष्णातें । 'पंच योजनें उडवीं तयातें । तरी हा योजनें आम्हांतें । बाणेंकरुनी उडवीत.' ॥ ६९ ॥ श्रीकृष्ण म्हणे 'बरवें विचारीं । हरिहर तुझिया रथावरी । चौदा भुवनांहोनी भारी । झाला जाण रथ तुझा. ॥ ७० ॥ तूं तंव नरावतार गहन । हनुमंतासहित मजलागुन । एक योजन उडवित यान । सामर्थ्य गहन भीष्माचें.' ॥ ७१ ॥ ऐसें भीष्मा अर्जुना । युद्ध होतां कुरुनंदना! । इकडे दुर्योधनें जाणा । भीमगदा पैं भंगिली. ॥ ७२ ॥ भीमें जावोनी ते अवसरीं । मल्लविद्याकळांकुसरीं[1] । दुर्योधन धरिला करीं । घाय निष्ठुरीं ताडिला. ॥ ७३ ॥[2] तळवेकोंपरचपेटप्रहार । एकमेकां हाणिती निष्ठुर । गुडघेप्रहार लत्ताप्रहार । ताडोनियां पाडिती. ॥ ७४ ॥ मुष्टिघात ओपिती बळी । थरकताती[3] रथमौळी । दोघे घेती आंगकवळी । नाटोपती एकमेकां. ॥ ७५ ॥ दोघेही मल्लविद्ये कुशळ । दोघांचेंही समान बळ । परी सत्वशीळ कुंतीबाळ । तेणें सबळ भीमसेन. ॥ ७६ ॥ येर कुश्चित कपटी दुराचारा । तेणें दोषें निर्बल खरा । तंव चरणीं धरोनी गांधारा । भीमें सत्वरा उचलिलें. ॥ ७७ ॥ चरणीं धरोनी उचलिला वरी । भंवडी लाविली गगनोदरीं । द्रोणादिक सर्वही परी । म्हणती 'राजा निमाला.' ॥ ७८ ॥ द्रौणिद्रोणादिकीं संधान केलें । तें धृष्टद्युम्नें निरसिलें । कृपशल्यादि पातले । तिंहीं सोडिलें बाणजाळ. ॥ ७९ ॥ भीमासी कांहीं भेदिती बाण । तंव तो गांधारा आपटी पूर्ण । येर आक्रोश करी तेथोन । धांवें 'भीष्माचार्या!' म्हणोनी. ॥ ८० ॥ 'तुवां मज अभय दिलें । तें सकळही व्यर्थ झालें । म्यां पापिष्ठें वैर केलें । तया पांडुकुमरांसीं.' ॥ ८१ ॥ तंव दुःशासन आणि जयद्रथ । बाण सोडीत पातले तेथ । भीमें पायेंचीं

---

१. कौशल्यानें. २. ओ० ७३ ते ९४ मधील दुर्योधनास भीष्माचार्यांनीं सोडविलेली हकीकत मुळांत नाहीं. ३. भयानें कांपणें. सर्वसंग्रहाचा पाठः–थरकताती थरक मौळी.

हाणोनि रथ । कूट केले तयांचे. ॥ ८२ ॥ **द्रोण** म्हणे **क**र्णादिकांप्रती । 'का-सया वैर केलें दुर्मती ? । आम्हांसी माघां सांडुनी, युद्धार्थी । आपण निगुतीं गुंतला. ॥ ८३ ॥ आजी **भी**माचिया करीं । राजा न वांचे निर्धारीं । आतां कवणे एकेंपरी । **भीम** मारील **गां**धारा. ॥ ८४ ॥ **भीष्म** गुंतला असे झुजा । कवणेपरी सुटेल राजा ? । निर्वाण बाण लागतां माझा । अणुही **भीम** न ढळेची. ॥८५॥ आतां काय कीजे **सू**र्यात्मजा ! । अकीर्ती आली आम्हां सहजा । सामर्थ्यें सोडवावा राजा' । म्हणोनी सन्मुख धांवले. ॥ ८६ ॥ **भी**मसेन म्हणे त्यांतें । 'तुम्ही कितेक भीडतां मातें । आजी न सोडीं **गां**धारातें । प्राण घेईन सर्वथा.' ॥ ८७ ॥ तंव **दु**र्योधन हाका मारी । 'वेगीं पाचारात्रा **भी**ष्माचारी' । दूत धावोनियां **भी**ष्माचारी । सांगती जावोनी ते काळीं. ॥ ८८ ॥ 'राजा गेला जी गेला ! । **भी**माहातीं सांपडला ! । चरणीं धरोनी भंवडिला । नभपोकळी-माझारीं !' ॥ ८९ ॥ ऐकोनी[२] रथ फिरविला माघारीं । तेव्हां **पार्थ** म्हणे, 'ताता ! निर्धारीं । युद्ध सांडोनी काय परी । जातां ? योग्य हें नव्हे.' ॥ ९० ॥ तेव्हां **भीष्में** कानीं ऐकोनी । म्हणे 'दुर्योधनासी नेमवचनीं । त्यासी सोडवूं **भी**मापासोनी । मग **पा**र्थासीं रण पाहूं पैं.' ॥ ९१ ॥ येत्रोनि **भीष्म** **भी**मा-सन्मुखें । तंव **दु**र्योधन मारीत पैं हांके । मग **भा**र्गवदत्त बाणें एकें । **भी**मभु-जातें विंधिला. ॥ ९२ ॥ बाण बैसतां **भी**मभुजातें । हस्त खचलासे तेव्हां तेथें । **दु**र्योधन निष्टुनि पृथ्वीतें । मूर्च्छा येउनी पडियेला. ॥ ९३ ॥ तों सूर्यासी झालें अस्तमान । चतुर्थ दिवस झाला संपूर्ण । सावध होवोनी **दु**र्योधन । वंदी चरण **भी**ष्माचे. ॥ ९४ ॥ आपुलालीं दळें घेउन । जाते झाले गजरेंकरुन । आपुल्या शिबिरा जाउन । करिती आरामविश्रांती. ॥ ९५ ॥ मार्गीं येतां **दु**र्योधन । करी **भी**ष्माचार्यासी वर्णन । कोणी वर्णिती **भी**मालागुन । म्हणती धन्य बळार्य. ॥ ९६ ॥ **पां**डवसेना शिबिरा पातली । **पा**र्थ आणी श्री**वन**माळी । तेव्हां **मा**रुती होउनी बद्धांजळी । निरोप घेत जावया. ॥ ९७ ॥ घेउनी श्री-**कृ**ष्णाचा निरोप । **मा**रुती उडाला अमूप । श्री**राम**स्मरणें **राम**रूप । ध्यानीं गात अविलंबें. ॥ ९८ ॥ ऐसें **सं**जयें कथिलें रायासी । **वै**शंपायन म्हणे **ज**न्मे-जयासी । पुढें सादरें करीं श्रवणासी । श्रीगुरु**व्यास**कृपेकरुनी. ॥ ९९ ॥

---

१. तुकताच. २. या ओवीच्या ऐवजीं एका हस्तलिखित पोथींत दोन ओव्या आहेत; त्या अशाः—ऐसें वचन ऐकतां क्षणीं । रथ फिरविला तत्क्षणीं । तेव्हां **पा**र्थ बोलिला वाणी । भीष्माप्रती निष्ठुर ॥ "काका ! तुम्ही वडील वृद्ध । तरि युद्धा कां सांडितां प्रबुद्ध । येणें पलायनाचा शब्द । तुम्हांप्रती लागला." ॥

श्रीगुरुप्रभुविश्वंभर । शुभानंद विनवी वारंवार । श्रोत्यांसी म्हणे सादर । कथार्थसार परियेसा. ॥ १०० ॥ इति श्रीमन्महाभारते । श्रीव्यासकविविरचिते । भीष्मपर्वश्रवणीं श्रोते । सादरें श्रवणा आणा जे. ॥ १०१ ॥

---

## अध्याय अठ्ठाविसावा.

रात्री झालिया अवसरीं । दुर्योधन भीष्माची स्तुती करी । म्हणे 'पुनर्जन्म माझा तरी । तुमचेनी निर्धारीं पैं ताता!' ॥ १ ॥ म्हणे 'तुम्हीं वचन दीधलें । तेंची आजी सत्य केलें । भीमहस्तांतुनी सोडवीलें । पुरुषार्थेंकरुनियां. ॥ २ ॥ द्रोणादिक सर्वही असतां । भीमें गांजिलें मज सर्वथा । तुम्ही आलां म्हणोनी ताता! । प्राण माझे वांचले. ॥ ३ ॥ म्यां तुमचा भरंवसा धरुनी! । पांडवांसीं द्वंद्व मांडिलें झणीं । तरी उद्यां कृपा करोनी । पार्थालागीं पराभविजे.' ॥ ४ ॥ ऐसें बोलतां दुर्योधन । उत्तर बोले संबोखोन । 'तुज मीं पूर्वींच जाण । वचनेंकरुनी बोधिलें. ॥ ५ ॥ पांडव सत्यवादी वीर । त्यां जिंकील न कोणी भूवर । त्यांत श्रीकृष्णकृपा निरंतर । जय निश्चित त्यांसी पैं. ॥ ६ ॥ तरिही समरीं लावीन ख्याती । परी पांडव जय पावती । असो तुझिया कार्यार्थीं। प्राणासी उदार राजया! ॥७॥ जंववरी देहीं असे त्राण । तंववरी तुम्हांसी रक्षीन.'। ऐसें बोलोनी गंगानंदन । दुर्योधन शिबिरा पाठविला. ॥ ८ ॥ इकडे आज्ञा घेउनी । हनुमंत गेला लंकाभुवनीं । तंव तेथ आकांत जनीं । झाला गजकळेवरीं. ॥ ९ ॥ बिभीषणासी जाणविती । गजकळेवरें अद्भुत पडती । गृहगोपुरें मोडोन, मरती । अनेक राक्षस पैं कुळें. ॥ १० ॥ दुर्ग हुडे पडती कोसळुन । ऐकोनि चिंती स्तवी बिभीषण । मंदोदरीही भयेंकरुन । चिंताविष्ट झाली मानसीं. ॥ ११ ॥ तों श्रीरामकीर्तन करित । येतां देखिला हनुमंत । प्रेमेंकरूनि नाचत । श्रीरामभक्त चिरंजीवी. ॥ १२ ॥ बिभीषणें सामोरा जाउन । वंदिला अंजनीचा नंदन । उत्तमासनीं बैसवून । पाद्यपूजन पैं केलें. ॥ १३ ॥ मग मंदोदरी येउनी । नमन केलें मारुतीचरणीं । सांगती झाली आश्चर्येंकरुनी । मारुतीतें तेधवां. ॥ १४ ॥ 'तुम्हीं काल निरोपुनी[1] गेले । सर्वेंचि ग्रामीं प्रळय मांडलें । मेघवृष्टीसारिखें पीडिलें । मृतहस्तिकलेवरें. ॥१५॥ जैसे वर्षती गिरिवर । तैसे पडती पैं कुंजर । तेणें भग्न झालें नगर । गृहगोपुरें मोडोनी. ॥ १६ ॥ मोडोनी अमूल्य मंदिरें । उत्तम उत्तम आमुचीं

---

१. बोलावून, हाक मारून.

घरें । नगर झालें जी! चकचूरें । मोडलीं इतरांचीं अनेक. ॥ १७ ॥ राक्षस निमाले असंख्यात । स्त्री भर्ते कुटुंबासहित । गायी महिषी निमाल्या बहुत, । ऐसा अनर्थ पैं झाला. ॥ १८ ॥ हें अद्भुत कोणते स्थानीं । होताहे नकळे आम्हांलागोनी.' । मग **मा**रुती म्हणे 'तुजला अजुनी । उमज नपडे सुजाणे! ॥ १९ ॥ **कु**रुक्षेत्रीं **भा**रतीयुद्ध होत । **पा**र्थबंधु **कुं**तीसुत । **भी**मनामें पराक्रमी विख्यात । तो उडवीत गजकलेवरें. ॥ २० ॥ तयाचे युद्धसमयीं निश्चिती । गज भिरकावी गगनपंथीं । तेचि येथें येउनी पडती । कांहीं पडती दिगंतीं. ॥ २१ ॥ कुंजर उडवितां गगनीं । तया रणांत सुजाणी! । कांहीं पडती **लं**काभुवनीं । तेणें मोडती गोपुरें.' ॥ २२ ॥ तेव्हां **म**यसुता आश्चर्य करी । म्हणे 'सत्य अवतरला **ह**री । नकळे महिमा तयाचा तरी । ऐसें घडलें ये स्थळीं. ॥ २३ ॥ वानरांहातीं आम्हांसी । दंड केलासे राक्षसांसी' । मग म्हणे **मा**रुतीसी । 'राक्षस साह्यासी पाठवीन. ॥ २४ ॥ तरी सांगें श्री**कृ**ष्णनाथा । सहस्रवेळां मौळी आतां । चरणीं म्हणोनी **अं**जनीसुता! । श्री**कृ**ष्णरायासीं पैं माझें. ॥ २५ ॥ तुवांचि स्थापिलें आम्हांतें । तुझेनी सुखरूप आम्ही येथें । तरी तुजची शरण निश्चितें । म्हणोनी जाणवी कपिराया! ॥ २६ ॥ तुझी आज्ञा ते प्रमाण । तरी साह्यार्थ पाठवितें सैन्य । जरी करिसी आज्ञावचन । राक्षसगण **कु**रुक्षेत्रा. ॥ २७ ॥ तूं पूर्णब्रह्म निराकार । तुज तूंचि साह्य परात्पर । असतां राक्षसादिक पामर । तुतें काय साह्य करिती. ॥ २८ ॥ तुम्हीं आज्ञापिलें सहजस्थिती । ते मज आतां कळली निश्चिती । तूं **मा**याचाळक **श्री**पती । रक्षीं बहूत आम्हांतें. ॥ २९ ॥ आतां जो येइल निरोपू कांहीं । तो मस्तकीं आमुच्या, पाहीं । ऐसी विनंती श्री**कृ**ष्णपायीं । निवेदीं पां **मा**रुती!' ॥ ३० ॥ इतुक्यांत प्रातःकाळ झाला । **सं**जय म्हणे रायाला । 'पुढां पंचम दिवस मांडला । संग्रामाचा जाण पां.' ॥ ३१ ॥ **ज**न्मेजयासी म्हणे **ऋ**षी । **ह**नुमंत आला **कु**रुक्षेत्रासी । वंदोनियां श्री**कृ**ष्णासी । वृत्तांत सर्वेही निवेदिला. ॥ ३२ ॥ जाणोनि **मं**दोदरीची विनंती । श्री**कृ**ष्ण म्हणे **भी**माप्रती । नैर्ऋत्यदिशा वंचोनि हस्ती । टाकीत जाइं इतर दिशां. ॥ ३३ ॥ अवश्य म्हणोनी **भी**मसेन । सैन्य सिद्ध झालें ते क्षण । दोनी दळें वाद्यगजरें करुन । रणस्थानासी पैं आलीं. ॥ ३४ ॥ दोनी दळीं दोनी रथ । शोभती जैसे उंच पर्वत । **पा**र्थ आणी **गं**गासुत । पाहती देव आश्चर्यें. ॥ ३५ ॥ त्या दिवसीं सर्पाकार ।

---

१. नगराचे तुकडे तुकडे झाले. चकचूर=चक्काचूर, पीठ. २. धृतराष्ट्राला. ३. येथें मूळांतील विश्वोपाख्यान गाळलें आहे.

विभु रची गंगाकुमर । ती रचना पांचाळकुमर । पांडवसैन्यीं पैं रची. ॥ ३६ ॥ अर्जुनरथीं कमळावर । सारथी शोभे भुवनसुंदर । पांचजन्य वाजविला थोर । पांडवीं आपले वाजविले. ॥ ३७ ॥ त्यांत वाद्यांचा गजर । तया गजरीं अंजनीकुमर । भूतें वेष्टित भुभुःकार । तेणें दिगंतर नादलें. ॥ ३८ ॥ भयभीत झाले चतुर्दश । लोक सर्वही निःशेष । कृतांतही कांपे बहुवस । तो नाद ऐकोनी. ॥ ३९ ॥ पांडवदळीं आनंद गहन । उल्हासयुक्त सकळ सैन्य । वाटे कृतांतासी शिक्षा लावून । टाकिती जाण क्षणार्धें. ॥ ४० ॥ तें देखोनि भयभीत । कौरवदळ मनीं होत । तंव धांवला सुभद्रासुत । बाण वर्षत भीष्मावरी. ॥ ४१ ॥ देखोनि सौभद्राचें संधान । भीष्म झाला आनंदघन । म्हणे हा होय प्रतिअर्जुन । वंश धन्य याचेनी. ॥ ४२ ॥ सोमदत्तें ते अवसरीं । शक्ति टाकिली अभिमन्युवरी । येरें छेदोनि झडकरी । त्याची त्यावरी पाडिली. ॥ ४३ ॥ यावरी तो उत्तरापती । महारणपंडित पुरुषार्थी । बाणजाळीं सकळांप्रती । जर्जर झाला करिता. ॥ ४४ ॥ शल्यनामा कौरववीर । धांविनला धृष्टद्युम्नावर । बाणधारीं रहंवर[1] । अश्वसारथी मारिले. ॥ ४५॥ मग चरणचाली धृष्टद्युम्न । हातीं घेउनी असिलतावोडण । शल्यवीराचें शिर छेदोन । कंठनाळ टाकिलें. ॥ ४६ ॥ त्याचा पिता संयमनी । तेणें रण माजविलें तेक्षणीं । तें सात्यकिवीरें देखोनी । यमसदना धाडिला. ॥ ४७ ॥ अपार सेना घेउन । पुढां आला सुयोधन । त्यावरी धांवला भीमसेन । हाकें गगन गाजवीत. ॥ ४८ ॥ पंचवीससहस्र हस्ती । गदाघायें पाडिले क्षितीं । तीन सहस्र महारथी । केले रणपंथीं चूर्ण पैं. ॥ ४९ ॥ गजारूढ भगदत्त । भीमावरी वर्षत बाण धांवत । बाणजाळीं अद्भुत । वृकोदर झांकिला. ॥ ५०॥ तंव घटोत्कच हाक देत । धांवला जैसा प्रळयकृतांत । वर्षला शिळा पर्वत । भगदत्त घाबिरला. ॥ ५१ ॥ पाडित शिळांचा पर्जन्य । पळूं लागलें कौरवसैन्य । म्हणती 'आला रे! भीमनंदन' । घेती रान भयेंकरुनी. ॥ ५२ ॥ पांडवसेनेचें परम बळ । अवघे वीर उतावीळ । दुर्योधनाचें हृदयकमळ । धकधकीत अतिभयें. ॥ ५३ ॥ दुर्योधन म्हणे, 'गंगानंदना! । पांडवीं आटिली माझी सेना । उरली तीही उरेना । मज पूर्ण कळों आलें. ॥ ५४ ॥ तुम्हीं वडिलीं सांगितली रीती । ते मीं धरिली नाहीं चित्तीं' । भीष्म म्हणे, 'आतां प्रतीती । आली तुज सुयोधना! ॥ ५५ ॥ ज्यापक्षीं वैकुंठनाथ । जय लाभ तिकडे समस्त । पांडव सन्मार्गें वर्तत । यश प्राप्त सदां त्यांसी. ॥ ५६ ॥

---

१. रथ.

अजूनि तरी दुर्योधना! । शरण रिघें श्रीकृष्णचरणा । तो ब्रह्मानंद वैकुंठराणा । वेद पुराणा वंद्य जो. ॥५७॥ ब्रह्मादिकांचें निज ध्यान । अपर्णावराचें देवतार्चन । तयासीं तूं रिघें शरण । सोडीं अभिमान पाहें पां.' ॥ ५८ ॥ मग म्हणे दुर्योधन । 'पहिलेंच गेलों मी चुकोन । आतां अभिमानें द्यावा प्राण । परी शरण न जायीं मी. ॥ ५९ ॥ मिळाले पृथ्वीचे नृपवर । यांदेखतां जोडोनि कर । शरण जाउनी पंडुकुमर । सांग गजपुरा केविं आणूं? ॥ ६० ॥ तूं भीष्म काळासी अनिवार । द्रोण कर्ण काळासी जिंकणार । मज शरण जा म्हणतां निर्धार । लाज गेली तुमची कीं. ॥ ६१ ॥ युद्ध मांडोनि विशेष । आज चालतो पांचवा दिवस । पुढें माजवावा वीररस । जो सुरस भुवनत्रयीं.' ॥ ६२ ॥ ऐसें दुर्योधन भीष्मासी । बोलिला राया! परियेसीं । तेंचि सांगे वैशंपायन ऋषी । जन्मेजया आवडीं. ॥ ६३ ॥ श्रीगुरुप्रभुविश्वंभर । शुभानंद तयाचा किंकर । श्रोत्यांसी म्हणे वारंवार । भक्तिप्रेमें श्रवण करा. ॥ ६४ ॥ इति श्रीमन्महाभारते । श्रीव्यासकविविरचिते । भीष्मपर्व भावार्थे । ऐकतां मुक्त पैं होती. ॥ ६५ ॥

---

## अध्याय एकुणतिसावा.

भीष्म आणि सुभद्रापती । रणरंगीं उभे शोभती । दोघांचें युद्ध विलोकिती । सुरासुरपती विमानीं. ॥ १ ॥ एक कल्पांतींचा चंडकिरण । दुसरा केवळ प्रळयाग्न । किंवा [२]भृगुकुळभूषण । रघुकुळमंडण दुसरा. ॥ २ ॥ एक कृतांत, एक काळ । एक [३]कुंभिनी, एक [४]निराळ । एक वासुकी, एक शेष केवळ । तैसे दोघे दीसती. ॥ ३ ॥ भीष्मावरी सहस्र बाण । टाकिता झाला वीर अर्जुन । तितुकेही त्याणें निवारुन । सोडी मार्गण दोनी सहस्र. ॥ ४ ॥ तंव पार्थे निवारुनी वरिच्यावरी । तव शिखंडी धांवे दळभारीं । बाण वर्षत भीष्मावरी । मेघधारा जैशा कां. ॥ ५ ॥ शिखंडी सोडी असंख्य बाण । तिकडे न पाहे गंगानंदन । न टाकी एकही बाण । स्त्रीत्व म्हणुन पूर्वीं तो. ॥ ६ ॥ आधीं स्त्री मग पुरुष । त्यावरी पूर्वजन्मींचा द्वेष । म्हणोनी तो कुरुवीरेश । बाण सहसा न टाकी. ॥ ७ ॥ मग शिखंडीवरी बाण । घालिता झाला गुरु द्रोण । तंव हाक फोडीत भीमसेन । येतां वीर भयभीत. ॥ ८ ॥ चातुरंग दळ अपार । संहारीत जात वृकोदर । गदाघायें रथ कुंजर । चूर्ण करित न-

---

१. शंकराचें. २. भार्गवराम. ३. कुंभिनी=पृथ्वी. ४. निराळ=अंतराळ.

गणीच. ॥ ९ ॥ इकडे रणांगणीं **वि**जयरथ । दिसे जैसा उंच पर्वत । त्यावरी ध्वज नभचुंबित । भंवता दिसे दशयोजनें. ॥ १० ॥ त्यावरी विशाळ रूप धरुन । **अं**जनीसुत विक्राळवदन । प्रळयविजे समान । ऊर्ध्व लांगूल केलें असे. ॥ ११ ॥ गाजवी पुच्छाचा फडत्कार । वेळोवेळां देत भुभुःकार । त्यांत उभय **कृ**ष्ण परम घोर । शंख स्फुरिती आवेशें. ॥ १२ ॥ त्यांत **गां**डीवाची ऐकतां ध्वनी । टाळी बैसली **दि**ग्गजकर्णी । **कौ**रवीं तो घोष ऐकोनी । पाठी दडती **भी**ष्माच्या. ॥ १३ ॥ एकास दाटला हिमज्वर । एक वाहनें टाकूनि सत्वर । **भी**ष्मरथामागें वीर । भयातुर दडती पैं. ॥ १४ ॥ त्यांत नामाणुगे महावीर । निवडिले पहा चौदासहस्र । तिहीं वेढिला **पा**र्थ वीर । सोडिती बाण चपळत्वें. ॥ १५ ॥ दाटला बाणमंडप थोर । दिवसा पडला अंधकार । चौदासहस्र वीर । करोनि जर्जर संहारिले. ॥ १६ ॥ लघुलाघवी **पृ**थानंदन । उभयकरांचें सम संधान । संधानवेग परम गहन । सोडी बाण चपळत्वें. ॥ १७ ॥ बाण मेघधारा तत्वता । असिलता झळकती विद्युल्लता । तंव **ज**यद्रथ अवचिता । **पा**र्थावरी चौताळला. ॥ १८ ॥ **अ**र्जुन म्हणे 'रे! तस्करा! । महामळिना! दुष्टा! निष्ठुरा! । आम्ही नसतां **द्रौ**पदी सुंदरा । चोरोनि नेत होतासी. ॥ १९ ॥ शिरीं पाट काढितां जाण । आलासी काकुळती दीनवदन । मग **ध**र्मराजें सोडुन । तुज दिधलें पामरा! ॥ २० ॥ तोच तूं काळें वदन घेउनी । युद्धा आलासी मजलागुनी । तरी आतां धीर धरीं रणांगणीं । पाठ देउनी पळूं नको.' ॥ २१ ॥ **ज**यद्रथ नेदी प्रत्युत्तर । टाकी **पा**र्थावरी बाण घोर । **अ**र्जुन टाकूनि महाशर । हृदयवर्मी भेदिला. ॥ २२ ॥ विकळ झाला **ज**यद्रथ । सारथियानें फिरविला रथ । इकडे **त्रि**गर्त आणि **न**कुळ बहुत । युद्ध करिती समरांगणीं. ॥ २३ ॥ तंव धांविन्नला **कृ**पीनंदन । हृदय **पा**र्थाचें लक्षुन । भेदिता झाला दाहा बाण । होती चूर्ण गिरी जेणें. ॥ २४ ॥ सर्वेची तो वीर **द्रौ**णी । श्री**कृ**ष्ण विंधिला सत्तरीं बाणीं । ऐसें **अ**र्जुनें विलोकुनी । निर्वाणशर सोडिला. ॥ २५ ॥ सर्वांगीं खिळिला **गु**रुनंदन । ध्वजीं टेंकला मूर्च्छा येउन । मग उगाच राहिला **अ**र्जुन । सहसा बाण सोडीना. ॥ २६ ॥ म्हणे 'गुरुबंधु आणि ब्राह्मण । यांसीं न मारावें गेलिया प्राण । जळो हा क्षात्रधर्म दारुण । अन्याय होतो पाहातां.' ॥ २७ ॥ **सा**त्यकीचे दाहा पुत्र । पुढां धांवले

१. पुच्छ. २. नावाजते.

वर्षत शर । तों **भू**रिश्रवा **कौ**रववीर । त्यांसीं युद्धा प्रवर्तला. ॥ २८ ॥ एक यामपर्यंत । दाही बाळें युद्ध करित । तेहीं **कौ**रवसेना समस्त । बाणजाळें झांकिली. ॥ २९ ॥ मग **भू**रिश्रव्यानें दशबाणीं । दाहाही सुत मारिले रणीं । **सा**त्यकी धांवला ते क्षणीं । प्रळय**का**ळ जैसा कां. ॥ ३० ॥ **भू**रिश्रव्याचा सारथी । केला चूर्ण शरपंथीं । **कौ**रवसैन्य पंचवीससहस्र रथी । समरभूमीं पहुडविले. ॥ ३१ ॥ इतुकियांत सूर्यास्तमान । पांच दिवस झाले संपूर्ण । चतुःप्रहर यामिनी[1] क्रमून । प्रभाते सूर्योदय झाला. ॥ ३२ ॥ आज साहावा दिवस । चालतो, राजा! पैं विशेप । युद्ध होईल तें निःशेप । सादरेंकरुनी परियेंसीं. ॥ ३३ ॥ सकळ सेना समरांगणीं । सिद्ध झाली युद्धनिर्वाणीं । युद्ध मांडलें दारुण ते क्षणीं । त्यांत **भी**मसेन धांविन्नला. ॥ ३४ ॥ शिखी[2] लागतां जाळी तृण । तेवीं **भी**में मारिलें सैन्य । तंव **सा**त्यकिवीरें[3] वेगेंकरून । मागां धांवोनी आलासे. ॥ ३५ ॥ चरणचाली **भी**म सैन्यांत । मिसळतां रिता देखिला रथ । तेव्हां **सा**त्यकी झाला भयाभीत । म्हणे '**भी**मासी नेणों काय झालें' ॥ ३६ ॥ अश्रुधारा वाहती नयनीं । घेत वक्षःस्थळ बडवुनी । तंव **भी**मसारथी ते क्षणीं । **वि**शोक जवळी पातला. ॥ ३७ ॥ म्हणे '**भी**म आहे स्वस्ति क्षेम । सेनेंत करितो घोर संग्राम । समुद्रीं मत्स्य जैसा परम । चौताळतो चपळत्वें.' ॥ ३८ ॥ मग घेऊनि असिलतावोडण । धांवे **सा**त्यकि पंचानन । **भी**म देखोनी आनंदघन । रणांगणीं नाचतसे. ॥ ३९ ॥ मग **सा**त्यकी आणि **भी**मसेन । वीससहस्र वीर मारून । **कौ**रवदळ पळवून । विजयी होउन परतले. ॥ ४० ॥ सकळ सेना घेऊन । पुढें धांविन्नला **दु**र्योधन । तंव **द्रौ**पदीचे पंच नंदन । वर्षत बाण ऊठिले. ॥ ४१ ॥ सकळ शरीं करुनी जर्जर । कुमरीं पळविले **कौ**रवभार । तेव्हां रक्तप्रवाह**गं**गापूर । लवणाब्धी पाहूं धांवती. ॥ ४२ ॥ त्या दिवसीं इतकिया वीरांनीं । पराक्रमें पळविली **कौ**रववाहिनी । तेव्हां अस्ता गेला तरणी । दिवस सहा होउनी गेले. ॥ ४३ ॥ त्यानंतरें प्रभातकाळें । सातवे दिवसीं युद्ध मांडलें । **दु**र्योधनासी ते वेळे । **भी**म बोले रणांगणीं. ॥ ४४ ॥ म्हणे '**दु**र्योधना! रण टाकुन । निर्लज्जा पळूं नको येथुन । तुवां जें कर्म केलें गहन । त्याचें फळ भोगीं पामरा! ॥ ४५ ॥ आम्ही षंढतिलतुल्य जाण । उलूकाहातीं[4] पाठविलें सांगुन । आतां तुझें शतखंड

१. रात्र. २. अग्नि. ३. येथें सात्यकी भीमाच्या शोधार्थ आला असें म्हटलें आहे पण मूळांत भीमाच्या साहाय्यास धृष्टद्युम्न आला व त्यानें भीमाचा सारथि विशोक यास विचारिलें असें आहे. अ० ७७ श्लो० १७।१८।२०. ४. शुभानंदकृत उद्योगपर्व अध्याय ४८ पहा.

वदन । तरी करावें वाटे दुर्जना! ॥ ४६ ॥ गदाघायें परम दारुण । आंग तुझें मी करीन चूर्ण । आणि लत्ताप्रहारेंकरुन । रगडीन जाण मस्तक तुझा.' ॥ ४७ ॥ ऐसें बोलोनी **भी**मसेन । घातले **दु**र्योधनावरी बाण । अश्व सारथी आणि स्यंदन । केला चूर्ण रणरंगीं. ॥ ४८ ॥ छत्र, ध्वज, तूणीर, । चापही छेदिलें सत्वर । मग धांवोनी बहुत वीर । **दु**र्योधना पळविती. ॥ ४९ ॥ **पा**र्थे सोडोनी **इं**द्रास्त्र । बहुत खिळिले नृपवर । सहस्रांचे सहस्र वीर । पाठी येती **भी**ष्माच्या. ॥ ५० ॥ रणसागरीं अचाट । **भी**ष्मरथ हेंची बेट । कासावीस वीर जे श्रेष्ठ । त्याच्या आश्रयें राहाती. ॥ ५१ ॥ **वि**राट आणि **द्रो**ण । माजविती समरांगण । परी **द्रो**णाचें सामर्थ्य गहन । **वि**राट निघोन चालिला. ॥ ५२ ॥ **चि**त्रसेन, **दु**र्योधन, **वि**कर्ण, । **सौ**भद्रावरी धांवले तिघेजण । जैसे त्रिदोष दारुण । कळेवरांसी व्यापिती. ॥ ५३ ॥ परी [1]आगळें करी **दु**र्योधन । छेदी **सौ**भद्राचा स्यंदन । अश्व सारथी मारोन । ध्वजही खालीं पाडिला. ॥ ५४ ॥ तिघेही वर्षती शर । परम प्रतापी **उ**त्तरावर । लघुलाघवें समरीं समग्र । सायक त्यांचे छेदिले. ॥ ५५ ॥ चरणचाली युद्ध करीत । रणीं एकला **वि**राटजामात । श्री**कृ**ष्ण [3]**कृ**ष्णासी सांगत । संकटीं पडला [2]जलद तुझा. ॥ ५६ ॥ पातया पातें न लगत । तितुकियांत पातला **पा**र्थ । छेदोनी तिघांचेही रथ । भूमीवरी आणिले. ॥ ५७ ॥ पिच्छें पसरिजे मोरीं । तैसे खिळिले शरीं । समस्त राजे ते अवसरीं । पळविते झाले तिघांतें. ॥ ५८ ॥ **पा**र्थें परमप्रतापें । छेदिलीं सकळ वीरांचीं चापें । सर्वेची तूणीरें सौक्षेपें । छेदिलीं सकळ सेनेचीं. ॥ ५९ ॥ परम बळिये महारथी । एकाकडे एक पाहती । म्हणती बरवी न दिसे गती । पळती वेगेंकरूनियां. ॥ ६० ॥ **ध**र्म 'म्हणे **द्रु**पदकुमरा! । ऐकें **शि**खंडी! महावीरा! । आपुली प्रतिज्ञा सत्वरा । खरी करोनी दावीं कां. ॥ ६१ ॥ समरांगणीं युद्ध करून । टाकीं **भी**ष्मासी वधून,' । **शि**खंडी अवश्य म्हणोन । सोडीत बाण **भी**ष्मावरी. ॥ ६२ ॥ तिकडे न पाहे **गं**गानंदन निश्चित । जैसी पुष्पवृष्टी होतां मदोन्मत्त । कीं तृणकाड्यांनीं सहसा पर्वत । खेदें स्थान सोडीना. ॥ ६३ ॥ अवीट वीर **गं**गानंदन । समोर **शि**खंडी अव्हेरुन । आणखीकडे जाय धांवोन । संहारीत **पां**डवसेना. ॥ ६४ ॥ सप्त दिवस झाले पूर्ण । पुढें लागला अष्टम दिन । परम घोर झालें रण । **गं**गानंदन युद्ध करी. ॥ ६५ ॥ वृषभभारावरी पंचानन । तैशापरी प्रवेशे **भी**मसेन । बाणजाळीं सकळ सैन्य ।

---

१. भाता. २. अधिक, जास्ती. ३. अर्जुनासी. ४. उदक देणारा (पुत्र). ५. पराक्रमें.

संहारिलें प्रतापें. ॥ ६६ ॥ सुनाभी राजा भीमावरी । कोसळे जैसा गिरिवरी गिरी । युद्ध झालें घटिका चारी । भीमें समरीं मारिला मग. ॥ ६७ ॥ त्याचें घेऊनियां शिर । गगनीं भिरकावी वृकोदर । दुर्योधनापुढें सत्वर । मागुतीं उतरोनी पडियेलें. ॥ ६८ ॥ कुंडधार, शतपंडित । त्यांचा भीमें केला निःपात । विशाळाक्ष, आदित्यकेत, । महोदरही संहारिला. ॥ ६९॥ ऐसा संहार देखोन । चिंतार्णवीं पडला सुयोधन । म्हणे 'विदुर बोलिला जें वचन । तैसेंची होत चालिलें.' ॥ ७० ॥ भीष्मापुढें जाऊन । दुर्योधन करी रोदन । गांगेय म्हणे 'पूर्वी वचन । ऐकिलें नाहीं वडिलांचें. ॥ ७१ ॥ अजूनतरी सांडीं अभिमाना । शरण जाईं श्रीकृष्णचरणा;' । परी तें न माने दुर्योधना। दिव्यान्न जैसें रोगिष्ठा. ॥ ७२ ॥ तों रण माजलें अपार । इरावान नामें पार्थपुत्र । उलुपी शेषकन्या पवित्र । तिचे पोटीं तो झाला. ॥ ७३ ॥ तेणें माजविली रणमेदिनी । शरीं झांकिली कौरववाहिनी । त्याचें युद्ध कुशळ पाहोनी । पांडवीं ग्रीवा डोलविली. ॥ ७४ ॥ शकुनीचे[1] पांच सुत । गज, वृक्ष, वृषकेत, । चर्मवान, पांचवा सत्य, । युद्ध करिती रणांगणीं. ॥ ७५ ॥ इरावान योद्धा प्रबळ । पांचांचीं शिरें उडविलीं तत्काळ । मग अलंबुष[2] राक्षस सबळ । दुर्योधनें प्रेरिला. ॥ ७६ ॥ मायिक कपटी निशाचर । तेणें युद्ध केलें अपार । नाना रूपें धरी भ्यासुर । वृकव्याघ्रसर्पादी. ॥ ७७ ॥ सहस्रावधी रूपें आपुलीं । अलंबुषें तेव्हां धरिलीं । इरावानेंही तैसींच केलीं । नाटोपेची राक्षसातें. ॥ ७८ ॥ मग कपटी राक्षस बहुत । ऊर्ध्वपंथें येउनी अकस्मात । शिर छेदुनी क्षणांत । इरावानाचें पैं नेलें. ॥ ७९ ॥ पांडवदळीं हाहाकार । मग तो घटोत्कच महावीर । करीत चालिला संहार । असुरभार घेउनी. ॥ ८० ॥ असंख्य शिळांचा संभार । चहुंकडोनी वृक्षांचा मार । रथारूढ भीमपुत्र । सुयोधनावरी धांविन्नला. ॥ ८१ ॥ म्हणे 'दुर्योधना! पापखाणी! । आजी मारीन तुजला रणीं । माझे पितर वनोपवनीं । तुवां हिंडविले पामरा! ॥८२॥ माझी माता याज्ञसेनी । सभे नेली तुवां पापखाणी! । तरी तूं आजी समरांगणीं । दुर्जना! न करीं पलायन.' ॥ ८३ ॥ अधर रगडोनी दांतीं । घटोत्कचें प्रेरिली शक्ती । तंव वंगराजें प्रेरिला हस्ती । असुरासमोर तेधवां. ॥ ८४ ॥ तंव शक्ती आली बळेंकरून । गज पाडिला विदारून । वंगराज उतरोन । एकीकडे पैं झाला. ॥८५॥

---

१. मूळांत शकुनीच्या सहा मुलांचा उल्लेख असून, त्यांचीं नांवें अशीं आहेत:—गज, गवाक्ष, वृषभ, चर्मवान्, आर्जव व शुक. २. मूळांत ही कामगिरी आर्षशृंगी राक्षसावर सोंपविली असें आहे.

दुर्योधनावरी निर्वाणशर । घटोत्कचें सोडिले अपार । भयभीत कौरवेश्वर । सोडोनी समर चालिला. ॥ ८६ ॥ तंव द्रोण आणि शारद्वत । धांवले पुढें बाण वर्षत । महावीर रणपंडित । घटोत्कच नाटोपे. ॥ ८७ ॥ क्षणामाजी होय गुप्त । सर्वेचि गगनोदरीं जात । तेथोनियां बाण वर्षत । मेघधारा जैशा कां. ॥ ८८ ॥ मागुतीं भूमीवरी येत । द्रोणावरी बाण सोडीत । तंव घटोत्कचाचा रथ । द्रोणें छेदूनि पाडिला. ॥ ८९ ॥ घटोत्कच एकला देखोन । द्रौपदीचे पंच नंदन । आणि वायूसि मागें टाकून । अभिमन्यू धाविन्नला. ॥ ९० ॥ घटोत्कच आणि साही कुमर । रणभूमी माजविली अपार । तींत धांवला वृ-कोदर । हाकें अंबर गाजविलें. ॥ ९१ ॥ थोर माजली रणधुमाळी । कौरव-सेना विभांडली । सातही कुमर महाबळी । देखोनी चळीं काळ कांपे. ॥ ९२ ॥ गजारूढ भगदत्त । धांवला जैसा प्रळयकृतांत । घटोत्कचावरी शक्ती अद्भुत । प्रेरिता झाला तेधवां. ॥ ९३ ॥ घटोत्कचें तये वेळीं । धांवोनी वेगें अंतराळीं । प्रळयशक्ती हातीं धरिली । घालोनि मोडिली पायांखालीं. ॥ ९४ ॥ पांडव-आदिकरून सर्व नृपती । तर्जनीमस्तक डोलविती । धन्य धन्य वीराची शक्ती । विचित्र गती अभिनव. ॥ ९५ ॥ इकडे भीमें केलें अपूर्व । कुंडनामा वीर कौरव । त्याणें युद्धाची धरोनी हांव । भीमासमोर धांविन्नला. ॥ ९६ ॥ तो पायीं वृकोदरें धरुनी । आपटुनी मारिला रणमेदिनीं । इकडे पार्थेंही ते क्षणीं । संहारिली बहु सेना. ॥९७॥ भीष्म, द्रोण, गौतमकुमर, । पार्थासी करिती घोर समर । तरी तो रणशूर अनिवार । तितुक्यांसही नाटोपे. ॥ ९८ ॥ त्या युद्धांत अभिमन्यु । धांविन्नला वर्षत बाणु । जैसा प्रळयानळासी प्रभंजनु । साह्य पा-ठीसी धांविन्नला. ॥ ९९ ॥ वीज प्रवेशे वनांत । तैसा सौभद्र वेगीं तळपत । त्यांत धृष्टद्युम्न धांवत । प्रळय अत्यंत वर्षला. ॥ १०० ॥ कंदुकाऐसीं शिरें । ऊर्ध्वपंथें जाती अपारें । हाहाकार एकसरें । कौरवदळीं जाहला. ॥ १०१ ॥ तंव मावळला वासरमणी । स्वस्थाना पातल्या उभय वाहिनी । कीं ते काळपु-रुषाची भगिनी । आकाशोदरीं व्यापिली. ॥ १०२ ॥ दोनी वाहिनी दोनी स्थानीं । गेल्या आपुल्या शिबिरालागुनी । ऐशापरी राया ! अष्टमदिनीं । झालें म्हणे संजय. ॥ १०३ ॥ वैशंपायन जन्मेजया । म्हणे 'ऐकें महाराया ! । व्या-सकृपें व्यासोक्त ऐकावया । सादरें श्रवण करीं पां.' ॥ १०४ ॥ श्रीगुरुप्रभु-विश्वंभर । श्रोत्यांसी विनवी वारंवार । शुभानंद जोडोनी कर । कथार्थ सादर

१. पांडवांच्या सात मुलांचीं नांवें:-प्रतिविंध्य, श्रुतसेन, घटोत्कच, श्रुतकीर्ति, अभिमन्यु, शतानीक आणि श्रुतकर्मा.

गतों यथार्थ । जो भार्गवावतार समर्थ । क्षत्रियनाशार्थ जन्मलासे. ॥ ३४ ॥ कृतायुगीं अवतार चारी । त्रेतायुगीं तीनी निर्धारीं । द्वापारीं एक हा कंसारी । श्रीकृष्णराय चक्रधर. ॥ ३५ ॥ त्यांत दोनी अवतार घेतले । ब्राह्मणकुळीं जाणोनि भले । त्यांत भार्गवकथाचरित्र वहिलें । ऐकें राया! सादर. ॥ ३६ ॥ एका एका चौकडीप्रती । विष्णूचे दाहा अवतार होती । साधुपालनदुष्टदमनार्थी । अविचार दुर्मती मारावया. ॥ ३७ ॥ कृतयुगीं दैत्य दारुण । जे मारी, तेची क्षत्री जन्मून । त्रेतायुगीं माजले म्हणून । धरा सीणत त्याभारें. ॥ ३८ ॥ तो कृतवीर्यात्मज निश्चितीं । सहस्रबाहो त्यासी म्हणती । त्याणें त्रासिली सकळ क्षिती । शंकरवरदार्थी राजया! ॥ ३९ ॥ त्याच्या दोषें त्रासेंकरून । पृथ्वी उ-बगोनी गेली शरण । गायत्रीवेषें ब्रह्मयालागून । तेणें 'ना भी' वचन दीधलें. ॥ ४० ॥ मग तो चतुर्मुख आणि सुर । पावले क्षीराब्धीचें तीर । म्हणती 'जयजय योगेश्वर! । त्रासिलें आम्हांसीं क्षत्रियें. ॥४१॥ जयजय क्षीराब्धिजा-वरा! । असुरदमना! मधुमुरहरा! । जयजय अनादी! दीनोद्धारा! । विश्वंभरा! विश्वमूर्ती!' ॥ ४२ ॥ ऐसी स्तुति सुरांसहित । म्हणती देव 'माजलेत । असुर दैत्यक्षत्री जन्मत । धरा पीडिती दुष्कर्में. ॥ ४३ ॥ अनेक पापक्रिया पृथ्वीवरी । ब्राह्मणसाधूंची हेळणा करी । कुकर्में अधर्म करिताति भारी । भूमी थरथरी दी-नरूपें. ॥ ४४ ॥ देवा! आम्हांसीं व्यापारीं । तुवां लाविलेंसे निर्धारीं । आणी योगनिद्रेभीतरी । विसराविसरी आम्हांसीं. ॥ ४५ ॥ रसातळा पृथ्वी जात । भयें थरथरां कांपत । तुजविण तारिता समर्थ । कोणी नसे श्रीपती!' ॥४६॥ ऐसें गाराणें सांगुनी । स्तविला श्रीचक्रपाणी । सुरवरीं चतुर्मुखें ते क्षणीं । ऐकें शेषशयनीं श्रीविष्णु. ॥ ४७ ॥ म्हणे मग वचन गंभीर । 'ना भीतसां हो सुर-वर! । सर्वेही ऐका हो उत्तर । निर्भय साचार असावें.' ॥ ४८ ॥ ऐसी अंत-रिक्ष होतां वाणी । सादरें सर्वेही ऐकती श्रवणीं । आणि बोलिले तेचि क्षणीं । श्रीचक्रपाणी कृपाळु. ॥ ४९ ॥ 'मी भृगुकुळीं जन्मतों साचार । सकळ हरीन धराभार । दुष्ट नासोनी स्वधर्म स्थिर । स्थापीन जाणा निर्धारें. ॥ ५० ॥ च्यवन भृगूचा नंदन । च्यवनपुत्र रेचक जाण । तया रेचकाचा जमदग्न । तो अवतरेल हररूपें. ॥ ५१ ॥ ममाज्ञेनें तेथ जन्मती । रेणुका तेची श्रीपा-र्वती । ते जमदग्नीची निश्चितीं । स्वधर्मपत्नी जाणिजे. ॥ ५२ ॥ तेथ त्याचियें गर्भधामीं । जन्म घेतों असे मी । मनुष्यकुक्षितगर्भी मी । नेघें जन्म निर्धारें.'

१. पाठभेदः—धर्मस्थापना साधुपाळणार्थीं । दोषियांतें दंडावया ॥. २. त्रासोनि, कंटाळोनि.

॥५३॥ ऐसी ऐकोनी दिव्य वाणी । जन्मती सुरवर तेक्षणीं । संतोषें गेले स्वस्थानीं । धरा निर्भय मनीं पैं झाली. ॥ ५४ ॥ जमदग्नी ब्राह्मण गोदातीरीं । जो अवतरला त्रिपुरारी । स्वधर्मपत्नी ते निर्धारीं । रेणुकादेवी भगवती. ॥ ५५ ॥ तिसी झाले चौंघे सुत । मग अवतरला भगवंत । म्हणोनियां सुरवर तेथ । सदा तिष्ठत सेवेसी. ॥ ५६ ॥ डोहाळे होती तियेसी जाण । क्षत्री मारावे म्हणोन । नित्यें पुराणश्रवण जागरण । तेव्हां जनार्दनधाम तें. ॥ ५७ ॥ जैसा स्फटिकीं लाविला दीप । आंत बाहेरी प्रभा अमूप । तैसें रेणुकेउदरीं रूप । आदिपुरुषाचें शोभतें. ॥ ५८ ॥ वैशाखशुद्धतृतीये दिवसीं । जन्म झाला भार्गवावतारासी । सूर्य आला मध्याह्नासी । भृगुपतीसी पहावया.' ॥ ५९ ॥ तेव्हां जातकर्म नामकर्म । ब्राह्मण करिती सज्ञान उत्तम । जमदग्नी रेणुका परम । पाहूनि पुत्र संतोषली. ॥ ६० ॥ भविष्य सांगती ऋषीश्वर । 'हा अवतरला शार्ङ्गधर । करील क्षत्रियांचा संहार । स्थापन करील धर्माचें. ॥ ६१ ॥ जातकनाम तेंची पैं राम । साधुब्राह्मणीं आराम । चालवील ब्रह्मचर्यनेम । चिरंजीवी चंद्रार्कवरी.' ॥ ६२ ॥ ऐसें होतां प्रौढदिवसीं । व्रतबंध केला रामासीं । वेदें जटाक्रमादी पर्येसीं । सांग सिकोनी पैं झालें. ॥ ६३ ॥ मातृपितृभक्त पूर्ण असे । नुलंघी आज्ञा अशेषें । जाणोनी भविष्य निःशेषें । स्वयें वर्ते श्रीहरी. ॥ ६४ ॥ पितृआज्ञेनें मातृहनन । करूनि तोषला जामदग्न्य । पुन्हा पितृवरें उठऊन । सावध केले माता, बंधु. ॥ ६५ ॥ तेव्हां क्रोध पापी म्हणून । जमदग्नी टाकी जैसा वमन । क्रोधें नाशले स्त्रियानंदन । जाणोनी पूर्ण ते काळीं. ॥ ६६ ॥ निक्रोधी जमदग्नी होतां । शांतरूपें असे वर्तता । तों इंद्र आला अवचितां । भेटीसी आश्रमा जाणोनी. ॥ ६७ ॥ तों दिसोन आलें इंद्रासी । अन्नसमृद्धी नसे आश्रमासी । मग जावोनी वसिष्ठापासीं । कामधेनु मागोनी दीधली. ॥६८॥ कामधेनु तृप्त करी अन्नें । योगक्षेम चाले तेणें । वेदशास्त्रें मुखोद्गत म्हणे । शस्त्रास्त्रविद्या सिकिजे. ॥ ६९ ॥ मातापितयांसी पुसुनी । राम निघाला तपा-

---

१. येथें 'हर्षती' असा पाठ योग्य होईल. २. या ओवीऐवजीं आमच्या जवळील हस्तलिखित पोथींत अशी ओवी आहे:–अखंड करी पुराणश्रवण । नित्य नेमें जागरण । जेवीं अभ्राआड सूर्य जाण । तैसे उदरीं श्रीपती. ॥ येथील ५७ व्या व ५८ व्या ओव्याप्रमाणेंच हुबेहुब वर्णन आस्तिकजन्मप्रसंगीं जरत्कारूच्या गरोदरपणाचें मुक्तेश्वरांनीं केलें आहे:–अभ्रें आच्छादिलें आदित्यबिंबा । परी बिंबीं प्रकटे शोभा । तैसी जठरांतून प्रभा । बाहेर फांके तयाची ॥ स्फटिकनिकेतनींचा दीपु । कीं पंपे आंतील अंगनावपु । कीं ब्रह्मक्रिया प्रकटे रूपु । आत्मनिष्ठाचे लक्षणें. ॥ (आदिपर्व, ९।८१–८२.). ३. पाठभेद:–स्फटिकनिकेतनीं दीप. ४. वेदमंत्र म्हणण्याचे जे निरनिराळे प्रघात आहेत, त्यांस जटा क्रम इत्यादि नांवें आहेत.

लागोनी । महेंद्रपर्वतस्वस्थासनीं । दारुण तप केलें पैं. ॥ ७० ॥ मग प्रसन्न होउनी त्रिनयन । म्हणे 'भार्गवरामा ! ऐक वचन । शस्त्रास्त्रविद्येकारण । कैलासा येईं मम संगें.' ॥ ७१ ॥ ऐसें बोलोनी भार्गवातें । नेला आपुलिया सदनातें । गणेशभार्गव दोघांतें । शस्त्रविद्या सिकवित. ॥ ७२ ॥ दोघेही विद्या सिकोनी । दक्ष झाले शस्त्रास्त्रसाधनीं । शिवप्रसादें वरदानीं । कामना पूर्ण पैं झाली. ॥ ७३ ॥ क्षत्रियांचेनीं निवारण । नव्हे, ऐसीं अस्त्रें दारुण । देवोनि तोषविला ते क्षण । भविष्य जाणोन सदाशिवें. ॥ ७४ ॥ आपुलें जें का धनुष्य बाण । कृपेनें देत हर भगवान । तों इकडे झालें महाविघ्न । आश्रमीं पूर्ण तें ऐकें. ॥ ७५ ॥ क्षत्रिय कृतवीर्यात्मज । माहूरीपुरीं महाराज । कामना धरूनि सहज । सिद्धलिंग आराधिलें. ॥ ७६ ॥ नित्य सहस्रकमळें पूजन । करी बहु-काळ सहस्रार्जुन । मग पाहावया तयाचें मन । देवें कमळ एक केलें कमी. ॥ ७७ ॥ एक कमळ न्यून होतां । पूजार्चनीं न बोले सर्वथा । तेव्हां हस्तकमल तत्वता । छेदूनि वाहिलें देवासी. ॥ ७८ ॥ तेव्हां प्रसन्न होउनी दयाळ । सिद्ध दत्तात्रेय तत्काळ । वर बोलिला ते वेळ । 'सहस्र कर तुज होऊत. ॥ ७९ ॥ आणि अजिंक्य तूं सर्वांतें । तुज न जिंकवेल निश्चितें । ब्राह्मणासी विरोध चित्तें । न करीं जाण सर्वथा. ॥ ८० ॥ जरी करिसी विरोधू । तरी त्यांहस्तें पावसी वधू.' । ऐसा नेम वदोनी वरदू । अदृश्य झाला ते काळीं. ॥ ८१ ॥ म्हणोनी सहस्र बाहु झाले । पृथ्वीतल सर्व जिंकिलें । अजिंक्य सर्वांसी बळें । नाटोपेची कवणासीं. ॥ ८२ ॥ जिंकीत जातां नर्मदातीरीं । तेथ पावला ते अवसरीं । त्या दिवसीं पर्वणी निर्धारी । पुण्य दिवस पैं राया ! ॥ ८३ ॥ तंव कुबेरअळकावतीस्थान । जिंकोनी आलासे रावण । नर्मदातीरीं स्नानाकारण । उतरूनि लिंगार्चन पैं करी. ॥ ८४ ॥ रावण पूजा करीत तीरासी । तों सह-स्रबाहो आला स्नानासी । जळीं उतरोनी जळक्रीडेसी । करितां अपूर्व पैं झालें. ॥ ८५ ॥ सहस्रकरांचा जैसा पर्वतू । तैसा वीरबाहो स्नान करितू । कीं तो जळरोधनासी सेतू । बांधीतसा पैं झालें. ॥ ८६ ॥ नर्मदाजळ रो-धोनी । दोनी थडी चालिलें भरूनी । तेव्हां रावण क्रोधें करोनी । बोलता झाला सेवकांसी. ॥ ८७ ॥ म्हणे 'जळ रोधिलें कवणें? । जळ भरोनी चालिलें तेणें । पूजाभंग करावया येणें । समर्थ कोण माजिये?' ॥ ८८ ॥ दूत धां-वोनी चौंकडोनी । पाहतां सहस्रबाहो नयनीं । स्नान करी तें पाहोनी । आश्चर्य करिती ते काळीं. ॥ ८९ ॥ म्हणे 'रे दशमुख रावण । वरी पूजेसी बैसला जाण । तुवां जळ रोधिलें म्हणून । पूजा भंग पावली असे. ॥ ९० ॥ तरी

रावण झाला क्रोधाद्भुत । म्हणे जळ रोधिलें कोणें किमर्थ? । तरी तूं जाई उठोनी त्वरित' । ऐकतां कोपत सहस्रबाहू. ॥ ९१ ॥ म्हणे 'मज स्नानासी रावण । 'न करीं' म्हणतो मूर्ख जाण । रावणमशका लेखी कोण? । आज्ञा मज पूर्ण त्याची नसे. ॥९२॥ तरी रावणासी सांगा सत्वर । येथूनि जावें हें निर्धार । न जातां शिक्षा सत्वर । पावसी म्हणोनी सांगिजे.' ॥ ९३ ॥ दूत रावणासी सांगत । 'सहस्रबाहो स्नान करीत । तुमची आज्ञा न मानीत । म्हणती निश्चितीं तुम्हीं जावें.' ॥ ९४ ॥ ऐकोनि कोपला रावण । म्हणे 'सन्नद्ध करा सैन्य । सहस्रबाहूसी धरून । लंकेंत ठेवूं बंदीसी.' ॥ ९५ ॥ वाद्यें वाजविलीं ते काळीं । संग्रामासी आला राक्षसमेळीं । सहस्रबाहोही ते काळीं । सिद्ध झाला युद्धासी. ॥ ९६ ॥ दाहा, धनुष्यें घेउनी हस्तीं । रावण बोले पुरुषार्थी । म्हणे 'सुरवर जिंकोनी निश्चिती । दास करुनी ठेविले. ॥ ९७ ॥ अरे! सहस्रबाहो! जाणें । मनुष्य तेंची माझें खाणें । तूं नेणसी मूर्खपणें । मजसीं रण माजविसी.' ॥ ९८ ॥ दाही धनुष्यांसी गुण । चढवूनि रावण सोडी बाण । पुष्पकविमानीं सकळ सैन्य । ताडिती सर्व सहस्रार्जुना. ॥ ९९ ॥ मग तो कृतवीर्यात्मज । पंचशत धनुष्यें करोनी सज्ज[1] । ह्मणे रे ! रावणा ! मूर्खा ! आज । धीर धरीं रणरंगीं. ॥ १०० ॥ तुवां सुरवर बंदीं घातले । तेव्हां जें रण माजविलें । तें येथें मजसीं न चले । तरी जाई वेहिलें[2] राक्षसा ! ॥ १०१ ॥ आजी तुझे रे! प्राण । कैसेनी वांचतील? जाण । आतां सांभाळीं आले बाण । घेतील प्राण पैं तुझे.' ॥ १०२ ॥ कृतवीर्यात्मजाची ऐसी वाणी । रावण क्षोभला दशगुणीं । रणासी मिसळले ऐकोनी । कृतांताऐसे दोघेही. ॥ १०३ ॥ काळाग्निजप जपोन बाण । सोडिता झाला सहस्रार्जुन । विमानासहित रावण । पाडिला तळीं प्रतापें. ॥ १०४ ॥ बाणेंकरूनि अर्जुनें जाण । छत्रें[3], मुकुट केले चूर्ण । मग क्रोधें आवेशें रावण । अर्जुनधनुष्यें विभंडिलीं. ॥ १०५ ॥ मग मिसळले मल्लयुद्धासी । तळवे कोंपर मस्तक चपेटांसी । मारितां नादावले पृथ्वीसी । पर्वतशिखरें थरथरती. ॥ १०६ ॥ रावण पाहे वीस भुजेंकरून । उचलावयासी सहस्रार्जुन । तेव्हां वीसही भुज आकर्षोन । दृढ उचलोनी घेतला. ॥ १०७ ॥ व्याघ्रें उचलिजे जैसा वस्त । तैसे रावणाचे आकळिले हस्त । बंधन करोनी नगरांत ।

१. सज्ज, तयार. सर्वसंग्रहपाठः—सन्निध. २. सत्वर. ३. रावणाला दहा शिरें असल्यामुळें त्याच्या छत्रांची व मुकुटांची संख्याही दहादहाच होती; म्हणून 'छत्रें' व 'मुकुट' हीं अनेकवचनी रूपें योजिलीं आहेत. एका हस्तलिखित पोथींत या ओवीऐवजीं अशी ओवी आहेः—सर्वेंचि सोडूनि सहस्र बाण । दहा छत्रें सूर्यवर्ण । छेदोनि दश मुकुट पूर्ण । करोनि चूर्ण टाकिले. ॥

जयजयकारें परतला. ॥ १०८ ॥ बंदीं घातला रावण । पायीं शृंखळा ठोकून । मग स्फुंदस्फुंदोन । आक्रोशें रडे दशमुख. ॥ १०९ ॥ ब्रह्मदेवासी मनीं चिंतित । वार्ता ऐकोन प्रधान प्रहस्त । शोक करूनि म्हणे 'लंकानाथ । क्रूरबंधनीं सांपडला.!' ॥ ११० ॥ प्रहस्तें येवोनी मंदोदरीतें । कथिलें रावणवृत्तांतातें । 'आतां बंदीमोचनउपायातें । विचार चित्तीं योजिजे.' ॥ १११ ॥ ते पतिव्रता मंदोदरी । विमानारूढ पौलस्तीघरीं[1] । येवोनि वंदिला त्या अवसरीं। म्हणे 'किमर्थ आलीस?' ॥ ११२ ॥ ऋषी म्हणे 'सांग मातें' । मंदोदरी म्हणे श्वशुरादींतें । 'रावण पडलासे बंदीतें । माहूरीस्थानीं अर्जुनाचे. ॥ ११३ ॥ तरी आपण जावोनि माहूरीं । रावण मुक्त करावा निर्धारीं । दान मागोनी घ्यावया तरी । तो देईल तुम्हांतें.' ॥ ११४ ॥ मग आश्वासोनि तिये सुंदरी । पौलस्ती गेलासे माहूरीं । सहस्त्रार्जुनें तया अवसरीं । उत्तमासनीं पूजिला. ॥ ११५ ॥ ऋषी बोले आशीर्वादवचन । राजा म्हणे 'अपेक्षीं मन.' । तो म्हणे 'रावणासी दान । करोनि मोचन मज दीजे. ॥ ११६ ॥ षण्मास शीणला बंदीसी । रावण मेत्पौत्र[2] परियेसीं.' । ऋषिवाक्यें रावणासी । आणोनि दिधला त्या वेळीं. ॥ ११७ ॥ पौलस्त्य म्हणे 'हो कल्याण' । संगें घेऊनियां रावण । रावण करूनि लंकेसि स्थापन । ऋषी स्वस्थाना पैं गेला. ॥ ११८ ॥ ऐसा तो सहस्त्रार्जुन । तेणें जिंकिलें सकळ भुवन । सोमवंशी, सूर्यवंशी नृपगण । करभार देती तयातें. ॥ ११९ ॥ जें जें अपूर्व पृथ्वीवरी । तें तें बळेंचि घेत दुराचारी । जिंकोनि घ्यावी अमरपुरी । ऐसा संकल्प पैं केला. ॥ १२० ॥ तें जाणवलें देवेंद्रातें । अर्जुन येतसे युद्धातें । चळ कंप सुटला सुरांतें । तव नारद तेथें पातला. ॥ १२१ ॥ नमस्कारोनि नारदासी । सकळ सुरीं पूजिला ऋषी । नारद म्हणे सुरेंद्रासी । 'चिंतिसी तें मी जाणतसें. ॥ १२२ ॥ सहस्त्रबाहू क्षत्रिय उन्मत्त । इंद्रपद घेऊं इच्छित । तरी सुरेंद्रा! चिंता मनांत । सर्वथा न करीं जाणपां. ॥ १२३ ॥ करावया क्षत्रियसंहार । अवतरलासे शार्ङ्गधर । तो मज ठावका विचार । असे साचार मी जाणें. ॥ १२४ ॥ मी तैया[3] सूत्र लावीन.' । निघालासे अभय देऊन । नारद आला माहूरीस्थान; । सुरेंद्रमन सुखरूप. ॥ १२५ ॥ वैशंपायन जन्मेजयासी । सादरें ऐक म्हणोनी कथेसी । पुढें नारदसूत्रनिरूपणासी । एकाग्रचित्तें ऐकिजे. ॥ १२६ ॥ श्री-

---

१. रावणाच्या बापाचें नांव 'पौलस्ती' नसून, 'पुलस्ति' किंवा 'पुलस्त्य' असें होतें. २. रावण हा पुलस्तीचा मुलगा होता, तेव्हां येथें 'मत्पुत्र' असा पाठ पाहिजे होता. पौत्र=नातू. ३. त्याजवळ संधान बांधीन.

गुरु प्रभु विश्वंभर । शुभानंदनामें किंकर । श्रोत्यांसी विनवी वारंवार । कथा सादर ऐकावया. ॥ १२७ ॥ इति श्रीमहाभारते । भीष्मपर्व व्यासविरचिते । ऐकतां प्रेमें एकचित्तें । तरती अनंत जीव पैं. ॥ १२८ ॥

---

## अध्याय एकतिसावा.[1]

सहस्त्रार्जुन सहपरिवारीं । महिकावतीराज्य करी । सुहृदपुत्रपौत्रीं । सहस्त्रावधी मंत्रीं नांदे. ॥ १ ॥ जन्मेजयासी वैशंपायन । म्हणे 'ऐकें सावधान । पृथ्वी सामर्थ्यें जिंकोन । असे सुखसंपन्न राजया! ॥ २ ॥ पारधी फिरोनी वनोपवनीं । मृगांकुर नाहीं झाला अवनीं । चिंता वर्तली राजयालागुनी । तंव तेथें नारद पातला. ॥ ३ ॥ हरिनाम मुखीं गात । ब्रह्मवीणा करीं वाजवीत । ब्रह्मानंदें येत नाचत । राय देखत दुरोनी. ॥ ४ ॥ राजा घाली लोटांगण । कनकासनीं मुनीचें पूजन । करोनि म्हणे 'मनोरथ पूर्ण । झाला स्वामी! तंव दर्शनें.' ॥ ५ ॥ नारद म्हणे 'तुज सार्वभौमातें । अटक काय? सांगिजे मातें । भुजबळें जिंकिलें रावणातें । आणि राजांतें पृथ्वीच्या. ॥ ६ ॥ सुरांसहित सुरेंद्र तूतें । भीतसे मनीं निश्चितें । ऐसिया तुज चिंता काय? ते । मांग मातें पुरवीन.' ॥ ७ ॥ राजा म्हणे 'सर्व कृपें पूर्ण । परी एक मास मांसभोजनावीण' । नारद म्हणे 'बहु मृगगण । जमदग्न्याश्रमालागीं असे. ॥ ८ ॥ मारोनि आणितां पैं तेथ । तुजला कोण अटक करित?' । तंव प्रधान म्हणती 'ऋषिवनांत । न जावें राया! सर्वथा; ॥ ९ ॥ कोपिष्ठ जमदग्नी ऋषी । शाप देईल निश्चयेंसी.' । तंव नारद म्हणे 'परियेसीं । जमदग्नें कोपा टाकिलें. ॥ १० ॥ कोप त्यागिला ऋषीनें । जाण राया'! नारद म्हणे । 'सुखें जाउनी मृगगणें । मारोनियां आणिजे.' ॥ ११ ॥ ऐकोनि नारदाचें वचन । सैनिकां बोले सहस्त्रार्जुन । 'सिद्ध करा रे! मृगयेकारण । जाणें असे पैं सत्वर. ॥ १२ ॥ जमदग्नीचे आश्रमापासीं' । म्हणे 'चाला' सैनिकांसी । आपण बैसोनी रथासी । मैत्रियां प्रधानांसीं समवेत. ॥ १३ ॥ चतुरंग सैन्येंसीं नृपनाथ । वाद्यगजरें निघाला त्वरित । पातला जमदग्न्याश्रमवनांत । मृग बहुत मारिले. ॥ १४ ॥ राव मृगगण वधूनी । बैसलासे विश्रांतस्थानीं । तंव सूर्य आलासे मध्यान्हीं । श्रमला वनीं म्हणोनी. ॥ १५ ॥ जमदग्नि ऋषी आश्रमांत । ऐकता झाला सर्व वृत्तांत । नृप आलासे मृगयेनिमित्त । तरी आश्रमा त्वरित

---

१. या अध्यायांतील सहस्त्रार्जुनाख्यान, जमदग्निवध, रेणुकानिधन आणि परशुरामानें क्षत्रियांचा एकवीस वेळां केलेला संहार हे भाग मूळांत नाहींत.

आणावा. ॥ १६ ॥ भोजन करोनी जाईल । कामधेनु प्रसाद पुरवील'। ऐसें बोलोनि त्या वेळ । आवंतू जाय रायातें. ॥१७॥ रेणुका म्हणे 'तो नृपती । आम्ही राहतों तापसवृत्ती । व्यंगता पडतां नास निश्चितीं । करील विरोध आमंत्रणीं. ॥ १८ ॥ आणि क्षत्रिय तो तामसी । विचार न करीच मानसीं । कामधेनू हरावयासी । कळी होईल आम्हातें.' ॥ १९ ॥ ऋषी म्हणे 'स्त्रियांची जाती । अविश्वासी नष्ट अल्पमती । कामधेनू असतां चित्तीं । दैन्य कल्पी मानसीं. ॥ २० ॥ रायासी कमी काय म्हणोनी । कामधेनु नेईल हिरोनी ?' । ऐसें स्त्रियेसी म्हणोनी । रायासी आवंतू चालिला. ॥ २१ ॥ रेणुका म्हणे 'होणार गती । तैसेंचि होईल निश्चितीं । त्यासारिखी सुचे युक्ती । आपुलिये सुमती-कारणें.' ॥ २२ ॥ असो ऋषी गेला त्वरित । रायापासीं म्हणे 'क्षुधित । श्रमलासी वनीं बहुत । म्हणूनि आवंतू पातलों.' ॥ २३ ॥ नमस्कारोनि नृपनाथें । 'तुम्ही कोण? कोठील येथें? । नाम कोण? स्वामी! मातें । सांगिजे मज आवडीं.' ॥ २४ ॥ जमदग्नी म्हणे 'मी रेचकसुत । भृगूचा होय वंशजात । रेणुरायाचा जामात । माझें नाम तें ऐकें.' ॥ २५ ॥ ऋषी म्हणे 'मी जमदग्नी । राहतों कुटुंबें या वनीं । तूतें क्षेम कल्याण इच्छोनी । आश्रमस्थानीं महाराजा!' ॥ २६ ॥ मग राजा म्हणे ऋषीतें । 'तुम्ही तापसवृत्ती राहतां येथें । आमचा समुदाय बहु निश्चितें । अन्न पुरतें करिसी कसें?' ॥ २७ ॥ जमदग्नी म्हणे 'नृपनाथा! । काय करिसी अन्नचिंता? । ईश्वर समर्थ अन्न पुरविता । जाण समस्तां नृपवर्या!' ॥ २८ ॥ मग 'अवश्य' म्हणोनी नृपनाथ । म्हणे 'न कळे ऋषीचें सामर्थ्य' । आनंदोनी आश्रमांत । येत जमदग्नी आपुल्या. ॥ २९ ॥ रायें सकळांसी केली आज्ञा । सर्व सैन्यासी पैं स्नाना । आपणें प्रवेश केला जीवना । गंगोदकीं क्रीडेसी. ॥ ३० ॥ इकडे जमदग्नी आश्रमांत । स्थळ विस्तीर्ण करीत । मंडप उभारोनी स्नान करीत । कामधेनू पूजीत आवडीं. ॥ ३१ ॥ म्हणे 'माते! नृपनाथा । भोजना पाचारिलें समस्ता । तरी सर्व सामग्रीसिद्धता । करिजे आतां निर्मोनी.' ॥ ३२ ॥ तों इकडे राजाज्ञेनें दूत । येउनी पाहती आश्रमांत । तंव तेथें अग्नीही प्रदीप्त । न दिसे कांहीं आइतें. ॥ ३३ ॥ मग ऋषींसी पुसती सेवक । तो म्हणे 'पाचारा नृपनायक' । दूत जाऊनि म्हणती देख । 'आयती कांहींच दिसेना. ॥ ३४ ॥ परी ऋषीनें आज्ञा केली । यावें म्हणोनियां सकळीं । घरीं एक स्त्री, चौघे पुत्र मेळीं । पाहातां दुजा कोणी नसे. ॥ ३५ ॥ कोठें नेणों पाकस्थान । पुसिलिया म्हणे सिद्ध

---

१. आमंत्रण देण्याला. २. तयार, सिद्ध. ३. सामग्री, तयारी.

संपूर्ण'. । राजा आश्चर्य करी ऐकोन । 'ऋषिमहिमान न कळे म्हणे.' ॥ ३६ ॥ मग राजा सहपरिवारीं । आला असे आश्रमाभीतरी । मुनी धेनूची प्रार्थना करी । पूजोनी षोडशोपचारीं तेधवां. ॥ ३७ ॥ गूढस्थानीं तिये धेनूसी । पूजोनि विनवितां तैसीं । प्रसादताटें षड्रसीं । निघालीं जाणा सुंदर. ॥ ३८ ॥ आसनें उंच नीच समस्तां । झालीं निर्माणें अवचितां । सर्व सुवर्णपात्रें समस्तां । धेनुप्रसादें पैं झालीं. ॥ ३९ ॥ चतुर्विध अन्नें स्वादकर । अमृताहूनि गोड अपार । षड्रसें निर्मीत क्षीर । जें जें इच्छित तें होय. ॥ ४० ॥ मग मुनी बाहेरी येउनी । रायासि बैसविला आसनीं । अधिकारें समस्तांलागोनी । बैसवीलें आसनीं तैं. ॥ ४१ ॥ ब्रह्मार्पणें संकल्प सोडुन । ऋषी म्हणे 'स्वस्थ कीजे भोजन' । तेव्हां घेती आपोशन । जेविती परमान्न स्वइच्छें. ॥ ४२ ॥ कनकताटीं सद्यस्तप्त । जें जेवणार इच्छित । तें तें तेथेंची प्रसवत । गोडी अत्यंत जाण राया! ॥ ४३ ॥ तें देखोनी सहस्रार्जुन । म्हणे 'हें आश्चर्य पूर्ण । मग मनीं विचारून । मम गृहीं पूर्ण ऐसें नसे. ॥ ४४ ॥ आह्मीं म्हणों ब्राह्मण दीन । सुवर्णताटें आणिलीं कोठून? । अकस्मात झालीं उत्पन्न । आश्चर्य मज वाटे! ॥४५॥ भोजनीं पदार्थ विशेष । गोडी अधिक बहुवस' । राजा म्हणे वरी 'ऋषीस । भोजनोत्तर पैं पुसों.' ॥ ४६ ॥ करितां राजा भोजन । म्हणे आज-ऐसें अन्न । भक्षिलें नाहीं मिष्टान्न । स्वादिष्ट परम अद्भुत. ॥ ४७ ॥ जेविती प्रीतीं क्षुधातुर । आर्तें[१]करूनी रुचिकर. । तेथ मागणारापूर्वी सत्वर । पदार्थ उत्पन्न पैं होती. ॥ ४८ ॥ जे कामधेनूपासूनि उत्पत्ती । पदार्थ अमृतातें हेळवीती। सकलां भोजनीं झाली तृप्ती । हस्त प्रक्षाळिती सत्वर. ॥ ४९ ॥ पुढतीं ताटें गणोनी घेतलीं । तीं क्षणेंची अदृश्य झालीं । गंधाक्षत विडे भरोनी आलीं । तींही अर्पिलीं समस्तांसी. ॥ ५० ॥ मग रेणुकासहित भोजन । करोनि उठिला जमदग्न । रायापासीं येऊनि जाण । बैसला जाणोन ते क्षणीं. ॥ ५१ ॥ मग राजा म्हणे ऋषीप्रती । 'सत्य सांगावें जी मजप्रती' । बैसवोनियां समीपगती । परमप्रीतीं बोलत. ॥ ५२ ॥ समीप बैसोनियां राजा । परमप्रीतीं पुसे द्विजा । म्हणे 'संशय मनीं माझ्या । झाला ऋषिवर्या! असे पैं. ॥ ५३ ॥ पाककर्ता न दिसे कोण । क्षणांत होय स्वादिष्ट अन्न । अनेक सुवर्णताटें उत्पन्न । कैसीं झालीं? सांग पैं. ॥ ५४ ॥ तुम्ही दिसतां ब्राह्मण । मजला नयनीं द्रव्यहीन । आणि मद्गृहीं नसे तें पूर्ण । तव गृहीं जाण अमोलिक.' ॥ ५५ ॥ तेव्हां ऋषी म्हणे 'यथार्थ । बोलतां घ-

---

१. मोठ्या आवडीनें.

ङती अपाय बहुत । परी सत्य न सोडीं मी निश्चित । राजया! जाण पैं आतां. ॥ ५६ ॥ मेरुपार्श्वी वसिष्ठाप्रती । असे कामधेनू निश्चिती । ते इंद्रें मागोनी मजप्रती । दिधली योगक्षेमार्थ. ॥ ५७ ॥ तीचेनीं प्रसवलीं अमोल्य ताटें । अन्नें स्वादकरें मिष्टें.' । तेव्हां राजा बोले शेवटें । 'मम गृहीं धेनु ऐशी नसे; ॥ ५८ ॥ तरी ते धेनू द्यावी मजप्रती । ईच्या पालटें तुम्हाप्रती । कोटीवरी देवों निश्चिती । साळंकृत धेनुवा. ॥ ५९ ॥ मी सार्वभौम राजा असें । परी ऐशी गाय मजकडे नसे' । तेव्हां जमदग्नी म्हणतसे । 'वसिष्ठधेनु न देववे. ॥ ६० ॥ तुम्हांस्तव म्यां मागोनी । आणिली होती येक्षणीं । तरी तुम्हीं वसिष्ठ प्रार्थोनी । घ्यावी, जाण महाराया!' ॥ ६१ ॥ राजा म्हणे 'मी क्षितिपती । कोण मागेल वसिष्ठाप्रती? । तो याचक, मी भूपती । तरी तुम्हीं मजप्रती देइजे.' ॥ ६२ ॥ जमदग्नी म्हणे 'माझेन । ते न देववे सत्य जाण' । राजा कोपला ऐकोन । म्हणे 'नेईन बळेंची.' ॥ ६३ ॥ दूतांसी म्हणे धराधीश । 'आणा येथें रे! धेनुवेस । मज नेलिया विशेष । पाहूं कोण वारिता?' ॥ ६४ ॥ 'धेनु आणा रे! बांधोन' । म्हणतां धांवले सेवकजन । करिती दुष्ट बंधन । तेव्हां ती मनीं उमजली. ॥ ६५ ॥ बाहेर आणितां ते क्षणीं । धेनु म्हणे आपुले मनीं । 'बळें नेती मजलागोनी' । म्हणूनि शृंगें ताडिलें. ॥ ६६ ॥ दूत ताडिती दंडेंकरून । धेनु बोभाये आक्रोशून । कोटिसंख्या धनुर्धरांकारण । आकळितां ते नाकळे. ॥ ६७ ॥ येउनी पुसे ऋषीतें । 'वसिष्ठाश्रमासी मी जातें' । जमदग्नी, रेणुका धेनूतें । जाईं म्हणती स्वाश्रमा. ॥ ६८ ॥ धेनूसी सर्वही धरिती । दूत हाकीत मारिती । हुंबरतां धेनू ते क्षिती । क्रूर म्लेंच्छ जन्मले. ॥ ६९ ॥ तिहीं शस्त्रास्त्र घेउनी करीं । राजदूत ताडिले ते [illegible] । [illegible] म-हाक्षत्री । बाणीं [illegible] ॥ ७० ॥ धेनु आंग झाडी झडझडां । तंव [illegible] भडभडां । राजसैन्य धडधडां । जळोन भस्म पैं झालें. ॥७१॥ पराभवोनी सैन्यातें । धेनु गेली स्वर्गपंथें । कोप आला वीरबाहूतें । पाहोनियां अत्यद्भुत. ॥ ७२ ॥ म्हणे 'ऋषीनें कुमती करोनी । धेनु धाडिली स्वर्गस्थानीं । सकळ सैन्यही जाळोनी । टाकिलें क्षण न लगतां.' ॥ ७३ ॥ म्हणे 'या ऋषीनेंचि घात । सकळ सैन्याचा केला निःपात' । क्रोधें खड्गासी घालोनि हात । धांवला निश्चित ऋषीवरी. ॥ ७४ ॥ प्रधान सांवरिती नृपातें । परी तो नाटोपेची तयांतें । जमदग्नीसी खड्गहस्तें । ताडी तेव्हां नृपनाथ. ॥ ७५ ॥ मुळींच क्षत्रिय उन्मत्त । त्यावरी क्रोधें झाला व्याप्त । तेणें ऋषीचा करितां घात ।

१. सर्वसंग्रहपाठः—कडकडां. २. मूळचाच, आधींच.

रेणुका कांपत थरथरां. ॥ ७६ ॥ जाऊनि भर्त्याच्या आंगावरी । घाय चुकवावया निर्धारीं । तिजवरीही मारिले क्रूरीं । एकवीस घाय ते क्षणीं. ॥ ७७ ॥ क्रोधें केला वधूवरांचा घात । क्रोधें तपस्वी झाले पुण्यहत । स्नान केलिया क्रोध स्पर्शत । तरी पुनः स्नान वेद [1]बोले. ॥ ७८ ॥ ऐसें या दोघांतें मारुनी । राजा गेलासे स्वस्थानीं । रेणुका कांहीं स्मृती येउनी । बोभातसे रामातें. ॥ ७९ ॥ देह झाला शतचूर्ण । रेणुकेतें राहिलासे प्राण । 'धांव धांव रामा'! म्हणून । स्मरण करीत पुत्राचें. ॥ ८० ॥ जमदग्निपुत्र चौघेजण । त्यांसीं वधी सेवकजन । एक कनिष्ठ राम तो जाण । शिवभुवनातें राहिला. ॥ ८१ ॥ तयासी बोभाये रेणुका । म्हणे 'रामा! झडकरीं ये का । रायें वधिलेंसे सकळिकां । अजूनि बाळका न येसी तूं!' ॥ ८२ ॥ तों शब्द रामश्रवणीं । कैलासीं ऐकिला तो ध्वनी । तेव्हां सदाशिवासी विनवोनी । निरोप मागे भार्गव. ॥८३॥ म्हणे 'माता बोभाय मातें । सत्वर गेलें पाहिजे तेथें' । सदाशिव उमजोनी चित्तें । मग वरदवाणी बोलिला. ॥ ८४ ॥ आणि आपुलें जें का चाप । बाण दिधले पैं अमूप । ज्यांचीनी निवारणा भूप-। क्षत्रियां सहसा न होय. ॥८५॥ मंत्रोक्त जीं कां अस्त्रें । शिव आपुलेनि सांगे वक्त्रें । अक्षय भाता देउनी त्रिनेत्रें । गौरविला श्रीभार्गव. ॥ ८६ ॥ शिव भार्गवासी म्हणत । 'निःक्षत्रिय मही निश्चित । करूनि विजयी होशी सत्य । जाई सत्वर पैं वेगें.' ॥ ८७ ॥ घेऊनि शिवाची पैं आज्ञा । भार्गव आलासे सदना । तों देखिलीं असीं नयना । प्रेतें बंधुमातापित्यांचीं. ॥ ८८ ॥ रेणुका देखोन रामातें । शोक केला तिणें तेथें । रामें नमस्कारोनी माते । म्हणे 'कवणें तुम्हांतें वधिलेंसे?' ॥ ८९ ॥ भार्गवासी त्या वेळ । माता निवेदी सकळ । 'अरे! बाळा! तो काळ । वीरबाहू तो माझा. ॥ ९० ॥ त्याणेंचि वधिलें तुझिया पित्या । तो दुष्ट करुनी आमुच्या घाता । गेलासे पुत्रा! जाण तत्वता । माझेनि कांहीं न बोलवे.' ॥ ९१ ॥ राम म्हणे 'हो! माते! आतां । वीरबाहूच्या करीन घाता । तरी पुत्र तुझा तत्वता । जाण सत्य मम अंबे! ॥ ९२ ॥ जितुके घाय मारिले तूतें । तितुके वेळ क्षत्रिय पृथ्वीतें !। संहारीन निश्चयें माते!। तुझी आण नातरी.॥९३॥ आतां ऐकें एक वचन । तुजकारणें उपाय करीन । अश्विनीदेवां बोलावुन ।

---

१. आमच्या जवळील हस्तलिखित पोथींत क्रोधदोषांवर तीन ओव्या आहेत, त्या अशाः—क्रोध तोचि अपस्मार । क्रोध तोचि भूतसंचार । क्रोधें होय अविचार । क्रोधें पतन प्राणियां ॥ काम क्रोध जिंकिजे सत्वरीं । पार्थालागीं बोलिला हरी । जो काम क्रोधातें आवरी । तो भवसागरीं तरेल. ॥ क्रोध नाशी पुण्यसाधन । शरीरीं चांडाळ क्रोध पूर्ण । स्नानानंतरें क्रोध होय स्पर्शन । पुनःस्नान वेद बोले. ॥

वांचवीन तुज अंबे!' ॥ ९४ ॥ रेणुका म्हणे 'भर्त्याविणें । आतां कासया म्यां वांचणें? । तरी पित्याचा सूड तुवां घेणें । तर्पण करणें शोणितें पैं.' ॥ ९५ ॥ ऐसें बोलोनी ते क्षणीं । प्राण त्यागी रामजननी । पुत्रें शोक केला त्या स्थानीं । अतिदुस्तर अनिवार जो. ॥ ९६ ॥ ऐकोनि भार्गवाचा शोकध्वनी । महाऋषी आले धांवोनी । कश्यपादिक मुनी ते क्षणीं । अध्यात्मबोधें बुजाविती. ॥ ९७ ॥ म्हणती 'रामा! तूं आत्माराम । असती अव्यय पुरुषोत्तम । तूं निर्विकार पूर्णब्रह्म । अवतरलासी महीवरी. ॥ ९८ ॥ करावया क्षत्रियसंहार । पितरां निमित्त साचार । तेथ मारिता, मरता अधिकार । सर्व तुझा पैं असे. ॥ ९९ ॥ ऐसें असतां किमर्थ । शोक करिसी पैं अद्भुत?' । यापरी रेणुकासुत । बुजाविला ऋषींनीं. ॥ १०० ॥ मग ते मातापित्यांचीं प्रेतें । आणी चौघेही बंधूंचीं तेथें । दहन करोनी क्रियाकर्मातें । कश्यपऋषिमतें संपादिलें. ॥ १०१ ॥ शुद्ध स्नान केलिया दिनीं । धनुष्यबाण घेउनी । अक्षय भाता पृष्ठीस्थानीं । लावुनी चाले माहूरीं. ॥ १०२ ॥ पातला महिकावती भुवनीं । नगरप्रदेशीं धनुष्य चढवुनी । क्रोधें उसळों पाहे वन्ही । नयन आरक्त पैं झाले. ॥ १०३ ॥ शिंजिनी[1] चढवितां शिवचापातें । नाद दुमदुमीत त्रैलोक्यातें । टाळीं बैसलीं दिग्गजकर्णातें । कूर्म पृष्ठीतें सरसावीत. ॥ १०४ ॥ तेणें स्त्रियांचे गर्भपात । ध्वनी ऐकतां झाले बहुत । नगरीं जन भयाभीत । होउनी पाहती चहूंकडे. ॥ १०५ ॥ धनुष्यठणत्काराचा ध्वनी । पडला सहस्रार्जुनाचे कानीं । म्हणे 'द्विभाग आतळी धरणी । कीं प्रळय' मनीं 'झाला' म्हणे. ॥ १०६ ॥ दूत पाहती काय अद्भुत । तों द्वारप्रदेशीं ब्राह्मणसुत । एकला असे, नयन आरक्त । करोनी बोलत राजदूतां. ॥ १०७ ॥ 'काय पाहतां रे! येथ' । तों त्यासी दूत पुसत । म्हणती 'तूं कवणाचा सुत? । आलासी येथ कोण कार्या? ॥ १०८ ॥ धनुष्यासी गुण चढवून । वरी जोडूनियां बाण । ओढी ओढुनी आकर्ण । कवणासीं रण करूं पाहसी? ॥ १०९ ॥ ठाण मांडिलेंसे अचळ । दणकेनें हालविला भूगोळ । वाटे ओतला क्रोधानळ । कोणासि जाळूं पाहसी?' ॥ ११० ॥ भार्गव म्हणे "'मी कोण' । हें तुम्हांसी न कळे आजून । तरी त्या सहस्रार्जुनाचा प्राणहर्ता मी पूर्ण जाणतसां. ॥ १११ ॥ अरे! जमदग्नीचा मी सुत । रेणुका माझी माता सत्य । मद्बंधूंसहित तयांचा घात । किमर्थ केला रे! निरपराधें? ॥ ११२ ॥ तयाचा सूड घ्यावया मी येथ । राम आलों म्हणोनी त्वरित ।

---

१. दोरी.

सहस्रार्जुन दुष्टासि श्रुत । करा जाउनी ये क्षणीं. ॥ ११३ ॥ सिद्ध होउनी सहसैन्यीं । युद्धासि पाचारा जाउनी । न सांगतां येच क्षणीं । संहारीन समस्तां." ॥ ११४ ॥ ऐकोनि तयाची वाणी । दूत धांवती रायालागोनी । श्रुत करिती तयाचे श्रवणीं । भार्गवाचे पैं शब्द. ॥ ११५ ॥ राजा म्हणे 'पुरुषार्थें । काय सांगतां रे! येथें? । धरोनी आणा रे! कुमारातें । कैसा असे? पाहूं पैं. ॥ ११६ ॥ कायसा त्याचा पुरुषार्थ । मजपुढें वानितां अद्भुत? । म्यां रणीं जिंकोनी लंकानाथ । बंदीं षण्मास घातला. ॥ ११७ ॥ असतां ब्राह्मणाचें पोर । काय तयाचा बडिवार? । म्यां जिंकिले महावीर । क्षत्रियकुमर पराक्रमी.' ॥ ११८ ॥ ऐसें बोलोनी तेक्षणीं । प्रधाना आज्ञापिली वाणी । 'धरोनी आणा किंवा मारोनी । तेथेंचि टाका अविलंबें.' ॥ ११९ ॥ आज्ञा होतां सेनापती । सिद्ध होउनी चालती । शस्त्रास्त्रें सिद्ध रणपंथीं । चालिलें सैन्य चतुरंग. ॥ १२० ॥ येउनी वेढिती रामातें । चौकोनीं[1] टाकिती शस्त्रांतें । लक्षोनियां भार्गवातें । हाणिती वीर एकदां. ॥ १२१ ॥ अनेक शस्त्रास्त्रें प्रेरिती । धनुर्धर वर्में भेदिती । एक ब्राह्मणकुमर म्हणती । धरुनी नेऊं नगरांत. ॥ १२२ ॥ एक म्हणती घायासरिसा । ब्राह्मणकुमर वांचेल कैसा । तेव्हां रामें धनुष्यें भूसा- । तैसें[2] पराभविलें शस्त्रें पैं. ॥ १२३ ॥ सैन्यें म्हणती 'ब्राह्मणसुत । मेला असेल निश्चित' । सावध पाहतां निश्चित । एकही शस्त्र न लगे त्या. ॥ १२४ ॥ तेव्हां रामें धनुष्यगुणीं । कुराडें सोडिलें जोडुनी । तें जाउनी पडतां सैन्यीं । क्षणें संहारोनी टाकिलें. ॥ १२५ ॥ शर सुटले अति तांतडी । सेना मारिली लक्ष-क्रोडी । सेनापतीची मुरकुंडी । यमनगरीं धाडिली. ॥ १२६ ॥ घायाळ गेले नृपाप्रती । म्हणती 'पडला सेनापती' । कोपें कोपलासे भूपती । देखोनि घायाळ ते क्षणीं. ॥ १२७ ॥ म्हणे 'सिद्ध करा रे! सकळ सैन्य' । म्हणतां सेनापती सिद्ध होऊन । वाद्यगजरें राजा आपण । रथारूढ पैं झाला. ॥ १२८ ॥ चतुरंग दळ अपरिमित । चालिले नग्न शस्त्रें झेलित । अश्वारूढ गजारूढ गणित । कोण करीत महारथियां. ॥ १२९ ॥ बोवरझोटी[3] शस्त्रपाणी । मदोन्मत्त काळासही न गणी । धनुर्धर शर लावुनी गुणीं । पातले रणीं महाशूर. ॥ १३० ॥ पांचशत धनुष्यें सहस्र करीं । गुण चढवुनी बाण लाविले वरी । सहस्रार्जुन रथावरी । क्रोधें थरथरी महाकोपें. ॥ १३१ ॥ ऐसे पातले भार्गव जेथ । वेढिला पायदळ प्रथम होत । वेढा त्यामागें अश्वगजरथ । अनेक फेरीं

---

१. चारी दिशांनीं (?). कदाचित् येथें झोंकोनी असा मूळपाठ असावा. २. भूसातैसें=भुसाप्रमाणें, फोलासारखें. भूस=तूस, कोंडा, धान्याचें फोल. ३. भयंकर व मोकळे आहेत केश ज्यांचे असे.

वेढिला. ॥ १३२ ॥ ऐसे अनंतफेरीं भृगुपती । महाशूर शस्त्रें मोकळिती । मेघधारा जैशा पतन होती । तैसे भासती आकाशीं. ॥ १३३ ॥ तो एकला ते बहुत । परम झाला चिंताक्रांत । तेव्हां स्मरिला गणनाथ । संकटनाशन गुरुबंधु. ॥ १३४ ॥ गणेशनामें स्मरिलीं बारा । तेव्हां जाणवलें विघ्नहरा । संकट मांडलें भार्गववरा । म्हणोनी सत्वर धावला. ॥ १३५ ॥ परशु दिधला रामाकरीं । म्हणे 'घालीं हा सैन्यावरी । याउपरी तूतें निर्धारीं । 'परशुधर' ऐसें म्हणतील.' ॥ १३६ ॥ परशु देऊनियां गुप्त । अदृश्य झाला गणनाथ । मग परशु टाकी सैन्यांत । धगधगीत सूर्याऐसा. ॥ १३७ ॥ परशु सुटला अनावर । जेवीं श्रीकृष्णकरींचें चक्र । तेणें पराभविला परिवार । राजा वीरबाहूचा. ॥ १३८ ॥ रथ मोडोनि केले चूर । अश्वांचा झालासे संहार । गज कोसळती जेवीं गिरिवर । पदातिभार विभांडिला. ॥ १३९ ॥ परशु नव्हे तो झंझामारुत , सेनाभ्रें गेलें दशदिशांत । वरी वीरबाहू सूर्य तेथ । राहुवदनीं पडियेला. ॥ १४० ॥ परशु आला अर्जुनाप्रती । भुजा तोडोनि टाकिल्या क्षितीं । शाखारहित वृक्ष निर्गुतीं । दंडप्राय बीभत्स दिसे. ॥ १४१ ॥ सर्वेंचि सोडिला शिवदत्त बाण । न्यासपूर्वक अभिमंत्रोन । वीरबाहूचे झांकले नयन । कंठ छेदून टाकिला असे. ॥ १४२ ॥ दोनी भुजांसहित शिर । छेदून पाडिलें पृथ्वीवर । धड लंवडलें जैसें शिखर । पडतां भूमी गाजली. ॥ १४३ ॥ तेव्हां विमानीं सुरगण । आनंदें दुंदुभी वाजवून । जयजयकारें पुष्पवृष्टी करून। भार्गवराम पूजिला. ॥ १४४ ॥ मग भार्गवें पुत्रपौत्र । वीरबाहूचे वधिले सर्वत्र । त्याहूनि क्षत्रिय अन्यत्र । तेही रामें वधियेले. ॥ १४५ ॥ तेथोनि देशोदेशीं सकळ । संहारिलें क्षत्रियकुळ । ब्राह्मणांसी पूजोनी ते वेळ । पृथ्वी दान सर्व केली. ॥ १४६ ॥ तर्पण केलें पितरांचें । ब्रह्मास्त्रें गर्भ पुत्रांचे । संहारोनी क्षत्रियांचे । त्यांत वेगळे तिघेजण. ॥ १४७ ॥ जनक, दशरथ, रावण, । हे वेगळे करूनियां जाण । क्षत्रियकुळ संहारून। पाताळा गेला परशुधर. ॥ १४८ ॥ पाताळीं अनेक दैत्य । वधी तेव्हां रेणुकासुत । भिन्न करोनी बळी तेथ । आणि नागेंद्र दोघेही. ॥ १४९ ॥ यापरी पृथ्वी भारातीत । करोनी भार्गवराम जात । महेंद्रपर्वतीं डुल्लत । समाधिसुखें राजया! ॥ १५० ॥ ऐसें होतां कांहीं काळ । राजस्त्रिया उरल्या ते वेळ । द्विजांसीं भोगितां क्षत्रियकुळ । पुन्हा वृद्धीसी पावलें. ॥ १५१ ॥ ते ब्रह्मक्षत्रिय ब्रह्मवीर्यें जाण । होतां झाले

---

१. पाठभेदः—अश्व, गज, वीर पायींचे. । २. सर्वसंग्रहाचा पाठः—सैन्य पाडिलें दशदिशांत. ३. निभ्रांत, खरोखर. ४. शेष व वासुकी हे दोन नागांचे राजे.

उन्मत्त पूर्ण । तेणें ब्राह्मणपृथ्वी हिरोन । बळें भोगिती दुरात्मे. ॥ १५२ ॥ ब्राह्मणसाधूंची हेळणा । करिती अविचारी ते क्षणा । ब्राह्मण होउनी तेजहीना । भृगुकुळराणा स्मरती मग. ॥ १५३ ॥ तेव्हां समाधी मोडुनी । क्षत्रिय संहारी मागुतेनी । याप्रकारें त्रैयसप्तवेळा धरणी । निःक्षत्र करुनी द्विजां अर्पित. ॥ १५४ ॥ शस्त्रास्त्रविद्या द्विजांसी । भार्गवराम सिकवी तयांसी । परी नयेची शस्त्रविद्या त्यांसी । ऐसी क्षत्रियांसी न सिकवी. ॥ १५५ ॥ मेग आपणासी बैसावया स्थान । समुद्रीं मारोनियां तीव्र बाण । तेथें सप्त देश केले उत्पन्न । कोंकणादिक जाण राया! ॥ १५६ ॥ केराळ, तुंलिंग, गोराष्ट्र, । कोंकण, कन्हाटक, कलाट, । बर्बरनामें देश उद्भट । भीमाशंकरापासोनी. ॥ १५७ ॥ ऐसें करितां भूमी भारातीत । तेव्हां द्वापार झालें प्राप्त । मग सोमवंशीं राजा विख्यात । शंतनू झाला तेधवां. ॥ १५८ ॥ त्याणें वरिलें गंगेतें । ती प्रसवली अष्टवसूंतें । त्यांत एक भीष्म हा निश्चितें । येर सप्तही स्वजळें मुक्त केले. ॥ १५९ ॥ त्या भीष्मासी गंगेनें । भार्गवाहातीं विद्येकारणें । देउनी मग तो शांतनव तेणें । आणोनी दिला भीष्मासी. ॥ १६० ॥ तेव्हां भार्गवरामें शिवदत्त विद्या । संपूर्ण सिकविली म्हणूनियां । तया गुरूसी भीष्में पूजोनियां । सिद्ध झाला रणासी जाण पैं. ॥ १६१ ॥ आणि भार्गवें बहुत बाण । शिवदत्त जें कां सायकासन । दीधलेंसें तेंची घेऊन । युद्धासि भीष्म गेला रणीं. ॥ १६२ ॥ तुवां पुसिली भार्गवोत्पत्ती । म्हणोनि कथिली असे कीर्ती । जे षष्ठ अवतार धरोन क्षिती । भारातीत केली असे. ॥ १६३ ॥ सप्तम अवतारीं रामचंद्र । अवतरोनी मारिला राक्षसेंद्र । रावण, कुंभकर्णादिक क्रूर । निवटिले जाण रघुवीरें. ॥१६४॥ तया अवताराची पदवी । वाला झाला वाल्मीकि कवी । जयानें अवताराचे पूर्वीं । शतकोटिग्रंथें केलें भविष्य. ॥१६५॥ तया रामावतारीं दुष्ट निशाचर । मारोनी उतरिला असे भूभार । तेची क्षत्रयोनि तामसी क्रूर । उत्पन्न झाले द्वापारीं. ॥ १६६ ॥ तयांचा भार पृथ्वीवरी । झाला म्हणोनी कंसारी ॥ पूर्णब्रह्म अवतरला हरी । यादवेंद्र श्रीकृष्ण. ॥ १६७ ॥ आणि नरावतारसहित । जन्मलासे हा भगवंत । नरनारायण पैं निश्चित । श्रीकृष्णार्जुन दोघेही. ॥ १६८ ॥ तोची पांडवांसी सोकारी । होउनी भूमीचा भार हरी । जन्मेजयासी म्हणे पुढारीं । कथार्थ सादर परिसिजे.

---

१. एकवीस वेळां. २. या ओवीऐवजीं एका हस्तलिखित पोथींत अशी ओवी आहे:—समुद्रामाजीं सोडोनि बाण । सप्त देश सोडविले पूर्ण । तेथ स्थापिलें कोंकण । ब्राह्मणांतेंही ऐक राजया! ॥ ३. सर्वसंग्रहपाठः—तुलंग. ४. पाठभेदः—कोंकण, कन्हाड, वराट ।. ५. सायकारी, पाठिंबा.

॥ १६९ ॥ श्रीगुरु प्रभु विश्वंभर । शुभानंद विनवी जोडुनी कर । श्रोत्यांसी म्हणे वारंवार । निरंतर ऐका म्हणे. ॥ १७० ॥ इति श्रीमन्महाभारते । श्रीगुरुव्यासविरचिते । भीष्मपर्व रसाळ श्रोते । ऐकतां जन उद्धरती. ॥ १७१ ॥

---

## अध्याय बत्तिसावा.

संजय म्हणे प्रज्ञाचक्षुसी । नैवम दिवसीं रणभूमीसी । काय काय रण कवणासी । कैसें झालें? परियेसीं तें. ॥ १ ॥ तेंची कथीन म्हणे जन्मेजया । वैशंपायन तया ठाया । कौरवसैन्यासी सूर्योदया । भीष्माचार्यासमवेत. ॥ २ ॥ तेव्हां पांडव सिद्ध होऊन । आले असती गजरेंकरून । आपुल्यालीं स्थळें धरोन । रणांगणीं उभे असती. ॥ ३ ॥ त्या दिवसीं श्रीकृष्णातें । बोलिलें पैं असें पार्थें । 'सत्वर लोटीं स्यंदनातें । मारीन भीष्मातें म्हणोनी.' ॥ ४ ॥ तेव्हां कठिण जाणोन । आंगीं कवच घालोन । म्हणे अर्जुनासी 'होतां निर्वाण । सकळ संहारीन' म्हणोनी. ॥ ५ ॥ तैसीच वारुवांआंगीं कवचें । घालोनी 'हो हो' म्हणे वाचे । चंचळ होतां मन त्यांचें । स्वहस्तें सावें थापटीत. ॥ ६ ॥ रूप सगुण मनोहर । कमलपत्राक्ष श्रीयदुवीर । सुरवर ज्याचे आज्ञाधार । तो ओढी दोर अश्वांचे! ॥ ७ ॥ किरीटकुंडलें मंडित वदन । कोटिकंदर्प ओवाळून । वरी टाकावे, भाळीं चंदन । कस्तूरीमळवट रेखिला. ॥ ८ ॥ भाळ विशाळ, आकर्ण नयन, । सरळ नासिक शोभायमान, । बिंबाधर शोभे गुंजवर्ण, । मधें दंतपंक्ती सतेज. ॥ ९ ॥ विशाळ वक्षःस्थळावरी । कळा शोभे महाकुसरी । चतुर्भुज भूषणें, करीं । कैरकमळ साजिरें. ॥ १० ॥ सरळ हस्त, सरळ बोटें । वरि नखें चंद्रची वाटे । नैगर रूप सुंदर मोटें । ना ठेंगणें, सैमसमान. ॥ ११ ॥ उदरत्रिवळींत नाभिस्थान । वरी मौंज तो कटी पूर्ण । सरळ पोठरिया जाण । कर्दळीस्तंभासारिख्या. ॥ १२ ॥ पद सुंदर सुरेखें । विराजे भूषणें सूर्यासारिखें । ते पायधूळी ब्रह्मादिकें । इच्छिती सदा सुरवर. ॥ १३ ॥ श्रीकृष्णें कृष्णरथीं । हस्त देउनी चढवी वरती । बाप धन्य पांडवगती । कोणे मती वदावें? ॥ १४ ॥ मग रथ लोटिला तये वेळीं । सैन्यीं पातले पार्थवनमाळी । देखोनि भीष्म सुखसमेळीं । प्रे-

---

१. कृष्णप्रतिज्ञाभंग कवीनें येथें नवम दिवशीं दिला आहे. मूळांत तो तिसरे दिवशींच झाल्याचें वर्णिलें आहे. नवव्या दिवशींचा प्रसंग हा दुसरा होय. पुढें ओ० १०८ वरील टीप पहा.
२. घोड्यांच्या अंगावर. ३. हातांतील कमळ. ४. देखणें, सुरेख. ५. प्रमाणशीर, बांधेसूद. ६. जाडेपणा. ७. अर्जुनाच्या रथावर.

माश्रु नेत्रीं टाकीत. ॥ १५ ॥ 'धन्य वंश आमुचा क्षितीं । जो पांडवीं साह्य श्रीपती । धन्य पार्थ वीर त्रिजगतीं' । म्हणोनि तोषे देवव्रत. ॥ १६ ॥ असो पार्थ तया दिवसीं । तीव्र तरणी जैसा आकाशीं । तैसा दिसे नयनासी । कौरवसैन्यासीं भयाभीत. ॥ १७ ॥ गुरुदत्त धनुष्यबाण । घेउनी स्यंदनीं गंगानंदन । उभय कृष्णातें लक्षोन । बोलता झाला, राजया! ॥ १८ ॥ तों अभिमन्यूनें कौरवसेना । उडविली मोकळोनी बाणा । जे न आवरती तया सैन्या । उडे सैन्य दश दिशां. ॥ १९ ॥ जैसें भूस उडे वायूनें । तैसें उडविलें निर्वाणबाणें । कोणी न धारती त्याकारणें । समरांगणीं युद्धासीं. ॥ २० ॥ सौभद्राचे ठाईं जाण । कृष्णें दीधले आपुले गुण । धैर्य, शौर्य, पराक्रम पूर्ण । प्रतिअर्जुन दूसरा. ॥ २१ ॥ दोनी पक्ष ज्याचे पुण्य पावन । देखून बोलिला गंगानंदन । म्हणे 'वंश धन्य जयाचेन । पराक्रमी आन ऐसा नसे.' ॥ २२ ॥ म्हणोनी आनंदला तेथ । भीष्माचार्य रणपंडित । तेव्हां जिकडे तिकडे म्हणत । 'निर्वाण होत सकळांसीं.' ॥ २३ ॥ द्वंद्वयुद्धें मांडिलीं अनेक । विमानीं पाहती वृंदारक[१] । पार्थरथीं वैकुंठनायक । वारू नाचवी कौशल्यें. ॥ २४ ॥ कवच, कुंडलें, कोटीरें[२] । प्रभें व्यापिलें दिशांबर । तो श्रीकृष्ण यदुवीर । करणें करिता असंग पैं. ॥ २५ ॥ सर्व सारथियांमाजी सुघड[३] । भक्तपालक जो कां उघड । तो द्वारकापुर सुहाड[४] । पाठी राखत पार्थाची. ॥ २६ ॥ मध्यान्हींचा जैसा चंडकिरण । तैसा दिसे तीव्र अर्जुन । भीष्म म्हणे 'आजीं निर्वाण । तुझें जाण मजसवें.' ॥ २७ ॥ होत वाद्यांचा गजर । वीर भिडती अपार । पडोनि देहाचा विसर । नाचती शूर रणरंगीं. ॥ २८ ॥ तुटोनि पडती पादशिर । धनुष्यांसहित पडले कर । बावरझोंटी पडले वीर । ऐसें समर मांडलें. ॥ २९ ॥ गजअश्वासहित स्वार । नग्नशस्त्रें मंडितकर । रथांसहित धनुर्धर । पायदळ अपार पाडियेलें. ॥ ३० ॥ यापरी प्रळय कौरवदळीं । पांडवसैन्यीं केली होळी । रक्तगंगापूर खळाळी[५] । क्षारसिंधुसंगमा. ॥ ३१ ॥ तों झालेंसे मध्यान्ह । वारू रथींचे तृषित जाणून । तेव्हां कुरुक्षेत्रींचें जीवन । पाजवी जगजीवन ते काळीं. ॥ ३२ ॥ हयकंडु खाजवी नखेंकरून । ओंजळी भरुनी उडवी जीवन । तें देखोनी देवर्षिगण । आश्चर्य करिती मानसीं. ॥ ३३ ॥ जे हस्त इच्छीत रमा उरीं । देव इच्छिती मस्तकावरी । सदाशिव ध्यान करी । न धारती तरी मानसीं. ॥ ३४ ॥ ब्रह्मा जन्मलासे [ज्या]उदरीं । तो दृढ आकळी हयदोरी । तुरंग धांवोनी झडकरी । रथास जुंपी

---

१. देव. २. मुकुट. ३. हुशार, चतुर. ४. सुजाण. ५. खळाळे, खळखळाट करीत जाई.

लगबगें. ॥ ३५ ॥ 'बाप पार्थाचें भाग्य गहन' । सकळही म्हणती पाहोन । वर्णू न शके [1]सहस्त्रवदन । ज्यासी श्रीकृष्ण स्वयें रक्षी. ॥ ३६ ॥ 'पदरज न मिळे आम्हां । चरणामृतासी भुलली रमा । नाभिकमळीं झाला ब्रह्मा । तोही इच्छीत पदधूळी.' ॥ ३७ ॥ ऐसें सुरवर बोलती । तों रथीं चढला सुभद्रापती । [2]नंदिघोक लोटिला क्षितीं । रणीं श्रीपती तेधवां. ॥ ३८ ॥ यावरी तो गंगानंदन । दिसे जैसा सूर्यनारायण । बोले श्रीकृष्णार्जुनाकारण । तेंची ऐकें राजया! ॥ ३९ ॥ [3]'हे प्रिय कृष्ण! अर्जुना । आजीं निर्वाण झुंजेन रणा' । सवेंची म्हणे 'नारायणा! । प्रतिज्ञा माझी अवधारीं. ॥ ४० ॥ तुझा नेम शस्त्र न धरीं । तरी धरवीन आजीं समरीं । कंसांतका! मधुमुरारी! । प्रतिज्ञा खरी करीन मी. ॥ ४१ ॥ हें जरी न करवे माझेनी । तरी व्यर्थ प्रसवली [4]स्वर्धुनी । शंतनुज हें आजींचेनी । सर्वथा मी मानेना. ॥ ४२ ॥ हें काय पृथेचें बालक?। नेणेची भीष्मबाण तंव एक । अधरीं दुग्ध दिसे ऐक । तरी तूं सांभाळ करिसी पैं. ॥ ४३ ॥ प्रतिज्ञा सत्य करीन कैसी? । तेही प्रमाण परियेसीं । भार्गवशिष्य मी हृषीकेशी! । भार्गव समरासी जिंकिला. ॥ ४४ ॥ आणि विजयरथ, विजय वीर । विजयध्वजीं विजय वायुकुमर । [5]हरिमय घोडे तूं हरी त्यावर । तरी प्रतिज्ञा सत्वर करीन खरी. ॥ ४५ ॥ तूं सारथी जयावरी । तयाउद्देशें चक्र करीं । तुझ्या धरवीन, मी तरी । शंतनुज भीष्म असें. ॥ ४६ ॥ तुझे चरणाहूनी उत्पन्न । शिवमस्तकीं विराजे पूर्ण । त्या गंगेपोटीं जन्मलों असेन । तरी मी धरवीन चक्र करीं. ॥ ४७ ॥ 'ऐसें किमर्थ?' म्हणसी हरी । तरी तूं पांडवपाळक निर्धारीं । हेचि प्रतिज्ञा करीन खरी । तूं करिसी निर्धारीं पैं माझी. ॥ ४८ ॥ असा तो प्रकार करीन जाण । सांगतों हो मी जगजीवन! । या रणीं आजीं मी पूर्ण । काळही फोडीन निजबाणीं. ॥ ४९ ॥ विजयरथ करीन चूर्ण । कपिवरध्वज तळीं पाडीन । मग तूं करीं चक्र घेऊन । धांवसी हरी! मजवरी. ॥ ५० ॥ अर्जुनासी मूर्छित करीन । सकळ सेनेचीं शिरें पाडीन । तेव्हां क्रोधें चक्र घेऊन । धांवसी कीं मजवरी. ॥ ५१ ॥ बाणें झांकीन रणक्षिती । महावीर दशदिशां पळती । तेव्हां चक्र घेऊन श्रीपती । मजवरी धांवसी न सांवरत. ॥ ५२ ॥ आजीं ही खरी करीन प्रतिज्ञा । नातरी आण तुझी श्रीकृष्णा! । माझा क्षात्रधर्म जनार्दना! । यावरी आतां अवलोकीं.'॥५३॥ ऐसें देवव्रतें बोलोनी । चाप ठणत्कारिलें ते क्षणीं । झणत्कारिल्या लघु [6]किंकिणी ।

---

१. शेष. २. अर्जुनाच्या रथाचें नांव. ३. हें भाषण मूळापेक्षां येथें जास्त विस्तारानें दिलें आहे. ४. देवनदी, गंगा. ५. तेजस्वी. हरि=तेज (?). ६. लहान घंटा.

ऐकोनि कर्णी सर्व भ्याले. ॥५४॥ प्रळयीं क्षोभे जैसा कृतांत। तेवीं समरीं दिसे गंगासुत। शर वर्षला अपरिमित। लेखा शेषातें न करवे. ॥ ५५ ॥ लक्षांचीं लक्ष शिरें। उडविलीं गंगाकुमरें। कीं ते कंदुक उडती त्वरें। आकाशपंथें एकदाची. ॥ ५६ ॥ वृक्षाग्रींचीं फळें लक्षून। पक्षी येती झेंपावून। तैसीं बाणीं शिरें उडवून। ऊर्ध्वपंथें बहु जाती. ॥ ५७ ॥ पांडवदळीं हाहाकार। असंख्य वीरांचा केला संहार। अलातचक्रा ऐसा गंगाकुमर। सेनेमाजीं धांवतसे. ॥ ५८ ॥ बाणपर्जन्याच्या धारा। त्यामाजीं शिरें गारा। अशुद्धनदीचे सत्वरा। पूर चालिले चहूंकडे. ॥ ५९ ॥ पळावया नाहीं ठाव। नेदी लपावया पृथ्वी वाव। रथगजांआड शूर सर्व। पळतांही न उरती. ॥ ६० ॥ शर भीष्माचे तीक्ष्ण। गजकलेवरें फोडोन। सवेंची अश्वनर भेदून। पृथ्वीमध्यें प्रवेशती. ॥ ६१ ॥ उरले वीर सोडोनी समर। भयें वरिती दिगंतर। महायोद्धे रणीं धीर। न येती समोर भीष्माचे. ॥ ६२ ॥ आकांत वर्तला थोर। तों पार्थासी म्हणे यदुवीर। 'कोठें गेलें प्रतिज्ञोत्तर। आजीं तुझें समरांगणीं'? ॥६३॥ क्रोधें बोले, अर्जुनू। म्हणे 'हे श्रीकृष्णू! जनार्दनू!। लोटीं वेगें स्यंदनू। भीष्मासमोर रणरंगीं.' ॥ ६४ ॥ म्हणतां त्रुटी न वाजतां। श्रीकृष्णें लोटिलें रथा। भीष्मासमोर तत्वता। उभा केला क्षणार्धे. ॥ ६५ ॥ अर्जुनें धनुष्य चढवुनी। बाण सोडिले ते क्षणीं। महाशर क्रोधेंकरोनी। जे का इंद्रशिवदत्त. ॥ ६६ ॥ तेव्हां भीष्में बाणांचा पूर। लाविलासे अर्जुनावर। जे का भार्गवदत्त महाशर। क्षत्रियां परिहार न होतसे. ॥ ६७ ॥ अर्जुनें सोडिले जे बाण। ते भीष्में नाशिले जाण। परी भीष्माचे जे शर निर्वाण। न निवारती पार्थातें. ॥ ६८ ॥ पूर्णप्रतापी देवव्रत। पूर्वेसी दिसे क्षणांत। क्षणेंची उत्तरे रथ। दक्षिणे जात क्षणें पैं. ॥ ६९ ॥ पश्चिमेसी दिसे ते क्षणीं। क्षणेंचि गुप्त, न दिसे नयनीं। अंतरिक्षीं क्षण मेदिनीं। होउनी पार्था विंधीतसे. ॥ ७० ॥ निवारोनी पार्थशरांसी। भीष्में त्रासिलें पार्थासी। बाणें खिळिलें सर्वांगासी। दिसे मयूरासारिखा. ॥ ७१ ॥ बाणपिच्छेंकरून जाण। रथीं शोभे अर्जुन। अनिवार गंगानंदन। क्षणही उगा न थारे. ॥ ७२ ॥ पाठोपाठीं सुटती बाण। अर्जुनासी न होय निवारण। मग ते महावीर संपूर्ण। करिती निवारण ते समयीं. ॥ ७३ ॥ मुख्य धृष्टद्युम्न सेनापती। अनेक राजे महारथी। परी भीष्मबाण नावरती। सवेग जाती पार्थावरी. ॥ ७४ ॥ क्रोधें रगडोनी दांतीं अधर। गदा घेऊनियां भीष्मावर। अनवरत धांवे वृकोदर।

---

१. हिशोब. २. अत्यंत थोडा काळ, क्षणाचा चतुर्थांश अथवा लवाचा द्वितीयांश, चुटकी.

देखोनि इतर पळाले. ॥ ७५ ॥ गदा भंवडोनी ते क्षणा । मारूं पाहे गंगा-नंदना । भीष्में सोडोनि तीव्रबाणा । गदा तिळतुल्य पैं केली. ॥ ७६ ॥ सर्वेची सोडुनी दोनी शर । उभाचि खिळिला वृकोदर । तेव्हां नकुळसहदेव वीर । भीमासि सोडिती बहुयत्नें. ॥ ७७ ॥ परी अर्जुनावरी जे बाण । मोकलिले ते अनिवारण । इतुकेही महावीर, त्याकारण । सामर्थ्य नसे पराभवूं. ॥७८॥ विशेष भीष्मबाणांचा प्रताप । गळालें पार्थाचें गांडीव चाप । मूर्च्छा येउनी सकंप । ध्वजस्तंभीं टेंकला.॥ ७९ ॥ रथ फेरितां जगन्मोहन । पार्थाकडे पाहे परतोन । म्हणे 'कां रे न सोडिसी बाण?' । तंव तेणें नयन झांकिले. ॥ ८० ॥ विकळ पाहोनी अर्जुन । मनीं विचारी श्रीकृष्ण । 'म्यां चक्र न धरितां ये क्षण । मारील पार्थासी हा रणीं. ॥ ८१ ॥ जरी म्यां चक्र धरावें करीं । तरी मजला आलीसे हारी' । पुन्हा विचारी श्रीहरी । 'धनंजय निर्धारीं प्राण माझा. ॥८२॥ तयामरणाहूनी पण । काय अधिक मजलागून? । अनेकपरी भक्तरक्षण । करावया पूर्ण अवतरतों. ॥ ८३ ॥ अंबऋषीकारण । म्यां जन्म घेतले पूर्ण । तया ब्रीदासी येईल हाण । धनंजय मरण पावतां पैं. ॥ ८४ ॥ यापरी भक्त-रक्षणासी । अवतारलों मी हृषीकेशी । तेथ भीष्मपणहारीसी । काय मजसीं गौणता? ॥ ८५ ॥ म्यां वृथा धरितां अभिमान । तरी पार्थासी मारील गंगा-नंदन' । ऐसा विचार करितां जगजीवन । येती भीष्मबाण दारुण पैं. ॥८६॥ पाहोनी अर्जुनाचें मुख । कळवळिला वैकुंठनायक । म्हणे 'निर्दय भीष्म हा देख । मारीन निःशेख यास रणीं'. ॥ ८७ ॥ क्रोधें आरक्त केले नयन । अ-धर रगडिले दशनेंकरून । म्हणे 'संग्रामधर्म कथन । याणें केला मजसमक्ष. ॥ ८८ ॥ तोचि हा भीष्म आतां । अधर्मी झाला तत्वतां । अर्जुन मूर्च्छित असतां । बाण सोडी अधर्में. ॥ ८९ ॥ तरी या भीष्मासी यावरी । निश्चयें मारावें' म्हणे 'समरीं.' । तेव्हां सुदर्शनस्मरण करी । क्रोधें श्रीहरी तप्त असे. ॥ ९० ॥ करितां सुदर्शनाचें स्मरण । हातासी आलें न लगतां क्षण । उडी टाकी रथावरून । जगजीवन लगबगें. ॥ ९१ ॥ क्रोधें चालिला मुरारी । चक्र घेऊनियां करीं । करीवरी धांवे जैसा हरी[1] । तैसा श्रीहरी धांवला. ॥ ९२ ॥ सांवरी पीतांबराचे झोगे । वामकरें करुनी मागें । धांवतसे परम क्रोधांगें । लागवेगें करूनियां. ॥ ९३ ॥ उगवले नेणों सहस्रगभस्ती[2] । तेवीं झळके सुदर्शन हस्तीं । बिंबाधर रत्नदांतीं । रगडोनियां ते समर्थी. ॥ ९४ ॥ कौरव-दळीं हाहाकार । महाभयें घेती गिरिकंदर । रैवासावीस[3] महाशूर । कांपती

१. सिंह. २. सूर्य. ३. कासावीस, घाबरे.

थरथर तेजें पैं. ॥ ९५ ॥ वाटे सेनेचीं समग्र शिरें । पाडील एक घायें निर्धारें । महाशूरांचीं शस्त्रें त्वरें । गळोनी पडती करींचीं. ॥ ९६ ॥ आतां कैंचा गंगानंदन । झांकले सर्वांचे नयन । कौरव धाकें मूर्च्छा येऊन । पालथे पडती पृथ्वीवरी. ॥ ९७ ॥ परम क्रोधायमान श्रीधर । ब्रह्मांड जाळील हें समग्र । दोनी दळीं आकांत थोर । हाक एकची जाहली. ॥ ९८ ॥ पृथ्वीतळ तडतडां उधळत । अंबर थरथरां कांपत । वायु फिरों न लाहे तेथ । सागर सप्त तप्त झाले. ॥ ९९ ॥ सुदर्शनतेजावर्ती । चंद्र सूर्य बुचकळ्या देती । 'सृष्टी गेली गेली!' म्हणती । सुर पळविती विमानें. ॥ १०० ॥ चक्रवत् फिरवी सुदर्शन । सावध पाहे गंगानंदन । म्हणे 'जगन्निवास! मनमोहन! । धावें, येईं झडकरी. ॥ १०१ ॥ हे द्वारकानगरविहारी! । हे मधुमुरनरककंठभारी! । माझी प्रतिज्ञा झाली खरी । मारीं यावरी मज आतां. ॥ १०२ ॥ हे रविकरवरअंबरधरा! । त्रिपुरकंठवंद्या! गुणगंभीरा! । छेदीं सत्वरें माझ्या शिरा । सोडवीं संसारापासुनी. ॥ १०३ ॥ जन्मापासूनि आजपर्यंत । आचरलों ब्रह्मचर्यव्रत । तें सफळ झालेंसे समस्त । पावेन मृत्यु हरिहस्तें. ॥ १०४ ॥ दुर्जनसंगेंकरूनि जाण । आजवरी शीणलें माझें मन । सोडवीं या देहापासून । घें मिळवोन तुजमाजीं. ॥ १०५ ॥ भक्तजनसंतापनाशका! । इंदिरावरा! त्रिनेत्रसुखदायका! । पांडवजनप्रतिपाळका! । सोड वेगीं का सुदर्शन.' ॥ १०६ ॥ सावध होउनी अर्जुन । रथीं पाहे तों जगजीवन । न दिसे, तेव्हां म्हणून । भीष्माकडे विलोकी. ॥ १०७ ॥ तंव सुदर्शन करीं घेऊन । भीष्मावरी धांवे श्रीकृष्ण । पाहतां रथाखालीं अर्जुन । उडी टाकून धांवतसे. ॥ १०८ ॥ लागवेगें हरीपाठीं । धांवुनी गेलासे निकटीं । घालुनी हरिजघनीं मिठी । म्हणे 'जगजेठी! थार, थार.' ॥ १०९ ॥ परम क्रोधायमान श्रीधर । पार्थासी झिडकावी दूर । पुन्हा धांवोनि सुभद्रावर । धरी चरण आवडीं. ॥ ११० ॥ म्हणे 'मज सोडीं सत्वर । भीष्माचें छेदूं दे शिर' । चरण न सोडी सुभद्रावर । स्तवन अपार करितसे. ॥ १११ ॥ 'माझे हातें कंसारी! । हें कौरवदळ संहारीं । भीष्मासी न मारीं यावरी । चला रथावरी श्रीरंगा!' ॥ ११२ ॥ ऐसें अर्जुनें अनुवा-

---

१. सुदर्शनचक्राच्या तेजाच्या भोंवऱ्यांत. २. सूर्यकिरणाप्रमाणें उत्तम (=तेजस्वी) आहे वस्त्र ज्याचें, अशा! ३. शिववंद्या! ४. मूळांत श्रीकृष्ण दुसऱ्यांदा भीष्मावर हातांत चक्र वगैरे कांहीं न घेतां चालून जातात व अर्जुन त्यांस पूर्वप्रतिज्ञेची आठवण देऊन परत रथावर आणतो असें आहे. (अ० १०६ श्लो० ५६–७६.) ५. हरीच्या कमरेस. ६. थांब थांब, स्थिर हो. ७. बोलून.

दोन । हातीं धरूनि रुक्मिणीरमण । निजरथावरी बैसवोन । वरी आपण आ-रूढला. ॥ ११३ ॥ हरिइच्छेकरूनि जाणा । सुदर्शन गेलें स्वस्थाना । अर्जुन वर्षला त्या बाणां । सहस्रवदना न गणवे. ॥ ११४ ॥ मोडोनी रथ, कुंजर । उरीं शिरीं भेदिती वीर । अश्वांसहित पडले स्वार । शस्त्रेंसीं कर तुटले. ॥ ११५ ॥ मांडली एकची रणधुमाळी । रक्तनदी गर्जितें चालिली । अनेक प्रेतें वाहूनि गेलीं । सागरीं मत्स्य जयापरी. ॥ ११६ ॥ पार्थाचें संधान पाहून । भीष्म झाला आनंदघन । म्हणे 'धन्य वीर अर्जुन ! । वंश पावन याचेनीं.' ॥ ११७ ॥ बाणीं बुजिला भीष्मरथ । दाहा धनुष्यें छेदिलीं तेथ । भीष्म-हातींचीं क्षणांत । देवव्रत म्हणत ते समयीं. ॥ ११८ ॥ म्हणे 'अर्जुना ! तुजसमान । नाहीं वीर दुजा आन । तुझेनी साजिरा संपूर्ण । हा कुरुवंश आमुचा.' ॥ ११९ ॥ तंव गदा घेऊनि वृकोदर । संहारीत जात कुंजर । कुंभस्थळें फोडिती अपार । मुक्त[1] बाहेर उसळती. ॥ १२० ॥ शुंडादंड पि-ळोन । कित्येक पाडिले उलथोन । कितेकांचे दंत मोडोन । झोडिले अपार वीर तेणें. ॥ १२१ ॥ पळतां गज पायीं धरी । आपटोनी भूमीं, मारी । पुच्छें धरोनी चक्राकारीं । भंवडोनी टाकी अपार. ॥ १२२ ॥ मग मारिली अद्भुत हाक । तेव्हां महावीरीं घेतला धाक । भीम नव्हे, तो कृतांत देख । सैन्यासी अंतक ओढवला. ॥ १२३ ॥ तेव्हां भीष्माचिया पाठीसी । येउनी दडती परियेसी । कित्येक म्हणती भीष्मासी । 'धांवा, धांवा, देवव्रता !' ॥ १२४ ॥ तेव्हां भीष्में भीमातें । पराभविलें सामर्थ्यें । मग अस्त झालें सूर्यातें । पावलीं शिबिरातें द्वयबळें. ॥ १२५ ॥ धर्मराज आपुल्या शिबिरीं । श्रीहरीशीं विचार करी । सचिंत होउनी अंतरीं । खेद करीत ते क्षणीं. ॥ १२६ ॥ 'भीष्मापा-सोनी कदा जय । आम्हांसी कवणकाळीं न होय । माझे बंधू आणि हे राय । भीष्मासी पराभवूं न शकती. ॥ १२७ ॥ तरी आइकें श्रीकृष्णनाथा ! । मज राज्य न लगे हें सर्वथा । मी वनामाजीं तत्वता । जाऊनि तप आचरेन.' ॥ १२८ ॥ श्रीकृष्ण म्हणे 'चौघे बंधू । तुझे असती बळसिंधू । आणि पराक्रमी राजे प्रबुद्ध । राया ! असती तव संगीं. ॥ १२९ ॥ त्यांसी जरी आटोपेना । तरी मजप्रती देईं आज्ञा । सुदर्शन सोडोनी ये क्षणा । संहारीन दुष्टांसी. ॥ १३० ॥ मी भक्तजन-सहाकारी । प्रल्हाद रक्षिला नानापरीं । दावाग्नी गिळिला निर्धारीं । रक्षिले गाई, गोपाळ म्यां. ॥ १३१ ॥ शिळाधारीं सहस्रनयन । जेव्हां वर्षला गोकुळीं घन । अंगुळीवरी गोवर्द्धन । सप्तदिन धरिला म्यां. ॥ १३२ ॥ रात्रीमाजीं

---

१. मोतीं. हत्तीच्या गंडस्थळांत मोतीं असतात, असा कविसंकेत आहे.

मथुरापुरी । नेली द्वारावतीमाझारीं.' । मग धर्म म्हणे ते अवसरीं । 'तुझेन निर्धारीं पैं आम्ही. ॥ १३३ ॥ तूं अनाथनाथ हृषीकेशी । निजांगें भक्तांसी रक्षिसी । अवतार धरुनी पृथ्वीसी । संकटीं धांवसी आम्हांतें. ॥ १३४ ॥ तुझेनी श्लाध्य आम्ही पूर्ण.' । तेव्हां म्हणे जगजीवन । 'युद्धापूर्वी तुम्हांकारण । काय गंगानंदन बोलिला?' ॥ १३५ ॥ धर्म म्हणे 'जी! जगजीवना! । पुढें येईं भेटीकारणा । जयप्राप्तीच्या ते खुणा । सांगेन ऐसें म्हणोनी. ॥ १३६ ॥ तरी भीष्मभेटीसी आतां' । धर्म म्हणे 'जावें तत्वता । जयप्राप्ती श्रीकृष्ण-नाथा! । भीष्मालागीं पैं पुसूं.' ॥ १३७ ॥ तेव्हां धर्म, भीम, अर्जुन, । नकुल, सहदेव, श्रीकृष्ण । रजनीमाजीं साहीजण । भीष्मशिबिरा पातले. ॥ १३८ ॥ भीष्म पाहोनी पंडुनंदन । घालिती पांचही लोटांगण । भीष्में मस्तक आघ्राणोन । उठविलें तेव्हां पांचांसी. ॥ १३९ ॥ भीष्में श्रीकृष्ण पाहोन । उठोनि घाली लोटांगण । चरणीं मस्तक ठेवून । प्रेमें पूजन पैं केलें. ॥ १४० ॥ मग भीष्म अपार स्तवन । करुनी म्हणे 'हे जगजीवन! । श्रम-विलें तुज चक्र धरवून । रणांगणीं दयाळा! ॥ १४१ ॥ तो अपराध क्षमा करुनी । मज क्षेम[१] दीजे चक्रपाणी!' । श्रीकृष्ण म्हणे भीष्मालागोनी । खेंवीं कवळोनी चहूंभुजे. ॥ १४२ ॥ श्रीकृष्ण म्हणे 'गंगासुता! । मज श्रम नसे सर्वथा । त्यांतही क्षात्रधर्म तत्वता । विहित रणीं पैं असे. ॥ १४३ ॥ आणि भक्तजना मी सहाकारी । जैसी इच्छा असे जया अंतरीं । तैसी सिद्धी पाववीं मी हरी । अपराध निर्धारीं नाहीं तुझा.' ॥ १४४ ॥ आणि म्हणे सर्वेश्वर । 'धन्य तूं एक महाशूर । तुज ऐसा या पृथ्वीवर । आन वीर होईना.' ॥१४५॥ मग भीष्म म्हणे 'पूतनारी! । माझीं पांचही बाळें जतन करीं । वेल्हाळ माझे श्रमले समरीं । युद्ध करितां बहुतांसी. ॥ १४६ ॥ वत्सें वनवासीं श्रमलीं । सर्वेची युद्धावरपड[२] झालीं.' । असो[३] धर्म बद्धांजळी । उभा टाके भीष्मापुढें. ॥ १४७ ॥ धर्म म्हणे 'आम्हांसी जय । महाराजा! कैसा प्राप्त होय? । तूं महावीर प्रतापसूर्य । आकळसी कैसा आम्हांतें?' ॥ १४८ ॥ मग भीष्म म्हणे 'जय जाण । कृतांतासी नव्हे मजपासून । मग इतरांसी प्राप्त कैसेन । हो-ईल समरीं? सांग पैं. ॥ १४९ ॥ परी एक मार्गकरूनी सत्य । तुम्हांसी जय होईल प्राप्त । तोही सांगतसें निश्चित । समरागारीं युद्धीं पैं. ॥ १५० ॥ शि-खंडीसी पुढें करून । पाठीसी असावा अर्जुन । समरीं मजवरी टाकितां बाण । जयप्राप्तीस कारण हेंचि पैं. ॥ १५१ ॥ मी शिखंडीशीं युद्ध न करीं । सहसा

---

१. आलिंगन. २. युद्धांत गुंतलेलीं. ३. सर्वसंग्रहपाठ:–असा.

बाण न टाकीं त्यावरी । पूर्वद्वेषें जाण निर्द्धारीं । भार्गव वर दे तयातें. ॥ १५२ ॥ आणि प्रथम स्त्री मग षंढ । ऐसियावरी न सोडीं प्रचंड । मी सहसा बाण, धर्मा! उघड । हेंचि गूढ वर्म जाण पैं.' ॥ १५३ ॥ तेव्हां जन्मेजय मुनीतें। म्हणे 'शिखंडिद्वेष भीष्मातें । भार्गवें शापिलें कोणनिमित्तें? । तें मज निश्चितें सांगिजे.' ॥ १५४ ॥ ते कथेचा कथार्थ । सांगिजेल पुढें निश्चित । तेव्हां भीष्मासी वंदुनी पंडुसुत । स्वशिबिरातें पावले. ॥ १५५ ॥ धृतराष्ट्रासी म्हणे संजय ऋषी । ऐसें वर्तलें रणभूमीसी । आजींचे या नवम दिवसीं । पुढें परियेसीं कुरुराया! ॥ १५६ ॥ जन्मेजयासी सांगे मुनी । पुढें भीष्मशरपंजर श्रवणीं । प्रेमें ऐकतां कलिमला [1]धोणी । होऊनि जाय क्षणार्धें. ॥१५७॥ श्रीगुरु प्रभु विश्वंभर । शुभानंद तयाचा किंकर । श्रोतयां विनवी जोडोनी कर । कथार्थ सादर श्रवणार्थ. ॥ १५८ ॥ इतिश्रीमन्महाभारते । श्रीव्यासगुरुविरचिते । भीष्मपर्व रसाळग्रंथें । श्रवणमुखें प्यावें पैं. ॥ १५९ ॥

---

## अध्याय तेतिसावा.

जन्मेजयासी म्हणे ऋषी । वैशंपायन ज्ञानराशी । 'शिखंडिजन्म आणि भीष्मासी । परियेसीं त्यासीं द्वेष झाला. ॥ १ ॥ शिखंडिहस्तें भीष्मासी । निधन म्हणोनी शापावयासी । भार्गवें कोणें निमित्तेंसी । तेंही सादरें श्रवण करीं. ॥ २ ॥ प्रतीपरायाचा नंदन । तो भीष्मपिता परियेसीं जाण । पूर्वज तुमचा शंतनु पूर्ण । पराक्रमी आन तैसा नसे. ॥ ३ ॥ त्याणें वरिलें गंगेसी । प्रथमसंबंधीं परियेसीं । अष्टवसू तिच्या गर्भासीं । आले जाण पैं राया. ॥ ४ ॥ त्यांत एक भीष्म ठेविला । येर सातांचा उद्धार केला । स्वयें स्वतोयीं ते वेळा । उत्पन्न होतांची जाण पैं. ॥ ५ ॥ तया शंतनूसी भीष्मातें । देऊन जान्हवी अदृश्य तेथें । झाली तेव्हां शंतनूतें । गंगाविरहें त्रासिलें. ॥ ६ ॥ राज्यवैभवें सुख नव्हे जाण । म्हणुनी वसे महाकानन । गंगासुरतदुःख आठवून । होय उदासीन क्षणक्षणां. ॥ ७ ॥ तेव्हां भीष्मासी भार्गवाहातीं । जान्हवी ओपी विद्येनिमित्तीं । भार्गवें धनुर्वेदादि भीष्माप्रती । सिकविले प्रीतीकरोनियां. ॥ ८ ॥ प्रौढ होतां भीष्मासी । राज्य चालवीतसे न्यायेंसी । शंतनूनें विरह-

---

१. धुण्याचा दगड; स्वच्छ करण्याची जागा. २. ही शिखंडिजन्माची कथा मूळांत येथें दिलेली नाहीं. मूळांतील 'भीष्मदुर्योधनसंवाद' (अ० १०९), 'अर्जुनदुःशासनसमागम' (अ० ११०), द्रोणाचार्य आणि अश्वत्थामा यांचा सुंदर संवाद (अ० ११२), द्रोणपार्षतयुद्ध (अ०११६) आणि 'दुःशासनपराक्रम' (अ० ११७) हे भाग कवीनें गाळले आहेत.

ज्वरासी । प्राप्त होउनी वनीं फिरे. ॥ ९ ॥ दाही दिशा हिंडे राजेश्वर । दाश-कन्या सत्यवती सुंदर । तीसी पाहोनी केला विचार । 'कवणाची? कोण वर्ण?' म्हणोनी. ॥१०॥ ती म्हणे 'मी दाशराजकन्या' । ऐकोनी शंतनु तीजकारणा । म्हणे 'मज वरुनी माझ्या सदना । राहें सुंदरी! वैभवें.' ॥ ११ ॥ तेव्हां सत्य-वती म्हणे 'पित्यासीं । राया! विचार पुसें, परियेसीं.' । मग शंतनु जाऊनि दाशासी । म्हणे 'सत्यवतीसी मज अर्पी.' ॥१२॥ कैवर्तकें शंतनूसी ते क्षणीं । पूजोनि बैसविलें आसनीं । म्हणे 'राया! एक संशय मनीं । माझे येतसे महाराया! ॥१३॥ ते निरसीं, तरी माझी कन्या । सुगंधी वरील तुज मान्या । आणि चक्र-वर्ती तूं भूरमणा! । इच्छिसी, तें ये क्षणीं मिळे.' ॥१४॥ मग शंतनु म्हणे 'कैव-र्तका! । कायसी तुजला आशंका?' । दाश म्हणे 'स्वामी! नरनायका! । सांगतों ऐका नेम असे. ॥ १५ ॥ मम कन्येउदरीं तव वीर्यें । पुत्र होतील जे निश्चयें । ते वंशधर आणि ऐक्यें । राज्यधरही त्यां कीजे. ॥ १६ ॥ हें जरी करूनि देसी भाक । तरी हा विचार घडेल देख.' । ऐकतां शंतनु निःशेख । न बोले वाक्य एकही. ॥ १७ ॥ मग विचारी शंतनु मनीं । म्हणे 'भीष्म वडील गुणी । टाकूनी कनिष्ठ राज्यासनीं । बैसवितां जनीं अपकीर्ति. ॥१८॥ आणि भीष्म बुद्धिचतुर । असोनि पितृभक्त उदार । त्याहीवरी भार्गवें धनुर्धर । विद्येसी निपुण पैं केला. ॥१९॥ ऐसिया भीष्मातें उपेक्षुनी । कैसी कनिष्ठासी राजधानी । देऊं?' म्हणोनी आपुले मनीं । विचारीत शंतनु असे. ॥ २० ॥ मग उठोनी चालिला नृप-नाथ । परी सुगंधीसी वेधलें चित्त । सुरतसंग आठवुनी भ्रमित । होय क्षणांत शंतनु पैं. ॥ २१ ॥ टाकिला राज्यकारभार । सदा राहे चिंतातुर । भोजन-पानादि विचार । करितां अव्यवस्थित पैं दिसे. ॥ २२ ॥ क्षणीं पुत्रासी उमज पडेल । म्हणोनी राजा सादर ते वेळ । परी स्त्रीकामें करी तळमळ । होतसे वि-व्हळ क्षणेंची पैं. ॥ २३ ॥ तेव्हां भीष्म पित्यासी । नमूनि म्हणे 'काय चिं-तिसी? । वारंवार उदास होसी । किमर्थ? मजसीं सांग राया!' ॥ २४ ॥ ऐ-कोनी भीष्माचे बोल । राजा उगा राहे ते वेळ । मग तो भीष्म बुद्धिकुशळ । उमजला नृपाळमनींचें. ॥ २५ ॥ म्हणे पित्यासी गंगाविरह । झाला तेणें राजा बाह्य । न बोले मजसीं हा निश्चय । करुनी विचारी मानसीं. ॥ २६ ॥ तेव्हां भीष्म म्हणे पित्यातें । 'काय विचारिसी आपुल्या चित्तें? । तें सांगावें जी! मातें । तें मी निश्चितें करीन. ॥ २७ ॥ जें अजिंक्य असे सुरवरां । तें आ-णीन मी सत्वरा । पितृकाजास्तव मी चुरा । देहाचाही करीन. ॥ २८ ॥ जें

---

१. कोळ्याची मुलगी. २. प्रश्न. ३. कोळ्यानें.

जें सांगसील मज राजा! । तैसें करीन निश्चय माझा.' । ऐकोनी पुत्रवचन सहजा । **शं**तनु राजा बोलत. ॥ २९ ॥ म्हणे 'पुत्रा! ऐक वचन । मज चिंता वाटे गहन । **भार**ती वंश हाची पूर्ण । मंडप थोर मज वाटे. ॥ ३० ॥ त्यासी तूं एक स्तंभ जाण । म्हणोनी खेदभरित माझें मन । तरी तुज पाठिराखे बंधुगण । नाहींत म्हणोन बहु चिंता. ॥ ३१ ॥ जरी तुजमागें सहोदर । असते तरी मी सुखनिर्भर । **भार**ती कुळ शोभतें तर । बहु थोर जाण पुत्रा!' ॥ ३२ ॥ मग **भी**ष्म म्हणे द्विजांकारण । प्रधानासमवेत ते क्षण । 'राजपुत्री शोध करून । पित्याकारण आणावी.' ॥ ३३ ॥ ऐकोनी **भी**ष्माची वाणी । पिता संतोषे आपुले मनीं । मग ते द्विजासी बोलावुनी । सांगे **शं**तनु तेधवां. ॥ ३४ ॥ म्हणे 'राजकन्या किमर्थ? । शोध करणें नलगे हो सत्य । **कै**वर्तक**दा**शगृहीं निश्चित । असे कन्या **सु**गंधी पैं.' ॥ ३५ ॥ ब्राह्मण म्हणती **भी**ष्मासी । 'कन्या असे **दा**शगृहासी । राजा वेधलासे तियेसी । जे **सु**गंधी नामें जाण पैं.' ॥ ३६ ॥ मग **भी**ष्म प्रधानजनेंसी । आणि ब्राह्मण ज्योतिषी । संगें घेउनी **दा**शगृहासी । गेला असे सत्वरें. ॥ ३७ ॥ **दा**शें करोनी आसन उपचार । म्हणे 'किमर्थ आलेत जी! साचार?' । **भी**ष्म म्हणे 'तव कन्या सुंदर । **सु**गंधी मत्पित्यासी देइजे.' ॥ ३८ ॥ **कै**वर्तक म्हणे **भी**ष्मातें । 'मम कन्या **शं**तनूतें । दिधलिया मज निश्चितें । संतोष चित्तें माझ्याही. ॥३९॥ परी एक असे मजला आर्त । ती पुरवावी देउनी शपथ.' । **भी**ष्म म्हणे 'मज सांग सत्य । पुरवीन निश्चित **दा**शराजा!' ॥ ४० ॥ **कै**वर्तक म्हणे **भी**ष्मासी । 'मम कन्यापुत्र राज्यधर वंशीं । ऐसें जरी तूं करिसी । तरी तव पित्यासी देईन कन्या. ॥ ४१ ॥ आणि तुजसमान तुझे पुत्र । होती बळियाढे विचित्र । तेही बळें हरुनी भू सर्वत्र । मत्कन्यापुत्रां त्रासिती. ॥ ४२ ॥ तरी यासी **भी**ष्मा अवधारीं । भाक द्यावी माझे करीं.' । मग **भी**ष्म म्हणे ते अवसरीं । **दा**श**कै**वर्तकासी 'राजया! ॥ ४३ ॥ मत्पित्याकारणें आजींचेनी । मी व्रतस्थ राहेन हे अवनीं । सकळ स्त्रिया त्या जननी । **जा**न्हवीसरी पैं मातें. ॥ ४४ ॥ आणि तव कन्यापुत्रांसी । राज्यीं स्थापीन परियेसीं । राज्यधर वंशधर निश्चयेंसी । तेची करीन घे भाक.' ॥ ४५ ॥ ऐसें प्रमाण **दा**शकरीं । देऊनि घेतली कुमारी । सुमुहूर्तें ते अवसरीं । **शं**तनुसीं लग्न झालें. ॥ ४६ ॥ तेव्हां **भी**ष्में प्रमाण **दा**शासी । दीधलें तें श्रुत **शं**तनूसी । परम उल्हासें **भी**ष्मासी । वरद वदला **शं**तनु. ॥ ४७ ॥ म्हणे 'पुत्रा! मजकारणें । नेम नेमिला तुवां कठिणें ।

तरी घेईं का वरदानें । जे का सुरवरां अलोट[1] पैं. ॥ ४८ ॥ तूं इच्छामरणी पैं होसी । स्वबळें शार्ङ्गधर जिंकिसी । स्वमुखें वर्णील हृषीकेशी । तुझिये कीर्तिबळशौर्या; ॥ ४९ ॥ आणि हरिसन्मुख मुक्ती । भीष्मा! तुज घडेल निश्चितीं.' । यापरी भीष्मासी वरदोक्ती । शंतनुरायें दिधली. ॥ ५० ॥ असो शंतनुवीर्यें सत्यवती-। उदरीं दोनी पुत्र झाले असती । चित्रांगद, विचित्रवीर्य क्षितीं । बाळकें निश्चितीं पैं असतां. ॥ ५१ ॥ प्रौढ न होतां दोघे पुत्र । शंतनु पावला परत्र[2] । कर्मक्रियादि सर्वत्र । भीष्में केलें तेधवां. ॥ ५२ ॥ बंधु प्रौढ होय तंववरी । भीष्में राज्य रक्षिलें, वरी । प्रौढ होतां चित्रांगद करीं; । गंधर्वी समरीं वधिलें तया. ॥ ५३ ॥ मग विचित्रवीर्य राज्यीं स्थापिला । तेव्हां लग्ननिश्चय मांडिला । भीष्में तिघी कन्या ते वेळां । जिंकोनि आणिल्या स्वयंवरीं. ॥ ५४ ॥ काशिरायाच्या तिघी कन्या । बंधुसी योजिती तयां धन्या । एक अमान्य, दोघी मान्या । अंबिका आणि अंबालिका. ॥ ५५ ॥ तिसरी ते अंबा भीष्मासी । म्हणे 'विचार एक परियेसीं । म्यां मनीं वरिलें शाल्वासी । वरितां विचित्रवीर्यासी, व्यभिचार घडे.' ॥ ५६ ॥ ते सती शिबिकारूढ ते क्षणीं । शाल्वनगरीं धाडिली बहु मानीं । तेव्हां अंबिका अंबालिका दोनी । विचित्रवीर्यासी वरियेल्या. ॥ ५७ ॥ अंबा जाउनी शाल्वाप्रती । म्हणे 'ऐकें शाल्वभूपती! । तुज वरावें म्हणोनि चित्तीं । संकल्प करुनी पैं आलें.' ॥ ५८ ॥ शाल्व म्हणे तिजकारणें । 'भीष्में जिंकिलें तुजला पणें । म्यां वरितां तुज दोषी होणें.' । म्हणोनी तेणें धिक्कारिली. ॥ ५९ ॥ मग ते शोक करी ते अवसरीं । आली असे हस्तनापुरीं, । भीष्मासी म्हणे मधुरोत्तरीं । 'शाल्व न वरी पैं मातें.' ॥ ६० ॥ म्हणे 'तुवां जिंकिला माझा पण । तरी तूं अंगिकारीं मजलागुन' । भीष्म[3] म्हणे 'भलतें वचन । येउनी जल्पसी मजपुढें.' ॥ ६१ ॥ धिक्कारितांची भीष्म देवें । अंबा तपोवनीं मग भंवे[4] । खेद अद्भुत होऊनियां

---

१. बदलतां न येण्याजोगा; फिरवितां न येण्याजोगा. २. परत्र=परलोकास गेला, वारला. ३. आमच्या जवळील हस्तलिखित प्रतींत भीष्माचे भाषणावर अंबेचा जबाब असा आहे:– येर ह्मणे, 'मी ब्रह्मचारी.' । तों ते ह्मणे, ' व्रतभंग करीं । काय सुख तयामाझारीं ? । स्त्रीभोग संसारीं दुर्लभ. ॥ करोनि नाना साधनें । स्वर्ग इच्छिती तपस्वी मनें । ते यथाविषयकामने । त्या रंभेहोनि सुंदर मी. ॥ जया सुखालागीं अनुभव । भिल्लीसी भाळला सदाशिव । श्मशानवासी केशव । ब्रह्मेनें भोगिली स्वकन्या.' ॥ यावर भीष्म अढळ निश्चयानें ह्मणाला:–ह्मणे, 'पृथ्वी बुडो येच क्षणीं । परि मी न ढळें नियमासनीं । बोलिलें वचन मोडी जनीं । तो वाघूळ नरदेही. ॥ म्यां केलेंसे व्रताचरण । तें न सोडीं गेलेया प्राण । हरिहरें मांडलिया निर्वाण' । ऐसें दारुण बोलिला. ॥ ४. हिंडे, फिरे.

जीवें । म्लान वदनें दुःख करी. ॥ ६२ ॥ मग ते भार्गवा शरण गेली । मानसिक व्यथा निवेदिली । भार्गव म्हणे 'चिंता बाळी! । सहसा न करीं पैं आतां. ॥ ६३ ॥ भीष्म माझा शिष्य असे । तुज भ्रतार करीन निःशेषें । नायके जरी तो वचन ऐसें । तरी त्यासरिसे प्राण घेऊं.' ॥ ६४ ॥ तेव्हां भार्गव गेला गजपुरा । भीष्मासी म्हणे 'वरीं हे दारा.' । भीष्में नमुनी भार्गववरा । म्हणे 'अवधारा गुरुमूर्ती ! ॥ ६५ ॥ म्यां पितृकाजें व्रताचरण । ब्रह्मचर्य धरिलें निर्वाण । तें असत्य गेलिया प्राण । न करीं जाण गुरुवर्या !' ॥ ६६ ॥ ऐकतां क्षोभला क्षत्रियअरी । म्हणे 'भीष्मा! ऐक निर्धारीं । अविलंबें इजला वरीं । नातरीं समरीं हो उभा. ॥ ६७ ॥ मग भीष्में वंदुनी गुरुचरण । म्हणे 'सिद्ध होतों माजवा रण.' । तेव्हां भीष्में सकळ सैन्य । चालविलें जाण कुरुक्षेत्रा. ॥ ६८ ॥ तेव्हां दोघेही संग्रामा । करिती निर्वाण राजोत्तमा ! । सप्तदिनपर्यंत गरिमा । युद्धसीमा पैं झाली. ॥ ६९ ॥ स्वर्गींहूनी भीष्मासी । शंतनु देत शस्त्रासी । आणि वदला भीष्मासी, । 'समरीं पावसी जय पूर्ण.' ॥ ७० ॥ अनावर युद्ध सप्तदिन । होतां दोघांसी निर्वाण । तेव्हां भीष्में निर्वाणबाण । शंतनुदत्त घेतला. ॥ ७१ ॥ म्हणे 'भार्गवा! गुरुमूर्ती ! । तुवां त्रयसप्तवेळा निश्चितीं । निःक्षत्री केली असे क्षिती । तरी तें मजप्रती न चाले.' ॥ ७२ ॥ म्हणोनी तो बाण गुणीं । लावुनी ओढिलासे कर्णीं । मंत्रबीजें उच्चारोनी । लक्षिला भार्गव तेधवां. ॥ ७३ ॥ बाण नव्हे तो कृतांत काळ । कीं महाविषाचे खळाळ । कीं वासुकीमुखींचा विषानळ । कीं तें हळाहळ नेणवे. ॥ ७४ ॥ तया बाणाचें तेज अद्भुत । नेणों ब्रह्मांड ग्रास करीत । सुरवरां वर्तला आकांत । विमानें समस्त लपविती. ॥ ७५ ॥ तेव्हां भार्गवाचे पूर्वज । भार्गवासी म्हणती, 'युद्धकाज । भीष्मासीं न करीं तुज । जय प्राप्त नव्हे कधीं'. ॥ ७६ ॥ भीष्म बाण सोडूं पाहात । तों नारद आला असे तेथ । भीष्माचा धरिला हस्त । अकस्मात ते क्षणीं. ॥ ७७ ॥ म्हणे 'भीष्मा! करिसी काये? । भार्गव तुझा गुरु होये । असतां निर्वाण अस्त्र पाहें । गुरुवरी सहसा न टाकीं.' ॥ ७८ ॥ मग भीष्में आवरिलें अस्त्र । पूर्वजवचनें, भार्गव नेत्र । क्रोधें रक्तवर्ण करोनी वक्र । शापशस्त्र मोकळी. ॥ ७९ ॥ म्हणे 'भीष्मा! इच्या हस्तें । मृत्यु पावसील निश्चितें.' । भार्गव म्हणे 'अंबे ! समरातें । जयही नाहीं मजला पैं.' ॥ ८० ॥ मग उद्विग्नमनें अंबा तेथ । शोक करी अत्यद्भुत । तेव्हां निश्चय करोनी जात । तपश्चर्ये महावनीं. ॥ ८१ ॥ बहुकाळपर्यंत तपश्चर्या । करितां गंगातीरठायां । तेव्हां जान्हवी येऊनियां ।

प्रत्यक्ष अनुवादे अंबेतें. ॥ ८२ ॥ म्हणे, 'किमर्थ येथें सुंदरी । तपश्चर्या करिसी निर्धारीं? । सांग.' म्हणतां ते अवसरीं । अंबा बोले तिजप्रती. ॥ ८३ ॥ 'भीष्महनन माझेनि हातें । व्हावें म्हणुनी तप निश्चितें । करितें बहुकाळ मी येथें.' । ऐकोनि गंगेतें कोप आला. ॥ ८४ ॥ म्हणे 'एक माझा नंदन । त्यासी करूं भावीसी हनन । तरी घेई कां शापवचन । एक तपपर्यंत निर्दये! ॥ ८५ ॥ महाभयंकर होईं ओहळ । षण्मास जळ, षण्मास निर्जळ । महाभयंकर होसी तत्काळ.'। म्हणोनी गुप्त झाली गंगा. ॥ ८६ ॥ द्वादशवर्षें भयानक नदी । भोगिले तिणें शापशब्दीं । मग ते पूर्वरूप पावोनी तधीं । तपश्चर्या आचरत. ॥ ८७ ॥ यापरी तिणें तया क्षणीं । विफळ मनोरथ जाणोनी । देह टाकी, चेतवोनी अग्नी । परी भार्गववरें न जळे पैं. ॥ ८८ ॥ तेव्हां अग्नी तीतें रक्षीत । कांहीं काळें वर्तलेंसे अद्भुत । द्रोणदुःखें द्रुपद जात। यांजक उपाध्याया शरण. ॥ ८९ ॥ द्रोणहननाच्या मिसें । यज्ञ आरंभिला परियेसें । यज्ञवेदी-पासोनी विशेषें । पुत्र, कन्या पैं झाली. ॥ ९० ॥ द्रौपदी आणि धृष्टद्युम्न । तेथ झाले पैं निर्माण । तैसेंची शिखंडी उत्पन्न । संतोषोन अग्न देतसे. ॥९१॥ द्रुपदामनीं आल्हाद थोर । आशीर्वाद देती ऋषीश्वर । तेव्हां अशरीरिणी वदे गंभीर । द्रुपदासी 'सादर ऐक' म्हणे. ॥ ९२ ॥ म्हणे 'तिघें झालीं निर्माण । ऋषिकृपें यज्ञवेदीपासोन । ऐक त्यांचें गुणनामकरण । सभाग्य पूर्ण तूं राया! ॥ ९३ ॥ धृष्टद्युम्न वधील द्रोणा । द्रौपदी वरील पंडुनंदना । शिखंडीहस्तें गंगानंदना । मृत्यु, जाण भविष्य असें.' ॥ ९४ ॥ तैसें बोलोनी ते क्षणीं । तटस्थ झाली पैं अशरीरिणी । द्रुपद अंतरीं आल्हादोनी । गौरविले ऋषी मानीं धनीं. ॥ ९५ ॥ वैशंपायन म्हणे राजयातें । 'शिखंडीजन्म कथिलें तूतें । आणि भीष्म भार्गवातें । वैरही निश्चितें कथिलें. ॥ ९६ ॥ तुझिया प्रश्ननिमित्तेंकरून । पुन्हा कथिलें तुजलागोन । आदिपर्वीं हें पूर्वकथन । केलें असे तुज राया! ॥ ९७ ॥ असो पुढें भीष्मशरपंजर । राया! ऐकें हो-उनी सादर । दाहावा दिन प्राप्त झाल्यावर। घडला विचार, तो ऐकें. ॥ ९८॥ सूर्योदयीं स्वधर्माचार । सत्कर्में सारोनी सकळ वीर । गर्जीत वाद्यगजरें सत्वर । सेना पातल्या कुरुक्षेत्रीं. ॥ ९९ ॥ मार्गशीर्ष कृष्णसप्तमी । दानें देउनी द्विजा नेमीं । युद्धासी पातला पराक्रमी । भीष्माचार्य प्रतापें. ॥ १०० ॥ सकळ परि-वारें वेष्टित । बावीस माहारथियांसमवेत । वाद्यें वाजवोनी अत्यद्भुत । भाट बि-रुदें वानिती. ॥ १०१ ॥ नव दिवस युद्ध होउन । सैन्यासी गणिलें असे

---

१. सर्वसंग्रहपाठः—याजउपजायाजा. २. आकाशवाणी.

जाण । तीन अक्षौहिणी **पांडवसैन्य** । मृत्यु पावलें, जाण राया! ॥ १०२ ॥ पांच अक्षौहिणी **कौरवांचें** । मेलें, म्हणे **संजय** वाचे । एवं आठ अक्षौहिणी साचें । दोहीं दळींचें नासलें. ॥ १०३ ॥ राहिलें तें सकळही सैन्य । घेऊनि पातले **कौरवगण** । **भीष्माचार्यासी** पुढें करून । रणांगणासी पैं आले.॥१०४॥ **पांडवीं** नमुनी **श्रीकृष्णचरण** । 'तूं मायपिता, गोतगण । तुझेन आम्ही सुख-संपन्न । तूंचि जीवन जीवांचें.' ॥ १०५ ॥ सव्य घालोनी प्रदक्षिणा । सेना पातली समरांगणा । **नंदिघोक** रथ ते क्षणा । हय जुंपित **श्रीधर.** ॥ १०६ ॥ वरी चढोनी **लक्ष्मीवर** । कर देउनी रथीं सत्वर । पार्थासी चढविला उपर । लोटिला रहंवर अतिवेगीं. ॥ १०७ ॥ धन्य धन्य **पांडव** देखा । भाग्य न वर्णवे **सहस्रमुखा**[1] । **पार्थरथीं द्वारकानायका** । सारथ्यपणें मिरवे कीं. ॥१०८॥ आपुलिया दासांचें नीच कर्म । स्वयें करीत **पुरुषोत्तम** । आळस टाकोनी परम । हेरिखें[2] करीत निजांगें. ॥ १०९ ॥ जो **शेषशाई आदिनारायण** । तो स्वहस्तीं आकळी हैयगुण[3] । जो **पूर्णब्रह्म अनादी निर्गुण** । तोची सगुण **पार्थ**-सारथी. ॥ ११० ॥ जो **शुकसनकादिकां** ध्यान । **शिव, विरंची** ध्याती जया-लागुन । जो **रुक्मिणीहृदयाब्जनिधान** । तो **आनंदघन पार्थरथीं.** ॥ १११ ॥ हय हांकीत समरभूमीसीं । सेनाभार चालतां नभासी । धूळी भरली, तेणें सूर्यासी । पाहातां किरणें न दिसे. ॥ ११२ ॥ **शिखंडीसी** पुढें करून । वेगें निघाले **पंडुनंदन** । **द्रुपद, पांचाळ, धृष्टद्युम्न** । रक्षिती सर्वही पाठीसी.॥११३॥ मांडिलें थोर युद्धकदन । **शिखंडी**, 'करीन' म्हणे '**भीष्महनन**' । वाद्यें वाजविती गजरेंकरून । नाद गगनीं न समाय. ॥ ११४ ॥ [illegible] । क-रिते झाले **पंडुकुमर** । [illegible] ॥ ११५ ॥ [illegible] लावती **पंडुनंदन** । **शिखंडी** म्हणे [illegible]लागुन । 'आजीं मारीन तुजला रणीं.' ॥ ११६ ॥ **भीष्म** नेदीत प्रत्यु-त्तर । त्यावरी न टाकी कदा शर । **शिखंडीस** म्हणे पार्थ वीर । 'तुझे पाठीस मी आहें. ॥ ११७ ॥ सर्व **कौरव** मी आवरीन । तूं घालीं **भीष्मावरी** तीव्र बाण । आजीं सोडूं नको जाण । जीवेंसीं प्राण घे त्याचा.' ॥ ११८ ॥ तंव येरीकडे **गंगानंदन** । पाडीत शरांचा पर्जन्य । **गंगात्मजें** हाक देवोन । दोनी दळें गाजविलीं. ॥ ११९ ॥ दाहासहस्र कुंजर । लक्ष पायदळ भयंकर । इतुक्यांचा **भीष्में** संहार । करितां हाहाकार **पांडवदळीं.** ॥ १२० ॥ ठाईं ठाईं युद्ध मांडलें । **कौरववीर** सर्वही गोविले । महा अपशकुन तये वेळे । **भी**-

---

१. शेषाला. २. हर्षानें. ३. घोड्यांच्या दोऱ्या. ४. हस्तकौशल्य, हाताची चपळाई.

ष्मालागीं जाणविती. ॥ १२१ ॥ पार्थ म्हणे शिखंडीलागुन । 'भय न धरीं, वेगीं सोडीं बाण । आम्ही सर्वही मिळून । तुज भोंवते संरक्षूं.' ॥ १२२ ॥ दुर्योधनाचीं दैवतें रडती । सिंहासनासमोरें बोभाती । वातघातें मोडोनी क्षितीं । छत्र दुर्योधनाचें पडलें. ॥ १२३ ॥ दुःशासन पाहे मुंकुर । त्यांत न दिसे आपुलें शिर । दुर्योधनाच्या वोखटें घरावर । अंपवित्र दिवसा घूं घूं करी. ॥ १२४ ॥ दुर्योधनाच्या स्त्रिया स्वप्न । देखती विधवा स्त्रिया येऊन । मृत्तिका रक्षा हस्तीं घेऊन । ओंटी भरिती आग्रहें. ॥ १२५ ॥ मंगळदायक दिव्य शकुन । धर्मासी दाविती जय कल्याण । असो भीष्मावरी शिखंडी बाण । क्रोधें टाकीत अतिवेगें. ॥ १२६ ॥ महाप्रळय भीष्म करी । पांडवदळ तेव्हां संहारी । 'धर्मा ! ऐक' म्हणे ते अवसरीं । देवव्रत बोलतसे. ॥ १२७ ॥ 'हे मी शर टाकीन जाण । अच्युतपदाप्रती जाईन । तुम्ही अवघे वीर मिळोन । मजवरी शर टाकावे.' ॥ १२८ ॥ शिखंडी टाकीत बाण । उगाच सोसीत गंगानंदन । त्यासी आडुनी अर्जुन । तीक्ष्ण मार्गण मोकळीत. ॥ १२९ ॥ पांडवदळींचीं रितीं वाहनें । बहुत केलीं गंगानंदनें । न थारत भीष्माचिया भेणें । वीर पळती दशदिशा. ॥ १३० ॥ शिखंडीचे हैंळवार बाण । लागतां हांसे गंगानंदन । मग दिव्यास्त्र महादारुण । भीष्में बाणीं स्थापिलें. ॥१३१॥ तें अस्त्र देखोनी गहन । शिखंडीआड लपे अर्जुन । मग देवव्रतें आवरून । निजस्थानीं ठेविलें. ॥ १३२ ॥ कल्पांतींचा भास्कर । तैसा दिसे गंगाकुमर । मग पार्थे टाकुनी तीव्रशर । सर्वांगीं तो खिळियेला. ॥ १३३ ॥ भीष्म आं-गींचें कवच पुण्यरूप । गळोनि पडलें आपेंआप । शिखंडी होवोनी सकोप । दहा बाण सोडिले. ॥ १३४ ॥ ते खडतरले भीष्माच्या हृदयीं । सारथी रथ भेदिला ते समयीं । ध्वज घोडे तेही लवलाहीं । शिखंडीनें मारिले. ॥ १३५ ॥ एकाच बाणघायेंकरून । पांच पांडवांचीं शिरें छेदून । क्षणांत टाकणार गंगानं-दन । परी तें मनीं न धरीच पैं. ॥ १३६ ॥ पुढें द्यावया तिळांजळी । एव-ढेच उरतील कुळीं । ऐसें जाणुनी हृदयकमळीं । भीष्म न मारी तयांतें. ॥ १३७ ॥ येतां शिखंडीचे बाण । म्हणे 'हे लागती जैसे तृण । हे पार्थाचे बाण परम तीक्ष्ण । शरीर भेदोनी पुढें जाती. ॥ १३८ ॥ प्रसूतिसमयीं मृं-गेंद्री देखा । पृष्ठी फोडोनी निंघे शावका । तैसे पार्थाचे बाण निःशेखा । भेदूनि जात कंळेवरा. ॥ १३९ ॥ शंतनुरायाचा वर जाण । स्वइच्छेनें पावसी

---

१. आरसा. २. घुबड. ३. बाण. ४. नाजुक, हलके. ५. सिंहीण. सिंहीण वितांना तिचें पोर तिचें पोट किंवा पाठ फोडून बाहेर पडतें, या लोकवादावर येथें कवीचें लक्ष आहे. ६. शरीराला.

मरण । म्हणोनी तो गंगानंदन । अवध्य वीर सर्वांसी. ॥ १४० ॥ तंव अष्टवसु आणि सप्तऋषी । गुप्त आले भीष्मापासीं । म्हणती 'आतां ज्ञानरासी । सीमा युद्धाची कीं झाली. ॥ १४१ ॥ महायोगिया! वीरा! भीष्मा! । आतां चालावें निजधामा । विमानाहोनी सुत्रामा[1] । सुमनसंभार वर्षती.' ॥ १४२ ॥ तों क्रोध आणि मद, मत्सर । भीष्में टाकिला सत्वर । देव करिती जयजयकार । तेव्हां नव शर सोडी शिखंडी. ॥ १४३ ॥ पार्थे वीस टाकिले बाण । परी आनंदरूप गंगानंदन । तंव दहावा दिवस संपूर्ण । झाला, ऐसें पाहिलें. ॥ १४४ ॥ पार्थाच्या रथाकडे पाहून । हृदयीं रेखिलें श्रीकृष्णध्यान । किरीटकुंडलें मंडित वदन । झळकत स्यंदन दिव्य तेजें. ॥ १४५ ॥ कौस्तुभ, अपार वनमाळा । पीतवसन, कटीं मेखळा । चतुर्भुज, घनसांवळा । हृदयीं रेखिला भीष्मदेवें. ॥ १४६ ॥ सूर्यास्तमानीं जाण । भीष्में स्तवन अपार करोन । वारंवार हरिवदन पाहोन । होत आनंदघन रणभूमीं. ॥ १४७ ॥ मग स्मरिला पितृवरदा । मुखीं वर्णीत गुणानुवादा । 'द्वारकाविहारिया! आनंदकंदा! । पांडवरक्षका! कमळेशा' ! ॥ १४८ ॥ ऐसे अनेक गुण आठवून । हरिरूपीं भ्रमरप्राय मन । वारंवार सद्गद होऊन । निहाळीत[2] वदन पुनःपुना. ॥ १४९ ॥ तों सूर्यास अस्तमान झाला । तैसा भीष्म रथाखालीं पडला । शरपंजरीं पहुडला । कंपित झाला भूगोळ तेव्हां. ॥ १५० ॥ सोडावा जों प्राण । तरी थोडें उरलें दक्षिणायन । अंतरिक्षध्वनी झाली पूर्ण । आतांच शरीर सोडूं नको. ॥ १५१ ॥ मग चाप, बाण ते वेळें । भीष्में भूमीवरी ठेविलें । तों महर्षी सर्वही धाविन्नले । भीष्मदर्शन घ्यावया. ॥ १५२ ॥ गुप्तरूपें ऋषी येऊन । भीष्मासी करिती प्रदक्षण । विमानाहोनी देवगण । पुष्पें टाकीत क्षणक्षणा. ॥ १५३ ॥ इकडे कौरवदळीं आकांत । द्रोणाचार्य, शारद्वत[3] । दुर्योधनादी राजे समस्त । शोकार्णवीं बुडाले. ॥ १५४ ॥ वाटे बुडालें समग्र। त्रिभुवनीं पडला आंधार । पांडवदळीं आनंद थोर । वाद्यध्वनी एक घोषें. ॥ १५५ ॥ भीमें मारिली आरोळी । दोनी दळीं गडबड झाली । भीष्मालागीं पांडवदळीं । शोक करिती सर्वही. ॥ १५६ ॥ 'जो भक्तिज्ञानवैराग्ययुक्त । ब्रह्मचारी जैसा शुक, हनुमंत । पुण्यपरायण रणपंडित । ऐसा पुन्हा न होय कीं.' ॥ १५७ ॥ म्हणती, 'जळो हा क्षात्रधर्म । पडला महाराज वीर भीष्म । ज्याचें प्रातःकाळीं घेतां नाम । महापातकें भस्म होती.' ॥ १५८ ॥ चिंताग्नींत आहळला कर्ण । म्हणे 'गेलें भीष्मासारिखें निधान' । दुर्योधन

---

१. इंद्र. २. टक लावून पहात. ३. शरद्वताचा मुलगा, कृपाचार्य.

आणि दुःशासन । अश्रु गळविती अधोवदनें. ॥ १५९ ॥ कौरव पांडव शस्त्रें ठेवुनी । आले भीष्माप्रती ते क्षणीं । पाय मस्तकीं वंदोनी । करिती शोकें प्रदक्षिणा. ॥ १६० ॥ धर्म आणि दुर्योधन । स्फुंदस्फुंदती अधोवदन । नकुल, सहदेव, भीमार्जुन । नेत्रीं जीवन तुंळिती कीं. ॥ १६१ ॥ तेव्हां श्रीकृष्ण दृष्टीसी देखून । करीत वारंवार भीष्म नमन। हरी म्हणे 'तूं धन्य धन्य । जासी उद्धरून देवव्रता ! ॥ १६२ ॥ तुवां जिंकिलें इंद्रियांसी । तूं प्रल्हादासम मज होसी । तूं व्रतस्थांमाजी व्रती असती । धन्य तूं एक वंशीं भारतीं.'॥१६३॥ ऐसा गौरव करून बोलतां । भीष्म म्हणे 'जी दीनानाथा! । समरीं प्राण तुज देखतां । जातां, मोक्ष शाश्वत असे.' ॥ १६४ ॥ शरपंजरीं देवव्रत । परी शिर खालीं लोंबत । म्हणे 'मज उशी द्या रे त्वरित । शिरासी टेंकण येधवां.' ॥ १६५ ॥ उत्तम उशी आणी दुर्योधन । पाहोनि बोले गंगानंदन । म्हणे 'पाहा माझें आंथुरण । उशी आणुन तैशीच द्या.' ॥ १६६ ॥ भीष्में पार्थाकडे पाहोनी । म्हणे 'कृष्णसख्या! मजलागोनी । तूं तरी उशी दे आणुनी । ग्रीवा धरणी लोंबती रे!' ॥ १६७ ॥ मग पार्थें गांडीव चढवून । तीन बाणांची तिकटी करून । क्षणमात्रें शर सोडून । ग्रीवा उचलोन सांवरिली. ॥ १६८ ॥ भीष्म म्हणे 'सुलक्षणा ! अर्जुना! । उत्तम उसी दीधली सुजाणा! । विजयकल्याणवैकुंठराणा । तुजला रक्षू सर्वदाही; ॥ १६९ ॥ स्वसत्ता स्वयें उत्तरायण । तंववरी मी न सोडीं प्राण.' । ऐसें बोलतां गंगानंदन । ऐकोनि धन्य म्हणती सर्व. ॥ १७० ॥ तेव्हां दुर्योधन वैद्य आणीत । पाहोनि हांसे देवव्रत । 'मी समरांगणीं झालों मुक्त । आतां वैद्य कासया पैं?' ॥ १७१ ॥ दोहीं दळींचे नृपवर । भीष्मासी अर्पिती पूजासंभार । प्रदक्षिणादिक नमस्कार । करोनि जाती स्वस्थाना. ॥ १७२ ॥ सकळ प्रजा अठरा याती । भीष्मदेवा येउनी नमिती । गांवोगांवींच्या नर, युवती । पाहों येती महाराज तो. ॥ १७३ ॥ भीष्म होउनी तृषाकांत । कौरवांसी उदक मागत । तंव ते सुगंध उदक आणीत । न घेची देवव्रत तें तेव्हां.॥१७४॥ म्हणे 'बोलावा रे! अर्जुन' । तों उभा ठाकला तो येऊन । म्हणे 'सखया! पाजवीं जीवन' । म्हणतां बाण लावी गुणीं. ॥ १७५ ॥ भीष्मासमीप दक्षिणभाग पाहून । धरणी फोडिली मारोनि बाण । भागीरथीचें दिव्य जीवन । कारंजा तेथें लाविला. ॥ १७६ ॥ धार मुखीं पडतां तात्काळ । तेणें सर्वांग झालें शीतळ । जान्हवीतोय औषधी निर्मळ । दुःख सकळ विसरला. ॥१७७॥

१. तोलून धरिती, दाखविती.

भीष्म म्हणे 'रे पार्था! । अमिततेजगुणभरिता! । श्रीरंगप्रिय! सुभद्राकांता! । धन्य वंश तुझेनीं. ॥ १७८ ॥ दुर्योधन पापेंकरुनी । स्वकुळ टाकिल जाळुनी । तुम्ही पांच पंडुतनय गुणी । भय नाहीं कांहीं तुम्हांतें.' ॥ १७९ ॥ सुयोधनासी म्हणे देवव्रत । 'अजोनी तरी करीं स्वहित । मित्र करोनी पंडुसुत । सुखरूप नांदें का.' ॥ १८० ॥ दुर्योधन दुराचार । सहसा नेदी प्रत्युत्तर । असो मग तो गंगाकुमर । नाममाळाजप करी. ॥ १८१ ॥ तेव्हां अर्जुनाचें स्तवन । राजे करिती अवघे जण । भयें आणि आश्चर्येंकरून । कौरव तेव्हां कोंदले. ॥ १८२ ॥ असो यावरी तो महाराज कर्ण । पहावया आला भीष्मालागून । कंठ दाटला नेत्रीं जीवन । म्हणे 'तुजसीं स्पर्धा वाढविली.' ॥१८३॥ मग डोळे उघडोनी देवव्रत । कर्णासी करें कुरवाळीत । 'तूं मज भेटलासी येउनी येथ । इतुकेन तृप्त झालों मी. ॥ १८४ ॥ मज नारदें सांगितलें येउनी । कुंतीपुत्र तूं सूर्यवीर्येंकरुनी । तूं नीचाश्रयें निंदिसी वदनीं । भगवद्भक्तां पांडवां. ॥ १८५ ॥ येरवीं तुजसारिखा पवित्र । उदार सगुण गुणगंभीर । तूं महाराज प्रतापसमुद्र । प्रतिअर्जुन दुसरा पैं. ॥ १८६ ॥ तरी तूं पांडवांकडे जायीं.' । कर्ण म्हणे 'न घडे काळत्रयीं । मज हें वर्तमान सर्वही । पूर्वींच श्रीकृष्णें श्रुत केलें. ॥ १८७ ॥ पांडवां सांभाळी द्वारकानायक । तैसा मी कौरवांचा रक्षक । आम्हां क्षत्रियांचें भाग्य देख । समरांगणीं पडावें पैं. ॥ १८८ ॥ आतां पांडवांतें जिंकीन । कीं समरांगणीं देईन प्राण । माझे अपराध भीष्मा पूर्ण । क्षमा करीं आतां यावरी.' ॥ १८९ ॥ मग नमुनी भीष्मचरण । स्वस्थळा गेला उदार कर्ण । तैसेचि कौरव संपूर्ण । स्वशिबिरातें पैं गेले. ॥ १९० ॥ मग तो श्रीकृष्ण द्वारकावासी । भीष्मासी म्हणे हृषीकेशी । 'शिष्यावीण[1] गती कोणासी । नाहीं, तरी वचन ऐक. ॥ १९१ ॥ तुजप्रती मंत्रास्त्रविद्या आहे । ती पार्थासी अर्पीं पाहें । सच्छिष्य अर्जुन नरावतार हें । म्हणोनि सांगणें तुज वेदमतें.' ॥ १९२ ॥ ऐसें बोलतां श्रीकृष्णरायें । मग पार्थासी बोलाविलें भीष्माचार्यें । मंत्रास्त्रविद्या सर्व पाहें । अर्जुनातें दिधली. ॥ १९३ ॥ भीष्म[2] म्हणे श्रीकृष्णातें । 'त्वां अंगीकारिलें पांडवांतें । तरी राज्यीं स्थापिल्या धर्मातें । त्याहस्तें क्रिया करवीं माझी. ॥ १९४ ॥ धर्मराज तो माझा प्राण । कीं धर्ममार्गें याचें वर्तन । तूं कौरवांचें करिसी हनन । तें वर्म गहन मी जाणें. ॥ १९५ ॥ युधिष्ठिरप्रतिष्ठापन । साधूंचें करिसी प्रतिपालन । अवतरलासी मधुसूदन । दुष्टदंडन करावया.' ॥ १९६ ॥ ऐसी ऐकोनी

---

१. हें भाषण मुळांत नाहीं. २. हें भाषण मुळांत येथें नाहीं.

भीष्मस्तुती । प्रसन्न झाला लक्ष्मीपती । म्हणे 'भीष्मा! घेई वरदोक्ती । अक्षय मुक्ती तुज होऊ.' ॥१९७॥ भीष्म ह्मणे 'कमलापती! । त्वां वर दिधला मजप्रती। तरी पूर्वी कोणासी जाळिली क्षिती । मज तेथें यदुपती जाळूं नको.' ॥१९८॥ 'बरवें' म्हणोनी जनार्दन । भीष्मासी दिधलें भाकदान । हें पुढां सांगिजेल तुजलागोन । शांतिपर्वी जाण राया! ॥ १९९ ॥ भीष्मस्तवराज[1], अनुस्मृती[2] । सहस्रनाम[3], धर्मनीती[4] । धर्मभीष्मसंवादोक्ती । शांतिपर्वी सर्वेही कथिजेल. ॥ २०० ॥ भक्तांमाजी भक्त परम । भागवतीं जयाचें नाम । जयामुखींचें सहस्रनाम । पठन करितां जन उद्धरती. ॥ २०१ ॥ व्रतियांमाजी श्रेष्ठ व्रती । ब्रह्मचर्य चालविलें नृपतीं । ऐकतां परमाश्चर्य चित्तीं । करीत भूपती जन्मेजय ॥ २०२ ॥ 'शूरांमाजी समर्थ शूर । तो हा भीष्म' म्हणे व्यास योगींद्र । 'नैराश्य[5] भागवतीं प्रियकर । वचन यदुवीर पाळी ज्याचें.' ॥ २०३ ॥ संजय म्हणे धृतराष्ट्रासी । 'आजीं पडला भीष्म रणासी । पूर्ण पराक्रमी कौरवांसी । ज्याणें दश दिन रक्षिलें.' ॥ २०४ ॥ ऐकतां संजयाची वाणी । प्रज्ञाचक्षु शोक करी ते क्षणीं । गांधारीही म्हणे आक्रोशोनी । 'न वांचती कोणी पुत्र माझे.' ॥ २०५ ॥ धृतराष्ट्र गांधारी करिती शोक । म्हणती 'भीष्माऐसा गेला देख। याहीहुनी काय काय आणिक । देखणें आम्हांसी, नेणों कीं. ॥ २०६ ॥ शोक

---

१. शरपंजरीं खिळलेल्या भीष्मानें जी भगवत्स्तुति केली, तिला भीष्मस्तवराज असें म्हणतात. हा स्तवराज शांतिपर्वातील राजधर्मांच्या ४७ व्या अध्यायांत आहे. २. हें विष्णुस्तुतिविषयक प्रकरण अनुशासनपर्वांत दानधर्मांत आलें आहे. ३. हें विष्णुसहस्रनाम होय. हें अनुशासनपर्वात दानधर्मांच्या १४९ व्या अध्यायांत आहे. स्तवराज, अनुस्मृति व विष्णुसहस्रनाम या प्रकरणांचा समावेश पंचरत्नगीतेंत होतो. येथें एक गोष्ट लक्ष्यांत घेण्यासारखी आहे, ती ही कीं अनुस्मृति व विष्णुसहस्रनाम हीं दोन्हीं प्रकरणें अनुशासनपर्वांतील असून तीं येथें शांतिपर्वांत आहेत, असें म्हटलें आहे. यावरून अनुशासनपर्व स्वतंत्र न गणितां, शुभानंद त्याचा शांतिपर्वांत अंतर्भाव करितात हें उघड आहे. आमच्या जवळील एका संस्कृत भारती पोथींतही दानधर्म हें प्रकरण अनुशासन पर्वांतील न समजतां शांतिपर्वांतीलच गणिलें आहे. कारण त्या पोथीच्या मुखपृष्ठावर व आंतही मुख्यमुख्य अध्याय किंवा आख्यानें यांच्या समाप्तीच्या वेळीं 'शांतौ दानधर्मः' असे शब्द आहेत. ही व्यवस्था एका दृष्टीनें सयुक्तिकही आहे, कारण भीष्मानें धर्माला राजधर्म, आपद्धर्म, मोक्षधर्म व दानधर्म यांचा उपदेश केला आहे, तेव्हां या सर्वांचा समावेश एके ठिकाणीं एका पर्वांतच होणें साहजिक दिसतें. मुक्तेश्वरांनींही शांतिपर्व व अनुशासनपर्व हीं दोन्हीं पर्वें मिळून एक पर्व गणलें असावें, अशी शंका घेण्यास पुष्कळ जागा आहे. यासंबंधें मुक्तेश्वरकृत आदिपर्व, ओव्या ११६–११८ व काव्यसंग्रहांतील मोरोपंती शांतिपर्वाच्या प्रस्तावनेंतील टीप पहा. ४. राजधर्म, आपद्धर्म, मोक्षधर्म व दानधर्म यांचा उपदेश. ५. निराशपण, निरिच्छपणा, कामनारहितत्व.

करावया सर्वार्थी । आम्ही वांचलोंसे निश्चितीं । यदर्थी सांडोनी गेली सत्यवती । बद्रिकाश्रमीं स्नुषांसहित.' ॥ २०७ ॥ ऐसियापरी करितां शोक । मग विदुर संजय म्हणती 'देख । राया! नश्वर सर्वही लोक । यया मृत्युभुवनीं सत्य पैं. ॥ २०८ ॥ आणि सर्वांसीं जन्ममरण । वारंवार होतसे जाण । ऐसियासी तूं विचक्षण । राया! शोक किमर्थ करिसी? ॥ २०९ ॥ भीष्में पराक्रमें जिंकिले शूर । आणि श्रीकृष्णासी केला चक्रधर । ऐसा पराक्रम केल्यावर । मरतां सत्वर मुक्ती होय. ॥ २१० ॥ ऐसा क्षत्रियांसी रणांगणीं । बोलिला धर्म म्हणोनी । धर्मयुद्धीं गंगानंदन हानी । पावतां, मृत्यु तो नव्हे.' ॥ २११ ॥ययापरी अनेकदृष्टांतें । संबोखिलें धृतराष्ट्रगांधारीतें । येथोनी भीष्मपर्व निश्चितें । संपूर्ण म्हणे संजय. ॥ २१२ ॥ जन्मेजयासि म्हणे वैशंपायन । शरपंजरीं पडला गंगानंदन । रात्री होतांचि, बोलिला वचन । श्रीकृष्णासमवेत तेधवां. ॥ २१३ ॥ म्हणे 'सर्वही श्रवण करा । आतां दक्षिणायन होय जों पुरा । तों काळ प्राण न सोडीं निर्धारा । पाहेन युद्धासी सकळांच्या. ॥ २१४ ॥ इतकियांत उत्तरायण । होईल, तेव्हां सोडीन प्राण । हरिइच्छे मुक्तीस जाईन । पुढें जनार्दन भेटतां. ॥ २१५ ॥ आतां करितों मी हरिस्मरण । मज विक्षेप न करावा म्हणून ।' ऐकतां मग पांडुनंदन । स्थाणुकेश्वरीं रक्षिला. ॥ २१६ ॥ गूढ स्थान निर्मोनि ते क्षणीं । भीष्म रक्षिला तया स्थानीं । रक्षक विचक्षण ठेवोनी । गेले स्वस्थानीं पांडव. ॥ २१७ ॥ वारंवार समाचार घेती । पंडुनंदन तया[1] क्षितीं । ऐसें क्षणक्षणीं येउनी प्रीतीं । जाण भेटती भीष्मासी. ॥ २१८ ॥ येथोनी भीष्मपर्वसमाप्ती । झाली जन्मेजया नृपती! । नैमिषारण्यीं ऋषींप्रती । सूत सांगे कथा हे. ॥ २१९ ॥ ऐकशत चारी[2] अध्याय । यया भीष्मपर्वाचे होय । ते हे तेतीस अध्यायीं अन्वय । भावार्थें भावार्थ काढिला. ॥ २२० ॥ पुढां[3] लागलें द्रोणपर्व । येथोनी

१. त्या ठिकाणीं. २. संस्कृत भारताच्या छापील पोथींत भीष्मपर्वाचे एकशें बावीस (१२२) अध्याय आहेत. ३. आमच्या जवळील भीष्मपर्वाच्या हस्तलिखित प्रतींतील उपसंहारात्मक ओव्या येथील ओव्यांहून अगदीं भिन्न आहेत. परंतु त्या महत्वाच्या असल्यामुळें येथें सबंध देत आहों:—तें द्रोणपर्वींचें कथन । पुढां ऐकोत सज्जन । सुबानंतें केलें नमन । संत श्रोतेयां आवडीं. ॥ सद्गुरुविश्वंभरकृपा गहन । यालागीं संतसभे आला दीन । कथिलें श्रीकृष्णलीलाकथन । भारत गहन त्रैलोक्यीं. ॥ तयामाजी भीष्मपर्व । आत्मज्ञान अपूर्व । पुढां द्रोणपर्व, परिसा सर्व । नाटकलीला हरीची. ॥ सौराष्ट्र देशामाजारीं । गोकर्णपंचक्रोशाभीतरीं । शके सोळाशें अठ्ठायशीं उपरी । मास सप्त लोटले. ॥ अंकवला नाम पुरी । कौंडण्यगोत्री पिकला नाम उपधारी । संतकृपेनें साचारीं । पक्क संसारीं जाहलों. ॥ श्रीमांगीशकुळदेवकृपा । होतां, प्रकाश झाला ज्ञानदीपा । गेल्या जन्ममरणखेपा । संसारतापातीत झाला. ॥ बोर्यकारभारकरनंदिनी ।

संपलें **भी**ष्मपर्व ! जे होय अपूर्वा अपूर्व । सात्विक अनुभव जाणती. ॥२२१॥ हें पर्व वाचितां, श्रवण करितां । शत्रुक्षय होती तत्वता । संपत्ती, संतती, श्रवणीं आर्तता । अंतीं सायुज्यता प्राप्त होय. ॥ २२२ ॥ ब्राह्मणासी विद्या प्राप्त । क्षत्रिया आगळें शूरत्व । वैश्यासी धन अद्भुत । इच्छिलें पावत शूद्रही. ॥२२३॥ श्रवणें होय रोगहरण । स्त्रियांसीं सौभाग्य संपूर्ण । ऐसें बोलिला **वै**शंपायन । महासत्कारण पर्व हें. ॥ २२४ ॥ प्रभु**वि**श्वंभरप्रसादें । श्रवणेंद्रियां निघती दोंदें । **शु**भानंद प्रेमानंदें । संतचरणीं विनटला. ॥ २२५ ॥ इति श्रीमन्**म**हाभारते । **भी**ष्मपर्व सभाग्य श्रोते । **व्या**सोक्त ऐकतां, निश्चितें । तरती श्रोते संसारभव. ॥ २२६ ॥



---

ते **अ**नंत**मां**गरीशधर्मपत्नी । **जा**नकी या नामें जननी । तिचे गर्भी देहजन्म. ॥ यालागीं **सु**बानंतासी । माता **जा**नकी निश्चयेंसीं । **ह**रिनामध्वज उभविला वंशीं । सद्गुरु**वि**श्वंभरप्रसादें. ॥ हें महाभारत महदाख्यान । कथा भीष्मपर्व पुण्य पावन । श्रवण पठणें प्राप्त विष्णुपदभुवन । कृपा पूर्ण गुरूची. ॥ **व्यय**संवत्सर, आश्वीनमासीं । मंदवार, शुद्ध प्रतिपदे दिवशीं । पूर्ण केलें भीष्मपर्वासी । देवालयीं कलशाच्या. ॥ संतश्रोतेयां नमस्कार । मी अनाथ तुमचा किंकर । कांहीं न्यूनाधिक अक्षर । झालेया क्षमा करा. ॥ धर्म, अर्थ, काम, मोक्ष । कथा श्रवणें प्रत्यक्ष । जैसें पूर्णब्रह्म भेटलें पार्थास । तैसाचि भेटेल श्रोतेयां. ॥ नाना तीर्थीं क्षाळितां काया । वरील मळ जाईल लया । मनोमळ जळस्नानें विलया । सर्वथाही न जाय. ॥ तरी भारतकथाश्रवण । होय संसारमळनाशन । ऐसें व्यासऋषीचें वचन । विस्तारेंसीं बोलिलों. ॥ भारतस्य समुद्रस्य । ऐसें व्यासवाक्य प्रत्यक्ष । मिती नाहीं समुद्रजळास । तैसें पुण्य भारत ऐकतां. ॥ आश्रम, याग, तप, दान, तीर्थ । तया पुण्यासी होय गणित । परि भारतश्रवणें अगणित । स्वयें भगवंत बोलिला. ॥ अठरा पुराणीं भारत नाहीं । हा केवळ वेद म्हणवी, पाहीं । जेथ ज्ञानोपदेश स्वमुखें शेषशायी । कृष्ण करी पार्थातें. । ऐसी भारतमहिमा वर्णितां । शेषासही अंत न लागे सर्वथा । **सु**बानंत चरण वंदी संता । सभाग्य श्रोते यांचे आवडीं. ॥ इति श्रीमन्महाभारते भीष्मपर्वणि प्राकृतटीकायां एकत्रिंशत्तमोध्यायः. ॥

# (१) शुभानंदकृत भीष्मपर्वांतील
# शुद्धाशुद्ध, पाठभेद, अधिक टीपा वगैरेंचें परिशिष्ट.

| पृष्ठ. | पद्य. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|
| १ | टी. २ | ही टीप चुकीची आहे, कारण हे श्रीधरस्वामी भागवतटीकाकार होत. रामविजय, हरिविजय इत्यादि प्राकृतग्रंथांचे कर्ते नाझरेकर श्रीधर नव्हत–कांकीं (१) शुभानंदानीं ११ वे ओवींत संस्कृतग्रंथकारांचीं नांवें देऊन १२।१३।१४ या ओव्यांत प्राकृतग्रंथकारांचीं नांवें दिलीं आहेत. तेव्हां ११ व्या ओवींत प्राकृत कवि श्रीधर यांचा एकव्याचा उल्लेख होणें संभवनीय नाहीं. (२) शिवाय 'टीका चतुर जयाची' हें विधान प्राकृतकवि पांडवप्रतापकार श्रीधर यांस लागू पडतच नाहीं. रामदास, वामनस्वामी, केशवस्वामी, शिवरामस्वामी या संतांचीं नांवें आलीं आहेत, यावरून शुभानंद यांच्या मागूनचे असले पाहिजेत, परंतु ते प्राकृतकवि जो श्रीधर त्याच्या मागून झाले, असें या ओवीवरून म्हणतां येत नाहीं. |
| ३ | ४५ | 'पीतवास' याऐवजीं 'परिपिता' हा योग्य पाठ. |
| ५ | ७५ | 'विषोदक' ऐवजीं 'विषमोदक' वाचावें. |
| ६ | टी. १ | ही टीप सर्वसंग्रहांतील टीपेप्रमाणेंच दिली आहे. पण ती चुकीची आहे. 'गुरूदरजांचे' याचे ऐवजीं 'गरोदर ज्याचे' असा योग्य पाठ. सबंध ओवी:–गरोदर ज्याचे मंदिरीं । तेथेंचि असावी हे सुंदरी । प्रसूत झालिया, दुजे मंदिरीं । जावें तिणें ममाज्ञे. ॥ |
| ८ | ५० | 'चंडू' याऐवजीं 'चेंडु' वाचावें. |
| १० | १४ | 'तीनीं' ऐवजीं 'तीन्ही' पाहिजे. |
| ११ | ३० | मकर=कसब, कपट, कौंडळ. हा शब्द आरबी भाषेंतील आहे. |
| १२ | ४५ | 'अवघे' याऐवजीं 'आघवे' पाहिजे. कारण या ओवींत 'वे'चें यमक आहे. |
| ,, | ५६ | 'शिष्य' येथें 'संजय' हा अन्यपाठ. |
| १४ | ३ | 'मातापिता' याऐवजीं 'कुंती माता' हा पाठ अधिक योग्य आहे, कारण या वेळीं पांडु जीवंत नव्हता. |
| १६ | ३३ | 'वाढितां तिथी' याऐवजीं 'वाढितसां' असाही पाठ आहे. |
| १७ | ४३ | 'नये' ऐवजीं 'न यें' वाचावें. |
| ,, | ५९ | 'खकु (?)' याऐवजीं 'खड्ग' पाहिजे. |
| २० | १०४ | 'कराव्या' ऐवजीं 'करावा' वाचावें. राहिला कथार्थ करावा=बाकीची कथा सांगावी किंवा ऐकावी. |

| पृष्ठ. | पद्य. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|
| २२ | २१ | **'तांब्र** अनामा' याऐवजीं **'ताम्रनामा'** हा योग्य पाठ. |
| २७ | ३९ | 'राज्यभोग सुखें' बद्दल 'राज्यभोगसुखें' वाचावें. हरिखें=हर्षानें, आनंदानें. |
| ४४ | ५ | 'ठाकितां' ऐवशीं 'टाकितां' हा योग्य पाठ. 'सांडितां' असा पाठभेद. |
| ७३ | ९ | **'सुघोषम**णिपुष्पक' याऐवजीं **'सु**घोष, **म**णिपुष्पक' असें पाहिजे. |
| ,, | १२ | **'र**मा कीं उमावर' यांतील 'वर' शब्दाचा संबंध 'रमा' या शब्दाकडेही आहे. ही रचना लक्ष्यांत ठेविण्यासारखी आहे. इंग्रजींतही अशी रचना आढळते; उदा० His father-and mother-in-law. |
| ७४ | २६ | 'अग्निगर्भीं' याऐवजीं 'अग्निगर्भी' असा निरनुस्वार पाठ अधिक चांगला; कारण धृष्टद्युम्न हा अग्निप्रसादानें यज्ञकुंडांतून झालेला होता. |
| ,, | ३४ | 'वीजूशीं' यांत 'वीज' याची प्रथमा 'विजू' करून, मग तृतीयेचा प्रत्यय 'शीं' लाविला आहे. |
| ७६ | १८ | कृष्ण=अर्जुन. |
| ७७ | ३७ | 'हरी!' याऐवजीं 'हरी' पाहिजे. हरी=हरीकडून. |
| ७८ | ३९ | 'तव' बद्दल 'तंव' पाहिजे. |
| ,, | ४१ | वनें=वनांत. हा सप्तम्यर्थीं तृतीयेचा प्रयोग आहे. |
| ,, | ५६ | **पां**डव ते **पं**डूचे पुत्र । धर्मभीमादी पैं ॥ **याऐवजीं अन्यपाठ—पांडव** पांचही पवित्र । **पंडुपुत्र धर्मा[illegible]** ॥ |
| ८१ | ३१ | 'तेणें' ऐवजीं 'येरें' असा पाठभेद. 'तेणें पर्वतास्त्र सोडिलें' याऐवजीं 'तों येर स्मरे पर्वतास्त्र' असा पाठभेद. |
| ,, | ४२ | 'टाकिले'बद्दल अन्यपाठ 'ढाळिले.' |
| ,, | ४३ | 'तया अवसरीं' याऐवजीं अन्यपाठ 'तयासरी.' |
| ८२ | ४४ | 'पंडुतनुजु' याऐवजीं अन्यपाठ 'माद्रीतनुजु.' हाच पाठ अधिक चांगला आहे. कारण येथें सहदेवाचा संबंध आहे. |
| ,, | ४७ | 'तयाची' ऐवजीं 'आतां माझी' असा अन्यपाठ. |
| ,, | ,, | 'अठरावा' ऐवजीं 'सतरावा' असा अन्यपाठ. 'सतरावा' हा पाठ अधिक चांगला आहे, कारण दुःशासन खरोखर १७व्या दिवशींच मारला गेला होता. |
| ,, | ५२ | 'सात'ऐवजीं 'शत' असा अन्यपाठ. |
| ,, | ५५ | 'आसपास' ऐवजीं अन्यपाठ 'असमहास.' |
| ,, | ५९ | 'उसळती' ऐवजीं अन्यपाठ 'तुटती.' |
| ,, | ६३ | 'रणकंदळ' ऐवजीं 'रणखंदळ' असा अन्यपाठ. |

| पृष्ठ. | पद्य. | स्पष्टीकरण. |
|---|---|---|
| ८३ | | ६७ व ६८ या ओव्यांचा क्रम एका हस्तलिखित पोथींत उलट आहे; व तसा क्रमच अर्थाशीं सुसंगत दिसतो. |
| ,, | ८० | 'आपटी' ऐवजीं अन्यपाठ 'आफळी.' |
| ,, | ८१ | 'तया' ऐवजीं 'यया' असा अन्यपाठ. |
| ८५ | १० | राक्षस पैं कुळें=राक्षसकुळें पैं. ही रचना फारच चमत्कारिक आहे. |
| ,, | १५ | तुम्हीं गेलें=तुम्ही गेलांत. येथील क्रियापदाचें रूप चिन्त्य आहे. |
| ,, | १६ | 'भग' ऐवजीं 'भंग' पाहिजे. |
| ९० | ४६ | उलूकाहातीं पाठविलेला निरोप जसा शुभानंदकृत उद्योगपर्वाच्या ४८ व्या अध्यायांत, तसा या भीष्मपर्वांतही तिसऱ्या अध्यायांत आला आहे. मात्र येथें तो संक्षिप्त रीतीनें दिला आहे. (पृ० १० ओ० ३–१० पहा.) |
| ९७ | ६६ | 'वमन' हा शब्द पुल्लिंगी योजिला आहे. |
| १०१ | ५ | 'तंव' ऐवजीं 'तव' असें निरनुस्वार पाहिजे. |
| १०० | ११७ | निरनिराळ्या ग्रंथांत जे रावणाचे वंशवृक्ष दिले आहे, त्यांत बरोबर मेळ नाहीं. कुबेर हा पुलस्तीचा मुलगा व रावणाचा भाऊ असें वर्णन आढळतें. तेव्हां रावण हा पुलस्तीचा मुलगा ठरतो. परंतु बऱ्याच ग्रंथांतील वंशावळींत तो पुलस्तीचा नातू असें सांगितलें आहे. कांहीं ग्रंथांवरून तो कुबेराचा भाऊ तर कांहींवरून तो त्याचा पुतण्या होतो. भारती रामायणांतील रावणवंशवृक्षावरून पुलस्तीला दोन मुलगे होते, एक विश्रवस् व दुसरा वैश्रवण (=कुबेर) व विश्रवसाचीं मुलें रावणकुंभकर्णादि भावंडें. अध्यात्मरामायणावरून पाहतां पुलस्तीचा मुलगा विश्रवस् व वैश्रवण (=कुबेर), रावण, कुंभकर्ण वगैरे सर्व त्या विश्रवसाचींच मुलें. एकंदरींत मूळांतील 'पौत्र' हा पाठ चूक नसून, सयुक्तिकच आहे. |
| १११ | २२ | दोन्ही पक्ष=दोन्हीं कुळें, मातृकुळ व पितृकुळ. |

## (२) शुभानंदकृत भीष्मपर्वाची
# छापील प्रत व एक हस्तलिखित प्रत यांतील तफावतीचें परिशिष्ट.

| हस्तलिखित पोथी. | | विषय. | छापील प्रत. | | शेरा. |
|---|---|---|---|---|---|
| अध्याय. | ओव्या. | | अध्याय | ओव्या. | |
| १ | १-२० | मंगलाचरण, विषयप्रस्ताव. ... | १ | १-२० | ओव्या एकच. |
| २ | १-३ | जन्मेजयप्रश्न. ... ... ... | १ | २१-२३ | ओव्या एकच. |
| २ | ४-१३ | दुर्योधनाचा गावल्गणीच्या मार्फत धर्मास निरोप. कृष्ण शिष्टाई पतकरतो. ... ... ... | १ | २४-२७ | ओव्या निराळ्या. |
| २ | १४-१०२ | कृष्णाचें विदुरगृहीं उतरणें, कृष्ण-विदुरसंवाद, कृष्णशिष्टाई. ... | ० | ० | |
| २ | १०३-११५ | कृष्णदुर्योधनसंवाद, कृष्णास बांधण्याचा दुर्योधनाचा बेत, दुर्योधनगर्वहरण. ... ... | १ | २८-३० | ओव्या निराळ्या. |
| २ | ११६-१३८ | कृष्णाचा दुर्योधनास उपदेश, दुर्योधनदर्पोक्ति, कृष्णकर्णसंवाद. | ० | ० | |
| ३ | १-२ | जन्मेजयाचा अर्जुनाच्या कपिध्वजत्वाविषयीं प्रश्न, या प्रश्नाबद्दल त्याची स्तुति ... ... | २ | १-२ | ओव्या एकच. |
| ३ | ३-७३ | अर्जुनाच्या कपिध्वजत्वाची पूर्वपीठिका.. ... ... ... | २ | ३-७३ | ओव्या निराळ्या, कथाभाग एकच. |
| ४ | १-९ | कृष्ण धर्माला शिष्टाईची हकीकत सांगतो. ... ... ... | १ | ३१-३३ | ओव्या निराळ्या. |
| ४ | १०-४२ | त्यावर भीमादिकांचें भाषण, युद्धनिश्चय, पांडवपक्षीय राजे. ... | ० | ० | |
| ४ | ४३-४४ | कृष्णाच्या संमतीनें पांडवदळ इंद्रप्रस्थीं येतें. ... ... ... | १ | ३४ | |
| ४ | ४५-४९ | युद्धस्थान ठरवा म्हणून पांडवांचा दुर्योधनास व दुर्योधनाचा पांडवांस निरोप. ... ... | ० | ० | |
| ० | ० | पांडव कुरुक्षेत्रीं आले, हें ऐकून कौरवही दळासह येतात. ... | १ | ३५-४१ | |
| ४ | ५०-६९ | शेतकऱ्याची गोष्ट, युद्धभूमिनिश्चय. | १ | ४२-६१* | *७।८ओव्या मात्र साधारण जुळतात, बाकीच्या भिन्न आहेत. कथाभागांतही जरासा फरक आहे. |

| हस्तलिखित पोथी. | | विषय. | छापील प्रत. | | शेरा. |
|---|---|---|---|---|---|
| अध्याय. | ओव्या. | | अध्याय | ओव्या. | |
| ४ | ७०-७५ | पांडवसैन्यवर्णन. ... ... | ० | ० | |
| ४ | ७६-१३६ | बभ्रीचा इतिहास. ... ... | १ | ६२-९२ | ओव्या निराळ्या, मतलब एक. |
| ० | ० | दुर्योधनाचा पांडवांस उलूकाद्वारों निरोप व त्यास त्यांचें उत्तर. | ३ | १-१२ | |
| ५ | १-२७ | कौरवदळगणना; दुर्योधन कृष्णाचें साहाय्य मागतो; व कृष्णानें शस्त्र न धरण्याची प्रतिज्ञा केली असल्यामुळें, छप्पन्न कोटी यादवांसह बळरामाचें साहाय्य पसंत करितो. | ० | ० | |
| ५ | २८-५७ | बभ्रीचें आगमन व त्याचा भीमहस्तें वध. ... ... ... | ३ | १३-४२ | २।३ओव्या मात्र जुळतात. बाकीच्या भिन्न, पण कथा एकच. |
| ५ | ५८-७१ व ७७-९५ | कृष्णाच्या युक्तीनें बळरामाला ब्राह्मणहत्या घडते व तो पृथ्वीप्रदक्षणेस निघून जातो. ... | ३ | ४३-७६ | निम्मेहून अधिक ओव्या जुळतात. |
| ५ | ७३-७६ | संजयास दिव्यदृष्टिदान. ... | ३ | ७७-८६ | |
| ६ | १-१६ | पांडवांची युद्धार्थ तयारी, कृष्णाच्या अर्जुनसारथ्याविषयीं प्रश्न. | ४ | १-२२ | दोनतीन ओव्या मात्र जुळतात. बाकीच्या भिन्न. |
| ६ | १७-७९ | कृष्णाच्या अर्जुनसारथ्याविषयीं खुलासा. ... ... ... | ४ | २३-१०४ | सुमारें २५ओव्या जुळतात; इतरांत बरेंच शब्दसाम्य आहे; परंतु त्या अक्षरशः मुळींच जुळत नाहींत. |
| ० | ० | कौरवपांडवदळें युद्धास उभीं राहतात, अर्जुनाचा युद्धोत्साह. | ४ | ११५-१२१ | |
| ७ | १-१८ | कौरवदळाचें वर्णन. ... ... | ५ | १-२८ | ओव्या एकच, मात्र छापील प्रतींत १०ओव्या अधिक आहेत. |
| ० | ० | युद्धारंभींचें भीष्मभाषण, युयुत्सूचें पांडवांकडे येणें, कौरवांस अपशकुन.... ... | ३ | २९-६१ | |

| हस्तलिखित पोथी. | | विषय. | छापील प्रत. | | शेरा. |
|---|---|---|---|---|---|
| अध्याय. | ओव्या. | | अध्याय. | ओव्या. | |
| २५ | १-१४ | अर्जुनकृतदुर्गास्तव, दुर्गादर्शन, वरप्रदान. ... ... ... | ५ | ६२-६८ | ओव्या निराळया. |
| ० | ० | युद्धारंभ, गीताप्रस्ताव.... ... | ५<br>६ | ६९-७६<br>१-६ | |
| ७ | १९-१०३ | गीता अध्याय १ ला. ... ... | ६ | ७-५८ | ओव्यांत मुळींच मेळ नाहीं. |
| ८-१२ | सबंध. | गीता अध्याय २–६. ... ... | ७-११ | सबंध. | एकही ओवी जमत नाहीं. |
| १३-२४ | सबंध. | गीता अध्याय ७–१८. ... | १२-२३ | सबंध. | ओव्या तंतोतंत जुळतात. |
| ० | ० | गीतामाहात्म्य; धर्म व अर्जुन युद्धारंभीं भीष्मादिकांस भेटतात. | २४ | १-३८ | |
| २५ | १५-५७ | कृष्णाज्ञा उल्लंघिल्यामुळें लंकेचा भीमानें फेंकलेल्या गजशवांच्या योगानें नाश, बिभीषण व मंदोदरी कृष्णास शरण येतात. | २६ | ५३-६६ | ओव्या अगदीं एक. |
| | | | २७<br>२८ | ५-१२<br>९-३४ | ओव्या साफ निराळया; मात्र मतलब एक. |
| २५ | ५८-६८ | ब्रह्मा व सावित्री यांचा संवाद. | ० | ० | |
| ० | ० | संकुलयुद्ध. ... ... ... | २४ | ३८-९९ | छापील प्रतींत प्रत्येक दिवसाचें युद्ध स्पष्टपणें वर्णिलें आहे. हस्तलिखित प्रतींत प्रत्येक दिवशीं घडलेल्या गोष्टी स्पष्ट निरनिराळ्या न देतां, बहुतेक सर्व प्रकारचे युद्धप्रसंग एकदमच देऊन, अशा प्रकारें आठ दिवस युद्ध चाललें असा मोघम शेरा आहे. |

| हस्तलिखित पोथी. | | विषय. | छापील प्रत. | | शेरा. |
|---|---|---|---|---|---|
| अध्याय. | ओव्या. | | अध्याय. | ओव्या. | |
| २५ | ६९-८३ व ८७-८८ | संकुलयुद्ध. … … … | २६ | ४४-५२ | हस्तलिखित प्रतींत बऱ्याच ओव्या अधिक आहेत; परंतु छापील प्रतींतील बहुतेक ओव्या जुळतात. |
| २५ | ८३-८६ व ८९-१०२ | भीमाबरोबर न लढण्याविषयीं द्रोणाचा कौरवांस उपदेश व पार्थभीष्मयुद्ध. … … | २६ | २९-४३ | ओव्या एकच. |
| २५ | १०३-११२ | दुर्योधनभीष्मसंवाद, भीष्मप्रतिज्ञा. | २८ | १-८ | ओव्या जुळत नाहींत. |
| २६ | १-४ | दुर्योधनाचा शरण येण्याविषयीं पांडवांस निरोप व भीमाचें उत्तर. … … … | ० | ० | |
| २६ | ५-९७ | संकुलयुद्ध; भीमदुर्योधनद्वंद्व. … | २७ | १३-९४ | ओव्या बहुतेक जुळतात. |
| ० | ० | संकुलयुद्ध. … … | २८<br>२९ | ३५-६३<br>१-१०४ | |
| ० | ० | दुर्योधनशकुनिकर्णांचा संमंत्र, भीष्मदुर्योधनसंवाद, भीष्मकृत कर्णनिंदा. … … … | ३० | १-१७ | |
| २६ | १०१-१११ | भीष्माचें दुर्योधनास आश्वासन, भीष्मकृत अर्जुनगौरव, निर्वाणयुद्धाची तयारी. … | ३० | १८-२६ व ३१ | कांहीं ओव्या जुळतात; छापील प्रतींत कांहीं ओव्या फाजील आहेत. |
| २७<br>२८ | सबंध | परशुरामकथा. … … … | ३०<br>३१ | ३२-१२६<br>सबंध | दोन अध्याय मिळून तंतोतंत जुळणाऱ्या ओव्या सुमारें २५ निघतील. बाकीच्या अगदींच निराळ्या. मतलबमात्र एक. |
| ० | ० | नवमदिन–युद्ध; भीष्मप्रतिज्ञा. … | ३२ | सबंध | |
| ३० | सबंध | शिखंडीजन्मकथा. … … | ३३ | १-९७ | |
| २९<br>३१ | सबंध<br>१-१५ | दशमदिनयुद्ध. … … | ३३ | ९८-१५० | ओव्या निराळ्या. |

| हस्तलिखित पोथी. | | विषय. | छापील प्रत. | | शेरा. |
|---|---|---|---|---|---|
| अध्याय. | ओव्या. | | अध्याय. | ओव्या. | |
| ३१ | १६-३१ | भीष्माबद्दल शोक व जय झाला म्हणून पांडवांचा हर्ष. ... | ३३ | १५१-१६१ २०४-२१२ | ओव्या निराळ्या. |
| ० | ० | भीष्म शरपंजरीं पडले असतां त्यांस कौरवपांडव वगैरे भेटण्यास येतात, अर्जुन भीष्मांस बाणाची उशी करून देतो व पाताळची भोगावती आणतो; भीष्मकृत पांडवस्तुति. ... | ३३ | १६२-१८२ | |
| ० | ० | भीष्मकर्ण यांची भेट.... ... | ३३ | १८३-१९० | |
| ३१ | ३३-५० | भीष्मकृष्णसंवाद व भीष्माचे गुणानुवाद. ... ... ... | ३३ | १९१-२०३ | ओव्या एकच. |
| ३१ | ५१-६१ | कौरवांचे पुढील बेत. ... ... | ० | ० | |
| ३१ | ६१-७९ | उपसंहार. ... ... ... | ३३ | २१२-२२६ | ओव्या निराळ्या. |

# (३) भीष्मपर्वाच्या हस्तलिखित प्रतींतील २९ व्या अध्यायांत भीष्म पतन पावले, त्या वेळीं उपसंहारात्मक ज्या ओव्या आहेत त्यांचा उतारा.



'भीष्ममुक्तिप्रदायक'। ऐसें अष्टोत्तरीं नाम एक। कथा श्रद्धे जे ऐकतील लोक। सायुज्यता पावती. ॥ धर्म, अर्थ, काम, मोक्ष। भारत ऐकतां प्रत्यक्ष। तयामाजी भीष्मपर्व मुक्ष। ऐसें श्रोतीं जाणिजे. ॥ येथ पार्थासी जीवन्मुक्ति। भीष्मासी सायुज्यपदप्राप्ति। गीता बोलिजे दीनोद्धारार्थीं। सेतु भवपूरीं बांधिला. ॥ तया सेतुपंथें जो गेला। तो संसारसागरीं तरला। अन्य मानी तो बुडाला। ब्रह्मकल्पपरियंत. ॥ यालागीं साधूंचे संगतीं। गीतार्थ बरवा धरिते चित्तीं। त्यासी एक श्लोकश्रवणें मुक्ती। स्वयें श्रीपती बोलिला. ॥ सोपि मुक्तः शुभान् लोकान्। ऐसें बोलिला श्रीभगवान्। अन्यथा मानी तो अज्ञान। नरदेही पाषाण हरिद्रोही. ॥ संस्कृत अथवा प्राकृत। सुवर्णकुंभ रौप्यकुंभ निश्चित। रस एक हरिनामामृत। तृप्ती सारखी भोक्तियां. ॥ संस्कृत अर्थ विरळा जाणे। तरी जन उद्धरती कवणें गुणें?। म्हणोन श्रीनारायणें। प्रगट केलें प्राकृत. ॥ प्राकृत ऐकों नये जे म्हणती। ते विष्णुद्रोही दैत्य होती। पाषांडी ते भाविक भक्त नव्हती। अधोगती पैं गेले. ॥ भक्तीचेनी आथिलेंपणें। दैत्य राक्षस वैष्णव म्हणे। श्रोते हो! तुम्हांसी काय सांगणें?। ते बिभीषण प्रऱ्हाद. ॥ म्हणोनि कुळमताभिमान। करितोची जीव अज्ञान। येथ भक्ति श्रवणकीर्तन। भाषाभिमान धरूं नये. ॥ छप्पन्न देश, छप्पन्न भाषा,। संत वर्णिती एका जगदीशा। भाषा दूषी तो उन्मत्त म्हैसा। सैराचि जैसा धांवत. ॥ अथवा तो पालथा घट। हरिनाममेघ अनंतधारीं उद्भट। त्यावरी न धरे थेंउट। वृथा कटकट जन्म तया. ॥ मताभिमानी, देहाभिमानी,। भाषाभिमानी, धनाभिमानी,। कुळाभिमानी, ज्ञानाभिमानी। चौऱ्यायशी लक्ष योनी बांधी तया. ॥ जे अभिमानातीत झाले। संतवचनीं विश्वासले। ते मोक्षनिशाण लावोनि गेले। जन्ममरण त्यां नाहीं. ॥ जयां कथाश्रवणीं आवडी। हरिकीर्तनीं जयां गोडी। जयां सत्संगाची आवडी। तिहीं मोक्षगुढी उभविली. ॥ जे भूतदया सत्यवादी। परनिंदा न बोलती कधीं। ते नर दैवी संपदी। स्वमुखें गोविंदें वानिजे. ॥ 'दैवी संपद्विमोक्षाय'। ऐसें भगवद्वाक्य आहे। हें न मानी तो नरका जाय। विशेष काय बोलावें?॥ भीष्मासी मुक्तिपद गहन। श्रीकृष्णकृपेंकरून। तें परिसोत सज्जन। विश्वंभरकृपे बोलिजे. ॥ इति श्रीमन्महाभारते भीष्मपर्वणि भीष्ममुक्तिकथनो नाम एकोनत्रिंशोध्यायः ॥ २९ ॥

---

ब्राह्मणमाहात्म्य बहु श्रीमद्गंगातनूज[1] वदला, हो! ।
कीं[2] जन याच्या श्रवणें जोडुनि शुचि सुकृत, उच्च पद लाहो. ॥ ३
"अयश[3] न आलें, न स्त्री लक्षिलि, रक्षिलि यथोक्त महि म्यां, तें ।
द्विजभजनबळ; नृपा! किति वर्णू मी भूमिदेवमहिम्यातें? ॥ ४
श्रीकृष्ण ब्रह्मण्य[4] ब्राह्मणमाहात्म्य जाणतो; या[5] तें ।
पूस, म्हणे जेविं तृषित चातक जलदासि, 'आण तोयातें.'" ॥ ५
धर्म म्हणे, 'श्रीकृष्णा! कथितो तुज शांतनव पुसायास, ।
वदतां[6] व्हावें याचें बहु मानस शांत, न वपु सायास.' ॥ ६
कृष्ण म्हणे, "म्हणतो जो 'गर्व मजपुढें करूं नको' पविला,[7] ।
प्रद्युम्न भूसुरांहीं[8] कांहीं विप्रियें[9] करून कोपविला. ॥ ७
तो प्रद्युम्न मज म्हणे, 'आहे गुण कोण विप्रभजनांत? ।
'जी! जी!'[10] म्हणुनि मुनिस, कां व्हावें दीटूनि[11] विप्रभ[12] जनांत? ॥ ८

१. श्रीमद्गंगेचा पुत्र (भीष्म). २. सार्थान्वयः–कीं (कारण) याच्या (ब्राह्मणमाहात्म्याच्या) श्रवणें जन शुचि (पवित्र) सुकृत (पुण्य) जोडुनि (संपादन करून) उच्चपद (श्रेष्ठस्थान) लाहो (पावो). ३. सार्थान्वयः–[मला] अयश (अपकीर्ति) न आलें, म्यां स्त्री न लक्षिली (स्त्री कामेच्छेनें पाहिली नाहीं), [व म्यां] महि रक्षिली (पृथ्वीचें पालन केलें), तें [सर्व] द्विज-भजनबल (ब्राह्मणभक्तीचें सामर्थ्य); नृपा! भूमिदेवमहिम्यातें (ब्राह्मणमाहात्म्यातें) मी (भीष्म) किती वर्णू! ब्राह्मणमहिम्याचें वर्णन करावें तितकें थोडेंच, असा भाव. ४. ब्राह्मणाविषयीं आदर-बुद्धि बाळगणारा. ५. सार्थान्वय–जेविं तृषित (तान्हेलेला) चातक जलदासि (मेघासि), 'तोयातें (जलातें) आण,' म्हणे, [तेविं] या (श्रीकृष्णातें) [तूं] तें (ब्राह्मणमाहात्म्य) पूस (विचार). ६. सार्थान्वयः–[अशाकरितां कीं, तूं] वदतां (ब्राह्मणमाहात्म्य सांगत असतां) याचें (माझें, धर्माचें)मानस बहु शांत व्हावें, [व] वपु सायास (आयासयुक्त, सव्यथ, (कळावेदना लागलेलें) न [व्हावें]. माझी आधि व्याधि दूर व्हावी म्हणून भीष्म मला तुझ्या तोंडून ब्राह्मणमाहात्म्य श्रवण करण्यास सांगत आहेत; तरी तूं तें सांगावेंस, हा धर्माचा भाव. आमच्या जवळील दोन्ही हस्तलिखित प्रतींत या गीतीच्या उत्तरार्धातील 'मानस' शब्द गाळलेला आहे, परंतु त्याच्या ऐवजीं दुसरा कोणताच शब्द घातलेला नाहीं, त्यामुळें चार मात्रा कमी येऊन छंदोभग होतो. एका पोथींत मात्र 'वदतां' पूर्वी 'कीं' शब्द घातला आहे; तरी पण तेथेंही अखेर दोन मात्रांची वाण पडतेच. ७. वज्राला. वज्र इंद्राचें आयुध असल्यामुळें, 'गर्व करूं नको असें पविला म्हणे' या वाक्यांतून प्रद्युम्न इंद्राहून बलिष्ठ होता असा ध्वनि निघतो. ८. ब्राह्मणांनीं. ९. न रुचणारें आचरण, अपराध. १०. हांजी हांजी करून, मनधरणी करून. ११. जाणूनबुजून, बुद्ध्या. १२. नष्टतेज, हीनदीन.

वदलों मी, 'प्रद्युम्ना! सुज्ञा! बापा![1] असें कसें वदसी? ।
आम्हां मुख्य जयप्रद विप्राशीर्वाद, नच असा सदसी[2]. ॥ ९
आधीं[3] पात्र[4] ब्राह्मण सर्वांच्या वंदनास दैवत रे! ।
संसारीं[5] सुख भोगुनि, विप्रभजक, नंदना! सदैव तरे. ॥ १०
कुळपूज्य[6] तुझा आजा वसुदेवहि, देवकीहि आजी, जीं ।
विप्रांसि करिति, जैसे चातक मेघांसि, करुनि 'आ' 'जी! जी!' ॥ ११
सुख द्यावया समर्थ ब्राह्मण, अत्यंत दुःख अथवा; हे ।
सर्वांहीं पूजावे, हा धडक अनादि राजपथ[7] वाहे. ॥ १२
पुत्रा! ब्राह्मणपूर्वक[8] सर्वहि जे लोक आणि लोकेश[9]. ।
सत्याज्यपात्रदूषक[10], जो विप्राभक्त, होय तो केश. ॥ १३
पहिली भस्म कराया, क्षिप्र[11] रचायाहि नूतना सृष्टी, ।
जाण यथार्थ समर्था विप्राची ईशशक्तिसी[12] दृष्टी. ॥ १४
आयुष्य, कीर्ति, यश, बळ, फळ हें द्विजपूजनीं सुता! आहे; ।
साहे[13] न क्षिति यांच्या अहिता, जरि नगशता सदा वाहे. ॥ १५
प्रद्युम्ना! मी 'आपण ईश्वर.' ऐसें मनांत आणून, ।
कैसा आदर न करूं, विप्र तपोनिधि समर्थ जाणून? ॥ १६

---

१. 'बापा'! 'बाबा!' 'ताता!' हे शब्द प्रेमदर्शक आहेत व ते थोरांनीं लहानास लाविलेले आढळतात. बापा!=बाळा! २. सत्+असी=उत्तम तरवार. शस्त्रबलापेक्षां विप्राशीर्वादच जयाचें बीज होय. तेव्हां क्षत्रियांना ब्राह्मण पूज्य असले पाहिजेत, हा गीतीचा मतलब. ३. पहिल्या प्रथम. ४. योग्य. ५. सार्थान्वयः–नंदना! (बाळा प्रद्युम्ना!) विप्रभजक (ब्राह्मणभक्त) संसारीं (प्रपंचांत) सुख भोगून सदैव (सर्वदा) तरे (=जन्ममरणांतून सुखरूप पार पडतो). ६. सार्थान्वयः–तुझा आजा वसुदेवहि, आजी देवकीहि कुळपूज्य, जीं [वसुदेवदेवकी], जैसे मेघांसि चातक, [तैसीं] विप्रांसि 'आ' करुनि, 'जी! जी!' करिती. ७. हा फार दिवस चालत आलेला हमरस्ता लोकांच्या वहिवाटींत आहे; ह्याच मार्गानें लोक नेहमीं जातात, असा हा धोपटमार्ग आहे. ८. ब्राह्मण ज्यांच्या पूर्वी असे, ब्राह्मण ज्यांचे मार्गदर्शक असे. 'ब्राह्मणपूजक' हा पाठ अधिक सरळ व सुबोध झाला असता. ९. इंद्रादि लोकपाल. १०. जो विप्राभक्त (विप्र+अभक्त=ब्राह्मणास न भजणारा) तो सत्याज्यपात्रदूषक (सत्य+आज्य+पात्र+दूषक=सत्यरूप तुपाचें भांडें दूषित करणारा) केश होय. गुंतवळ अन्नामध्यें अगर कोणत्याही खाण्याच्या पदार्थांत सांपडल्यास तो पदार्थ निषिद्ध म्हणून खाण्यास अयोग्य होतो असा समज आहे. (मागें अ० १ गी० ३० व शांतिपर्व अ० ४ गी० ६१ पहा.) ११. सत्वर. १२. परमेश्वराच्या सामर्थ्यासारखी. १३. सार्थान्वयः–क्षिति (पृथ्वी) जरी नगशता (शेकडों पर्वतांना) सदा वाहे (अंगावर सहन करिते), [तरी] यांच्या ब्राह्मणांच्या अहिता (विप्रियास) न साहे (तिला सहन करवत नाहीं).

म्हणतिल[1] हो! एखादा, पात्र करुनि रक्त नयन कोपा, 'हूं'! ।
विप्र महद्भूत, तया होउनि तूं त्यक्तनय नको पाहूं. ॥ १७
ज्या प्रेमें स्वापत्या, त्या प्रेमें ब्राह्मणासि पोसावें; ।
कल्याणार्थ[2], सुनेनें सासूचें जेविं, तेविं सोसावें. ॥ १८
शत पथ आहेत, परि क्षेमपथ[3] नसेचि या पथापरिस, ।
पुत्रा! स्वानुभवाची कथितों, ती आदरें कथा परिस. ॥ १९
हरिपिंगल[4], चीरवसन[5], कृश, दीर्घश्मश्रु[6],बिल्वदंडधर[7], ।
बहु उच्च जो प्रमाणें[8] जैसा विंध्याभिध[9] प्रचंड धर, ॥ २०
ऐसा एक ब्राह्मण हिंडे तो द्वारकेंत येऊन; ।
तें[10] तेज तसें आलें, ग्रीष्मीं दुःसह जसेंचि ये ऊन. ॥ २१
हिंडे राजपथांत[11] प्रकट[12] सभाचत्वरांत[13] यदुनाथा! ।
प्रद्युम्ना! तो गाय[14] स्वाभिप्रायप्रकाशिका[15] गाथा[16]. ॥ २२
'सत्कारुनि[17], दुर्वासा[18] ब्राह्मण कोणी गृहांत वसवील, ।

---

१. सार्थान्वय:–रक्त नयन कोपा पात्र (=रागाचें स्थान, क्रोधाचा ठेवा) करुनि एखादा (कदाचित्) 'हूं' म्हणतील हो! [तेव्हां हे प्रद्युम्ना फार भिऊन रहा]. विप्र (ब्राह्मण) महद्भूत (बलिष्ठ प्राणी) [आहे], तया (त्याला) तूं त्यक्तनय होउनि (नीति सोडून, उद्धट होऊन) पाहूं नको (=सद्वर्तन सोडून त्यांशीं वागूं नको; त्यांचा आदर कर). २. हें गीत्यर्ध महाराष्ट्रीयांच्या नित्याच्या पाठांतील आहे, आपल्या समाजांत रूढ असलेली एक समजूत ह्यावरून स्पष्ट होते. कविकुलगुरु कालिदास ह्यांनीं आपल्या शाकुंतलनामक नाटकांत घातलेल्या उपदेशश्लोकाची (शुश्रूषस्व गुरून् १०) आठवण मर्मज्ञ वाचकांस झाल्यावांचून राहणार नाहीं (शाकुंतल अं० ४). ३. कल्याणप्रद मार्ग. ४. रंगानें तांबूस व पिंवळसर. ५. वल्कलधर. ६. दाढी वाढलेला. ७. बेलाच्या झाडाची काठी हातांत घेतलेला. ८. उंचीच्या मापानें, उंचीनें. ९. विंध्य नांवाचा पर्वत. १०. अन्वय:–ग्रीष्मीं जसेंचि दुःसह ऊन ये, तसें तें (त्या ब्राह्मणाचें) तेज आलें. ११. हमरस्त्यांत. १२. 'राजरोस, उघडपणें;' हा अर्थ घेतल्यास हें क्रियाविशेषण 'हिंडे' ह्या क्रियापदाचें; व 'सार्वजनिक' असा अर्थ घेतल्यास तें, 'सभाचत्वरांत' ह्या पदापैकीं 'सभा ह्याचें विशेषण घेऊन 'प्रकटसभाचत्वरांत' असा एक सामासिक शब्द करावा. १३. चत्वर=चौक, चव्हाठा, चार रस्ते एकत्र मिळतात तें स्थान. याचा 'अंगण' असाही अर्थ होतो. १४. गाई, सुरावर म्हणे. १५. स्व+अभिप्राय+प्रकाशिका=आपला हेतु प्रदर्शित करणारी. १६. गीति, सवाल. १७. आदर करून. १८. संस्कृतांत 'दुर्वासस्' असा शब्द असून त्याचें प्रथमेचें एकवचनी रूप 'दुर्वासाः' असें होतें; त्यावरून 'दुर्वास' असा शब्द प्राकृतांत न घेतां 'दुर्वासा' असा घेऊन, त्याचें प्रथमेचें एकवचनी रूप 'दुर्वासा' असें येथें योजिलें आहे. 'दुर्वासा ब्राह्मण' हें 'वसवील' इत्यादि सर्व भविष्यकाळी क्रियापदांचें कर्म; व 'कोणी' (=कोणी एकादा मनुष्य) हें प्रश्नद्योतक सर्वनाम त्याच क्रियापदांचा कर्ता आहे.

बसवील दैवतापरि[1], सुखवील, न कोपवील, हंसवील ?' ॥ २३
उच्च स्वरें[2] करुनियां गाथा सर्वत्र गाय हिंडत या; ।
ग्राहक[3] न मिळे, सुयशोवस्त्रांचें जें तदुक्त दिंड, तया. ॥ २४
स्वगृहांत वसविला म्यां[4], सफला व्हाया स्वसंपदा[5], नमुनी; ।
स्वोग्रत्वें[6] देता[7] जो प्रथमचि सर्वांसि कंपदान मुनी. ॥ २५
वसला[8] माझ्या सदनीं तो दुर्वासा मुनींद्र मन्नमनें[9]. ।
तें तें सिद्ध असे, बा ! जें त्याच्या वांछिजेल अन्न मनें. ॥ २६
नित्य उपासित होतों[10] अंगें त्या हव्यभुग्रविप्रखरा[11], ।
तरि तो न तुष्ट, रुष्टचि; उग्रांशप्रभव[12] उग्र विप्र खरा. ॥ २७
वत्सा ! मत्सेवेला[13] जपली क्षणही तव प्रसू[14] नाहीं. ।
वर्णावी सुकुमारी[15] जी जातीच्या[16] नव प्रसूनांहीं. ॥ २८
निजले नाहींच[17] दिसा, घटिकाहि न रातिं[18] सूद[19] नांवांचे[20]; ।
अहि[21] ज्यांत, त्या गृहीं बा ! धृति[22] काय अरातिसूदना[23] ! वांचे[24]; ॥ २९

---

१. देवाप्रमाणें. २. खड्या सुरानें. ३. सार्थान्वयः—जें तदुक्त (त्याचें बोलणें) सुयशोवस्त्रांचें (यशोरूप वस्त्रांचें) दिंड (गांठोडें) तया (त्याला) ग्राहक (गिऱ्हाईक) न मिळे. दुर्वास्याचें सादर अभिनंदन करणाऱ्याला यशोनिधान मिळणार; तेव्हां दुर्वासऋषींचें भापण हेंच कोणी कीर्तिरूप वस्त्रांचें गांठोडेंच होय,परंतु तें विकत घेणारा कोणीही द्वारकेंत भेटला नाहीं. पाठीवर खण, लुगडीं इत्यादिक वस्त्रें घेऊन कापडाचे फिरस्ते व्यापारी रस्त्यानें हिंडतात व ग्राहकांचें लक्ष जावें म्हणून मोठ्यानें 'खण, लुगडीं ! खण चोळ्यांचे !' असें ओरडतात, हें सर्वत्रांस माहीत आहेच. ४. मीं श्रीकृष्णानें. ५. आपल्या संपत्तीचें सार्थक व्हावें ह्या हेतूनें. ६. आपल्या उग्र मुद्रेनें, आपल्या चेहऱ्याच्या कठोरपणानें. ७. देणारा. जो प्रथमचि स्वोग्रत्वें सर्वांसि कंपदान देता=ज्याला पाहतांक्षणींच सर्वत्रांस त्याच्या रागीट मुद्रेनें कांपरें भरे, असा भाव. ८. राहिला. ९. वंदन करून केलेल्या माझ्या विनंतीवरून. १०. जातीनें, स्वतः. ११. हव्यभुक्+रवि+प्रखरा=अग्नि व सूर्य यांप्रमाणें कडक असणारा. १२. उग्र+अंश+प्रभव=रुद्राच्या अंशापासून उत्पन्न झालेला असा. दुर्वासा हा अत्रि व अनसूया यांचा मुलगा असून, शिवांशाचा अवतार होता. १३. आमच्याजवळील तीनही हस्तलिखित प्रतींत 'तत्सेवेला' असा पाठ आहे. १४. माता (रुक्मिणी). अन्वयः—वत्सा ! तव प्रसू मत्सेवेला क्षणही जपली नाहीं. श्रीकृष्णाच्या म्हणण्याचा भावार्थ असा कीं, दुर्वासऋषी घरीं राहूं लागल्यापासून मीच त्यांच्या सेवेंत तत्पर होतों असें नव्हे, तर रुक्मिणीसुद्धां माझी सेवा सोडून, त्यांच्याच तैनातींत गुंतली. पतिव्रतेला ब्राह्मणसेवेसाठीं पतिसेवासुद्धां बाजूस ठेवावी लागली; अर्थात् ही गोष्टही तिनें पतिसंमतीनेंच केली. १५. कोमल, नाजूक. १६. जाईच्या ताज्या फुलांनीं. १७. पाठभेदः—माझे न. १८. रात्रौ.झोंप घेण्याची वेळा जी रात्र,त्या वेळीं सुद्धां. १९. आचारी; स्वयंपाककर्ते. २०. नांवाजलेले. २१. सर्प. २२. धैर्य. २३. शत्रुनाशका ! प्रद्युम्ना ! २४. टिके.

अन्न बहुसहस्रांचें[1] एके समयीं पळांत जेवि[2], खरी ।
प्रळयाग्निशक्ति दावी; ते काय कथूं, पदार्थ जे विखरी? ॥ ३०

'नीज[3] सुखें, करितों पदसंवाहन, जेव, मायबापा! न्हा;' ।
मुनिसि म्हणें, कोपे; परि थानीं प्रेमें न माय बा! पान्हा, ॥ ३१

न्हावें[4] गुप्त, अकस्मात् प्रकट, हसावें, उगेंच वरडावें, ।
नाचावें, धावावें, जाळुनि गृह, वस्त्रही नव, रडावें. ॥ ३२

भलते भलत्या समयीं युक्तायुक्तहि पदार्थ मागे जे,
ते तत्काळहि देतां, न स्वीकारी; उगाचि रागेजे[5]. ॥ ३३

त्यागुनि पलंग, मागे होउनि[6] अतितप्तकाय बाजाच[7], ।
कंथाचि[8] आणवी तो; सांगावा फार काय बा! जाच[9]. ॥ ३४

सदनीं[10] कन्या मृदुला शय्या धृततापा सासिता पाहे; ।
'जाय, पदार्थ,' म्हणे 'बहु होतिल मज तापसासि तापा हे.' ॥ ३५

ऐसा विलोकिला म्यां प्रचुर[11] चमत्कार नित्य नव यांचा[12]; ।
आढळला जन तैसा[13] तितुक्या कोणीच अन्य न वयाचा. ॥ ३६

---

१. हजारों माणसांस पुरणारें. २. खाई. ३. सार्थान्वयः-'सुखें नीज (=सुखानें झोंप घे) पद-संवाहन करितों (पाय चुरितों), मायबापा! जेव, न्हा (स्नान कर)' [असें मी] मुनिसि म्हणें; [तो] कोपे; परि (परंतु) बा (प्रद्युम्ना) थानीं प्रेमें पान्हा न माय (अंतर्यामीं दयेचा पाझर मावेना). येथें दुर्वास्यास 'आईची' उपमा दिली आहे तेव्हां त्यास साजेल अशीच शब्दयोजना उत्तरार्धांत केली आहे. मुलास पाहून आईस पान्हा फुटतो हें योग्यच आहे; त्याप्रमाणें श्रीकृष्णाची निष्ठा पाहून दुर्वास मुनीस पोटांत प्रेमाचें भरतें येत होतें, पण तो वरकांतिमात्र राग दाखवी; कारण श्रीकृष्णाचें सत्व खऱ्या कसोटीस लावण्याची त्याची इच्छा होती. ४. 'न्हावें' इत्यादि क्रियापदांचें कर्तृपद त्यानें' (=दुर्वास्यानें) हें अध्याहृत आहे. ५. रागावत असे. या गीतींतील 'मागे' इत्यादि क्रियापदांचा व पुढील दोन गीतींतील क्रियापदांचा कर्ता 'दुर्वासा' हा अध्याहृत आहे. ६. अंगाचा संताप करून. ७. खाटलीच. ८. गोधडी. ९. त्रास, टोंचणी. १०. सार्थान्वयः-तो धृततापा (=संतप्त झालेला) [ऋषी] सदनीं (घरांत) कन्या (दासी) [व] मृदुला (मऊ) शय्या (अंथरूण), [या] सासिता, (=स+असिता=खड्गत्वयुक्त, तरवारीनें युक्त, घातक) पाहे; [व] म्हणे, [मी] जाय (=जातों), हे पदार्थ मज तापसासि (तपस्व्याला) बहु तापा होतील (=फार ताप देण्यासाठीं होतील, संतापप्रद होतील). ११. पुष्कळ. १२. दुर्वासऋषीचा. १३. तसे थेरथेर करणारा. अन्वयः-तितुक्या वयाचा (=तितका वृद्ध) अन्य कोणीच जन तैसा (=त्या प्रकारचा, तसा चमत्कारिक) आढळला न. पाठभेदः-आढळला जन न तसा, तितक्या कोणीहि अन्य न वयाचा.

जातां गेलाचि दिसे, फारि रुसव्याच्या उंदंड पैरि, पैर तो ।
सासूस जांवईसा वाटे गेला रुसोनि परि परतो. ॥ ३७

स्वैरगकलहीं न ज्याचा मागें, वाहूनि आण, पाय सरे; ।
प्रकटुनि सहसाचि म्हणे, 'उष्णाचि वाहूनि आण पायस रे!' ॥ ३८

'ज्याचे ज्ञानहि अर्पिति, केवळ दासासि न वसु, पाय सखा ।
न म्हणों देति सुरतरुसि, तो तूं हें उष्ण नव सुपायस खा.' ॥ ३९

ऐसें म्हणोनि कांचनपात्रीं म्यां वाढिलें सुपायस त्या, ।
जेपलों मुनिस बहु, जशा जपति पतिस करुनियां उपाय सत्या. ॥४०

प्रद्युम्ना! सूदजना [12] सोडूं दे श्वास न मुनि पायसदा, ।
झाला तृप्त प्रभु कीं जेपलों मी दास नमुनि पाय सदा. ॥ ४१

होउनि तृप्त मुनि म्हणे, 'कृष्णा! जें शेष राहिलें पात्रीं, ।
[16] हें पायस लावावें सर्वत्र क्षिप्रं आपुल्या गात्रीं.' ॥ ४२

प्रभुसि 'अवश्य' म्हणुनि म्यां पायसशेषें स्वकाय सारविला. ।
नक्षत्रांसि असो, परि विधुचा संकोच कायसा रविला? ॥ ४३

---

१. रुसण्या फुगण्याच्या. २. पुष्कळ. ३. प्रकार, तऱ्हा. ४. सार्थान्वयः—पर (=परंतु) तो सासूस जांवईसा (=जसा सासूला जांवई तसा) रुसोनि गेला, परि (परंतु) परतो (परत येवो) [असें] [आम्हांस] वाटे. सासऱ्यापेक्षां सासूचें प्रेम जांवयावर जास्त असतें, हें सर्वप्रसिद्धच आहे; तेव्हां सासूचें जें प्रेम जांवयावर असतें, तें प्रेम श्रीकृष्णांनीं ब्राह्मणावर ठेविलें होतें, असा भाव. उपमा फार ठसकेदार आहे. ५. स्वर्+अग+कलहीं=स्वर्ग+तरु+कलहीं=कल्पवृक्षाबरोबरील भांडणांत. सार्थान्वयः—[औदार्यासंबंधें] स्वरगकलहीं (कल्पवृक्षाशीं स्पर्धा करण्यांत) ज्याचा (ज्या दुर्वास्याचा) पाय आण वाहूनि (=शपथ वाहून, पुन्हां अशा खटपटींत पडणार नाहीं अशी आण घेऊन) मागें न सरे, [तो] सहसाचि प्रकटुनि इ०. 'जो औदार्यासंबंधें कल्पवृक्षाशीं टेंक देणारा होता' हा पूर्वार्धाचा भाव. पाठभेदः—स्वरकलहीं न जयाची. ६. पाठभेदः—पाहूनि. ७. दूध किंवा खीर. ८. सार्थान्वयः—ज्याचे पाय दासासि (भक्तासि) केवळ वसु (धन) न, [तर] ज्ञानहि अर्पिति, [व] सुरतरुसि (कल्पवृक्षास) सखा म्हणों न देति (कल्पवृक्षाला औदार्यांत जे आपली बरोबरी करूं देत नाहीं,) तो तूं (दुर्वासऋषी) हें उष्ण, नव सुपायस खा (ह्या उत्तम खिरीचा आदर कर). ९. अनेक प्रकारें त्या दुर्वासऋषीची मनधरणी केली. १०. पतिव्रता. ११. आचाऱ्यांस. १२. उसंत पडूं देईना, दम टाकूं देईना. १३. खीर वाढणाऱ्या. १४. दुर्वासऋषी. १५. सेवेला तत्पर होतों. १६. पाठभेदः—तें. १७. सत्वर. १८. देहास. १९. सार्थान्वयः—विधुचा संकोच नक्षत्रांसि असो; (नक्षत्रांस चंद्राची पर्वा किंवा भीड वाटावी हें योग्य); परि (परंतु) [विधुचा संकोच] रविला (सूर्यास) कायसा? अर्थात् कांहीं नाहीं. मजपेक्षां कमी जे असतील त्यांस मजला उच्छिष्ट अंगास सारवावयास सांगण्याचा संकोच वाटला असता, हें विहितच आहे; परंतु दुर्वास्यासारख्या महाब्राह्मणास तसें कर असें मला सांगण्यास काय संकोच वाटणार? कांहींच नाहीं,

पायसलेपन देहीं दृष्टांतीं उष्ण वा रुचो; पडतें, ।
नीटचि युक्ति पहातां, हें, कीं मी कृष्ण वारु, चोपड तें. ॥ ४४
भैष्मीचाही झाला मुनिवचनें काय पायसा मान्य, ।
मोडील कोण आज्ञा ? बापा! ते काय पाय सामान्य ? ॥ ४५
मग रुक्मिणीस योजी, आधीं योजूनियां रथास मज; ।
विप्रप्रभुत्व, पुत्रा! सादर परिसोनि ही कथा, समज. ॥ ४६
जेविं रथाला घोडा जोडावा, एक त्या दुजी घोडी, ।
जोडी स्त्रीस तसें; बा! वद कोणाच्या यशीं अशी गोडी! ॥ ४७
बसुनि रथीं राजपथीं बहु मिरवत चालवी प्रतोदानें; ।
लोकां शोकांचीं दे, धरुनि तसी चाल, विप्र तो दानें. ॥ ४८
जी जातीपुष्पांच्या नव मालेसींच सुतनु तोलावी, ।
त्या भैष्मीस नृपपथीं विप्रप्रवर प्रतोद तो लावी. ॥ ४९
टोंची मुनि प्रतोदें, उघडि यशाचें कवाड; वाटोंच ।
दीन जनांत, परि म्हणें मी मनिं, 'निःशंक वाडवा टोंच.' ॥ ५०

---

म्हणूनच निःशंकपणें दुर्वास्यांनीं मजला उच्छिष्ट पायस अंगास माखण्यास सांगितलें, असा कृष्णोक्तीचा भाव. 'ब्राह्मणो मम दैवतम्' हें वाक्य सर्वश्रुत आहेच. तेव्हां श्रीकृष्ण विधूप्रमाणें व दुर्वासा हे सूर्याप्रमाणें होत.

१. सार्थान्वयः– वा (=अथवा) देहीं उष्ण पायसलेपन दृष्टान्तीं (=पुढील दृष्टान्तानें, दाखल्यानें, उदाहरणानें) रुचो (=योग्य किंवा मनोहर वाटो); युक्ति पाहतां (योग्य विचार केला असतां, हें नीटचि पडतें (=घडतें, ठरतें), कीं मी कृष्ण वारु (घोडा) [व] तें (लेपन) चोपड (=मालीश करण्याचें लोणी वगैरे) [होय]. येथें कृष्ण शब्दावर श्लेष आहे, असें भासतें. कृष्ण=(१) वासुदेव. (२) काळा. एका हस्तलिखित प्रतींत 'उष्ण वा रुचो' याऐवजीं 'सच्छ्वा रुचो' असा पाठ आहे. २. काय (देह) पायसा मान्य झाला (खीर चोपडून घेता झाला). ३. ते दुर्वासऋषींचे पाय. सामान्य=साधारण, असेतसे. ४. जोडिता झाला, जुंफिता झाला. ५. ब्राम्हणसामर्थ्य. ६. पाठभेदः–असे. ७. मोठ्या ऐटीनें. ८. चाबुकानें, चाबूक मारून. ९. शोकांचीं दानें दे= शोकाकुल करिता झाला. १०. जाईच्या फुलांच्या. ११. तुलनेला घालावी, बरोबरीची समजावी. रुक्मिणी जाईच्या फुलाच्या ताज्या माळेसारखी नाजूक होती, असा गीत्यर्थाचा मतलब. याच अध्यायांत मागें गीति २८ पहा. १२. चाबूक मारता झाला. १३. सार्थान्वयः– मुनि [मज] प्रतोदें (=चाबुकानें) टोंची, [व] यशाचें कवाड उघडी; मी जनांत (=लोकांच्या दृष्टीनें) दीन (=दुःखांत पडलेला) वाटोंच, परि मनिं म्हणें [कीं] 'वाडवा! (ब्राम्हणा!) निःशंक (बेलाशक) टोंच.'

मुनिनें[1] गमे कराया देह सफळ जनन टोंचिला गावा ।
कविंनीं मुक्तामणिसा श्रुतिभूषण, जन नटोंचि लागावा. ॥ ५१

यादव म्हणति, 'देवानळ[2] दुर्वासा, हे[3] लता पहा काय. ।
या उग्र[4] ग्रीष्मीं हे दुर्वा साहेल ताप हा काय ?' ॥ ५२
ब्राह्मण जाती श्वश्रू[5], अससिल कसि वृष्णिसंपदे[6] ! सासू[7] ? ।
लोकीं बहु दांष्टिकही[8] ऐसी न सुनेसि कंप दे सासू. ॥ ५३
पुर तळमळे तसें, ऱ्हदतापें[9] बहु जेविं यांद[10] तळमळतें; ।
म्हणति, 'पथरजांत स्त्रीरत्न नलिनमृदुल[11]पादतळ मळतें !' ॥ ५४
कष्टीं[12] धर्माचरणीं श्वशुरानें[13] योजितां[14] स्वदयितातें[15], ।
पाहूं[16], वारूं, न शके जाणों ती विनयवसति दयिता तें. ॥ ५५
कैकेयीवरें[17] मुनि, मी राम; म्हणति, 'विरह पळ नयो,' ध्याती ।

---

१. सार्थान्वयः–[असें] गमे (वाटलें), [कीं] जनन सफळ कराया (जन्माचें सार्थक व्हावें म्हणून) टोंचिला (टोंचिलेला) देह कविंनीं श्रुतिभूषण मुक्तामणिसा (कर्णभूषण होणाऱ्या मोत्याप्रमाणें) गावा स्तवावा; [व त्यामुळें] जन नटोंचि लागावा (शोभूं लागावा). मोत्यांस भोंकें पाडल्यानें तीं मोत्यें कर्णभूषण होतात व त्यांची सुज्ञजन तारीफच करितात, त्याचप्रमाणें दुर्वास्यानें टोंचिलेला माझा देह पवित्र व स्तुतिपात्र व्हावा, ही माझी इच्छा होती. श्रुतिभूषण=वेदांस भूषणावह; पक्षीं कर्णाचा अलंकार. २. वणवा. ३. अन्वयः–काय (देह) हे (ही) लता पहा. ४. कडक उन्हाळ्यांत. हे दुर्वा (=दूर्वा) हा ताप साहेल काय? ही रुक्मिणीरूप दुर्वा हा उष्मा सहन करूं शकेल काय? अर्थात् ह्या दुर्वासरूप वणव्यापुढें ह्या रुक्मिणीरूप दूर्वेचा निभाव लागणार नाहीं, असा भाव. ५. सासू. ६. हे यादवकुलाच्या लक्ष्मी ! वृष्णि हा यादवांचा एक पूर्वज. ७. जिवंत. ८. खाष्ट, कठीण. ९. डोह तापल्यानें. १०. जलचर. ११. नलिन+मृदुल+पाद+तळ=कमळाप्रमाणें मऊ आहेत पायाचे तळवे ज्याच्या असें.हें 'स्त्रीरत्न' या नामाचें विशेषण. १२. खडतर कर्तव्यांत. १३. सासऱ्यासारखें नातें आहे ज्याचें असा दुर्वासा त्यानें. १४. [करावयास] लाविलें असतां. १५. आपल्या पतीतें; श्रीकृष्णास. १६. सार्थान्वयः–जाणों ती विनयवसति (विनयाचें माहेर, अत्यंत मर्यादशील) दयिता (स्त्री; अर्थात् रुक्मिणी) तें (कष्टप्रद धर्माचरण) पाहूं न शके [व] वारूं (टाळूं) [न शके], (तिला तें पाहवेना व त्याचा परिहारही करितां येईना). १७. सार्थान्वयः–मुनि (दुर्वासा) कैकेयीवर (कैकेयीस दशरथानें दिलेला वर), [व] मी (कृष्ण) राम [असे वाटत होतों]; [व] विरह (वियोग) पळ (क्षणभर) न यो (न होवो) [असें] म्हणती (=म्हणणारी) [व] परिहारोपाया (=मजवरील संकट वारण्याच्या उपायाला) ध्याती (=चिंतणारी) जाणों कीं (=जणूं काय) द्वारका न, [तर] ती अयोध्या. कैकेयीच्या वरामुळें रामास अयोध्या सोडून वनवासास जावें लागलें, त्याप्रमाणेंच दुर्वास्यामुळें कृष्णाला द्वारका सोडून जावें लागत होतें, म्हणून येथें 'कैकेयीवर' व 'मुनि' यांचें रूपक साधिलें आहे. 'राम' व 'कृष्ण' आणि 'अयोध्या' व 'द्वारका' यांमधील साम्य उघड आहे. सर्वसंग्रहपाठः–जाणें न द्वारका.

परिहारोपाया कीं जाणों न द्वारका, अयोध्या ती. ॥ ५६

मी नाकावरि ठेवीं वाराया लोक अंगुलीलाच. ।
धरिली तापभरातें सर्व जनें स्पष्ट पंगुलीलाच. ॥ ५७

झाले चित्रचि पाहुनि पौरांचे वाटसुर थवे गा! तें; ।
देती मुनिच्या धाकें राजपथीं वाट सुरथवेगातें. ॥ ५८

भगवंताची सेवा कांहींसी द्वारकापुरीं घडली; ।
धांवडितां रथ, मंथरगति वैदर्भी सती पथीं पडली. ॥ ५९

मुनिच्या मनांत होतें कीं बहुवेगें रथा पिटाळावें, ।
माझ्या चित्तीं सत्वें दुस्तर संकट तथापि टाळावें. ॥ ६०

परि भैष्मी स्खलनातें पावे; जें सौकुमार्य, तो दोष; ।
रोष प्रभुला आला; गुणहि अगुण होय, जो न दे तोष. ॥ ६१

तों मुनि कोपोनि म्हणे, 'तरते सिंधूंत जे नदा भणगा ।
दुस्तर म्हणति, तयांचें हृदय सदुपदेश जेन दाभण गा. ॥ ६२

स्खलन समीं राजपथीं पावतसे बायको, समजलाहे ।

---

१. अंगुलीलाच नाकावरि ठेवीं=स्तब्ध राहण्यास खूण करीं, बोट नाकावर ठेवून चूप राहण्यास खुणावीं. २. दुःखपीडितानें. पाठभेदः—तापसभीती. ३. जनें पंगुलीलाच (पांगळ्यासारखी वृत्ति किंवा स्थिति) धरिली=लोक जणों काय पांगळेच झाले, कोणी एकानेंही एक पाऊलही पुढें टाकिलें नाहीं. ४. चित्रचि झाले=चित्रासारखे तटस्थ झाले. ५. पायीं चालणारे. ६. भयानें. ७. दुर्वासमुनीची. ८.थोडीसी. 'सेवा घडली'=चाकरी झाली. अर्थात् कांहीं थोडासा मार्ग मुनीस रथांत बसवून आम्हीं कंठिला. ९. पिटाळिला असतां. १०. मंद आहे चाल जीची अशी. ११. विदर्भ देशच्या राजाची मुलगी, रुक्मिणी. १२. साध्वी. १३. प्रतिज्ञा सांभाळून, बीद राखून. १४. कठीण प्रसंग निभावावा, कठीण प्रसंग पार पाडावा. १५. रुक्मिणी. १६. स्खलनातें पावे=ठेंचकळून पडली. १७. अन्वयः—जो [गुण] तोष न दे, [तो] गुणहि अगुण (=दोष) होय. १८. सार्थान्वयः—तों (तेव्हां) मुनि कोपोनि म्हणे 'जे सिंधूंत (समुद्रांत) तरते (तरणारे) भणगा नदा (=भिकार ओढ्याला, यःकश्चित् ओहोळास) दुस्तर (तरून जाण्यास कठीण) म्हणति (म्हणतात), तयांचें हृदय जेन (=बुरणूस) [व] सदुपदेश दाभण गा (=म्हणा), [=त्यांच्या हृदयास बुरणुसाप्रमाणें समजा व सदुपदेशांना दाभणाप्रमाणें माना.] बुरणुसांतून दाभण काढून घेतला म्हणजे भोंक बुजून तो बुरणूस पूर्ववत् होतो; त्याप्रमाणें लबाड लोकांच्या मनावर सदुपदेशाचा परिणाम काडीमात्रही घडत नाहीं. अर्थात् रुक्मिणी लबाडीनें ठेंचकळली. वस्तुतः तिला पडण्याचें कांहींएक कारण नव्हतें, असा रागावलेल्या दुर्वास मुनींच्या भाषणाचा भाव. १९. सार्थान्वयः—समीं (सपाट, सारख्या;) राजपथीं बायको स्खलन पावतसे! [तेव्हां मजला तिचा] आशय (=हेतु) समजलाहे (=कळला आहे). [तिच्या मनांत मजला रथांतून घेऊन जावयाचें नाहीं हें माझ्या ध्यानांत आलें आहे, असा भाव.] हे (=ही) मजला एक कोस तऱ्ही (तरी) घेऊन आली [आहे] काय?

आशय[1]; आली घेउनि एक तन्ही काय कोस मजला हे?' ॥ ६३
ऐसें वदला, रुसला, गेला टाकुनि रथावरूनि उडी; ।
मन्मति[2] विकळा झाली, प्राणवियोगेंकरूनि जेविं कुडी[3]. ॥ ६४
द्रुत[4] दक्षिणेकडे मुनि पायानें[5] उत्पथेंचि[6] तो धांवे, ।
होतां[7] गुप्त, तरि सुता[8]! कोठें तच्चरणपद्म शोधावें? ॥ ६५
तैसाचि[9] तूर्ण[10] पायसदिग्धतनु[11], विरोनि[12] आपुल्या आंगें[13], ।
'भगवन्[14]! प्रसीद' ऐसें म्हणत सुता[15]! मीहि धांवलों मागें. ॥ ६६
वैदर्भीही धांउनि ये, प्रार्थी मंजु[16] मांजियाचितसें[17], ।
'न घडेल स्खलन पुन्हा, बैस रथीं हेंचि आजि याचितसें.' ॥ ६७
वात्सल्यें कळवळला चित्तांत; सुजाण विप्र सन्नमनें[18]; ।
स्वाराधनफळ[19] आम्हां, विश्वासहि, जाणवि प्रसन्न मनें. ॥ ६८
तो तेजस्वी मातें सादर पाहुनि म्हणे, 'महाबाहो! ।
बा! हो[20] धन्य; स्पर्धा[21] करुनि परमह न तुझ्या महा बाहो. ॥ ६९
अति[22] दुर्जय परि कृष्णा! त्वां कोप प्रकृतिनेंचि बा जितिला. ॥
जी महिषघ्नी देवी योग्य मिळालीच आलि आजि तिला. ॥ ७०

---

१. पाठभेदः—अयश न. २. माझें मन अगदीं व्याकुळ, हवालदील झालें. ३. शरीर. ४. सत्वर. ५. पाठभेदः—पायांनीं. ६. आडवाटेनें, आडमार्गानें. ७. जर झाला असता. ८. प्रद्युम्ना! ९. तसाच म्हणजे जसा दुर्वासा आडवाटेनें, पळूं लागला तसा मीहीपण आडवाटेनें त्याच्या मागें धावूं लागलों. १०. घाईघाईनें, लागलेंच. ११. खिरीनें माखिलेला आहे देह ज्याचा असा मी. १२. खेद पावून. पाठभेदः—°दिग्धतनू खिन्न आपुल्या आगें. १३. अपराधानें. १४. महाराज! क्षमा करा. १५. पाठभेदः—द्रुत. १६. मृदुस्वरानें. १७. माझ्याप्रमाणेंच. १८. उत्तम नमनानें, मनोभावानें केलेल्या नमस्कारानें. १९. सार्थान्वयः—[तो विप्र] स्वाराधनफळ (आपल्या सेवेचें फल) प्रसन्न मनें (मोठ्या संतुष्ट मनानें) आम्हां (श्रीकृष्णास व रुक्मिणीस) [व] विश्वासहि (अवघ्या जगाला) जाणवी (दाखवी). २०. कृतार्थ हो. २१. सार्थान्वयः—परमह (दुसऱ्याचें तेज) स्पर्धा करुनि (चढाओढीनें) तुझ्या महा (तेजाला) न बाहो (बोलावो). तुझ्या तेजाची बरोबरी दुसऱ्या कोणाच्याही तेजानें होणार नाहीं, हा भाव. २२. सार्थान्वयः—कोप (अर्थात् माझा राग) अति दुर्जय (शमविण्यास अतिशय कठीण), परि (परंतु) बा कृष्णा! त्वां [तो] प्रकृतिनेंचि (स्वभावानें अर्थात् आपल्या सात्विक वृत्तीनें, सुस्वभावानें, सौजन्यानेंच) जितिला (जिंकला). जी महिषघ्नी देवी (महिषासुरमर्दिनी दुर्गा देवी) तिला आजि (आज) योग्य आलि (सखि) मिळालीच. महिषासुराप्रमाणेंच अति दुर्जय असा माझा कोप आज तुझ्या प्रकृतिनें (सुस्वभावानें) नाहींसा केला, तेव्हां अर्थात् ती तुझी प्रकृति दुर्गादेवीप्रमाणेंच प्रतापी होय; असा प्रताप दाखविणारी आजपर्यंत कोणी मिळालीच नव्हती, हा भाव.

इतुक्या दिवसांत तुझें दिसलें[1] नाहींच तिळहि[2] आग[3] मला, ।
सादर गमलासि, जसा चातक मेघासि करुनि[4] 'आ' गमला. ॥ ७१
झालों[5] सुप्रीत, मला वांछित वर सर्व माग, अथवा हो ।
'दे' न म्हणतांचि पूर्ण, ब्राम्हणपदभक्तिभव्यपथ वाहो. ॥ ७२
तें काय योग्य, भक्तें मुख, 'दे' हे शब्द वदत, पसरावें! ।
[6]सुभजकहितार्थ कृष्णा! माजें सर्वार्थपद तप सरावें. ॥ ७३
बा[7]! भाव मनुष्यांचा अन्नीं जोंवरि जसा दृढ असेल, ।
तोंवरि तैसाचि तुझ्या ठायीं [8]तो भाव निश्चळ वसेल. ॥ ७४
त्वत्कीर्तिपुण्य[9] लोकीं नांदेल सदैव पूतनाकाला[10], ।
त्वत्पुण्यगुणश्रवणें[11] जातिल होवून पूत नौकाला[12]. ॥ ७५
स्पष्ट विशिष्टत्वातें[13] तूं त्रैलोक्यांत पात्र होशील, ।
सर्वां लोकांस प्रिय परम [14]तुझें एक मैत्र हो शीलें. ॥ ७६
पात्रादि फोडिलें जें, गृह भूषण वस्त्र जाळिलें रागें, ।
स्रक्[15]चंदनान्नपानहि जें कांहीं व्यर्थ नासिलें मागें[16]. ॥ ७७
दिव्यं[17] यथास्थित सर्वहि किंवा तदधिक[18] गृहीं पहासील, ।
किंबहुना[19] पुष्पादिक, तें देवब्राह्मणा वहासील. ॥ ७८
अमृतचि सारविलें हें माझें उच्छिष्ट अन्न गात्रास; ।

---

१. पाठभेदः—घडलें. २. किंचित्सुद्धां. ३. अपराध. ४. 'आ' करुनि=तोंड पसरून. चातक हा मेघबिंदूकरितां तोंड पसरून टाहो फोडतो हा संकेत सर्वमान्य आहे. ५. सार्थान्वयः—[मी] सुप्रीत (प्रसन्न) झालों (झालों आहें); मला वांछित वर माग; अथवा 'दे' न म्हणतांचि (सर्व वांछित) पूर्ण हो (होवो); [व] ब्राह्मण-पद-भक्ति-भव्य-पथ (ब्राह्मणचरणाच्या सेवेमुळें प्राप्त होणाऱ्या कल्याणाचा मार्ग) वाहो (वाहत राहो;) [अर्थात् सर्वांस ब्राह्मणमाहात्म्य कळून, ते ब्राह्मणसेवेला लागोत). ६. कृष्णा! सुभजकहितार्थ (उत्तम भक्ताच्या कल्याणाकरितांच) माजें (माझें) सर्वार्थपद तप (=सर्व संपत्तीचें माहेर असें जें तपश्चरण तें) सरावें (कामास यावें, खर्ची पडावें). ७. भावार्थः—मनुष्यमात्रास अन्न हें अत्यावश्यक आहे, त्याचप्रमाणें तुझी भक्तीही त्यांना आवश्यक होईल; अर्थात् प्राणिमात्र तुला सदैव चाहतील. ८. पाठभेदः—हा. ९. त्वत्+कीर्ति+पुण्य=तुझ्या यशाची पवित्रता. १०. पूतना नामक राक्षसीचा वध करणाऱ्या? ११. तुझे पवित्र गुण कानीं पडल्यानें जन उद्धरतील, असा भाव. १२. स्वर्गास. १३. श्रेष्ठत्वातें. १४. केवळ तुझा एकट्याचाच स्वभाव. शील=स्वभाव, सद्वर्तन. १५. स्रक्+चंदन+अन्न+पानहि=हार, चंदनादिकांचीं उटणीं, अन्नें व पेय वस्तु सुद्धां. १६. पूर्वी. गीति ७७ व ७८ यांचें युग्मक आहे. १७. पूर्वीप्रमाणेंच सुंदर. १८. तत्+अधिक=त्याहून अधिक, पूर्वीच्याहून जास्ती. १९. सारांश, थोडक्यांत.

मृ[1]त्युदवाचा नाहीं या सद्गुणपत्रिसन्नगा त्रास. ॥ ७९
बा[2]! त्वां देहीं धरिलें जें हें, पायस न, होय पविकवच; ।
प्राताामृतसें प्यावें माझें बहु आदरूनि भ[3]विक वैच. ॥ ८०
कां सारविले नाहीं पायांचे मात्र पुं[4]त्रका! तळवे? ।
उरलें अपक्क मृदुपण कीं हें, जेणें[5] फुलाहि नातळवे. ॥ ८१
[6]हें न मम प्रिय, पायसलेपा केलीं न पात्र पादतळें, ।
निवड करुनि, तृषितासीं सुज्ञा! सांगेल काय वाद तळें?' ॥ ८२
मुनिचा प्रसाद होतां वत्सा! जों आपणाकडे पाहें, ।
तों पहिल्याहूनि अधिक मी श्रीसंपन्न शतगुणें आहें. ॥ ८३
करुनि प्रसाद मजवरि, वैदर्भीतेंहि मग म्हणे विप्र, ।
''वत्से! मत्सेवेचें सत्फळ, 'दे' न म्हणतांचि, घे क्षिप्र. ॥ ८४
सर्वा स्त्रियांत रुक्मिणि! कन्ये! होसील वैरयशा पात्र, ।
पावेल न रोगजरावैवर्ण्यातें कधीं तुझें गात्र; ॥ ८५
दि[11]व्यकुसुमदामतसें वा[12]हेल सदैव पुण्यगंधातें; ।
से[13]व्य गुणातें होइल हें, जैसें सत्य सत्यसंधातें. ॥ ८६

---

१. सार्थान्वयः—या सद्गुणपत्रिसन्नगा (सद्गुण+पत्रि+सत्+नगा=सद्गुणरूप पक्ष्यांच्या उत्तम वृक्षास, गुणरूप पक्षी ज्याचा आश्रय करितात अशा तुझ्या देहरूप वृक्षास) मृत्युदवाचा (मृत्युरूप वणव्याचा) त्रास नाहीं. अर्थात् तुझ्या देहास मृत्यूचें भय उरलें नाहीं, असा भाव. २. अन्वयार्थः—बा! त्वां जें हें देहीं धरिलें, [तें] पायस न, [तर] पविकवच (वज्रकवच, दुर्भेद्य चिलखत) [होय]. ३. हितकर बोलणें, बऱ्याचें भाषण. ४. बाळा! बाबारे! ५. सार्थान्वयः—जेणें (ज्या मृदुपणामुळें) फुलाहि (फुलाला सुद्धां) नातळवे (स्पर्श करवणार नाहीं). [illegible] सुद्धां पायांस इजा होई असे ते मऊ व नाजुक आहेत, हा भाव. ६. सार्थान्वयः—पादतळें (पायाचे तळवे) पायसलेपा [त्वां] पात्र न केलीं, (हें मम प्रिय न, हें मला आवडलें नाहीं.) [हे] सुज्ञा! (अरे शहाण्या!) निवड करुनि तळें तृषितासीं वाद सांगेल काय? अमुक, चांगला तमुक वाईट, अशा कल्पनेनें तलाव कधीं ताहानेल्याबरोबर हुजत घालीत बसेल का? नाहीं. कोणीही असो, तो ताहानेला असल्यास तळें त्यास पाणी देऊन त्याची तहान भागवीलच; तद्वत् 'पादतळ' हें नीचांग आहे असें कधींही पायसास वाटलें नसतें; तूं तें पायस तळव्यांस लाविलें असतेंस तर इतर गात्रांप्रमाणें तेही वज्रकठोर झाले असते, हा भाव. ७. प्रद्युम्ना. ८. शंभरपटीनें. ९. उत्तम कीर्तीला. १०. रोग व वृद्धपण व निस्तेजता. ११. पारिजातक फुलांच्या माळेप्रमाणें. १२. याचा कर्ता 'गात्र' हा मागील गीतींतून घ्यावयाचा. १३. जैसें (ज्याप्रमाणें) सत्य (=सचोटी) सत्यसंधातें (सत्य हेंच ज्याचें ब्रीद आहे त्यास) [तैसें] हें (हें तुझें शरीर) गुणातें (सद्गुणातें) सेव्य होईल. तुझे ठायीं सद्गुण सदैव नांदतील, असा भाव.

पुत्रि! वरिष्ठा होसिल हरिच्या षोडशसहस्रभार्यांत; ।
कीर्तींत कीर्ति तव हो मान्या, मम माय[1] जेविं आर्यांत[2]. ॥ ८७

आराधन कृष्णाचें नित्यप्रेमेंकरूनि करिशील, ।
हरिशील चित्त पतिचें, धरिशील[3] सुशील जेविं हरिशील. ॥ ८८

बहु आवडसिल कृष्णा, जी अभ्रमु[4] जेविं त्या सदान गजा[5]; ।
पतिसह उत्तमलोकीं वससिल, जसि शंभुसह सदा नगजा[6].' ॥ ८९

मुनि सुवरभूषणांहीं[7] त्वन्मातेतें[8] असें अलंकारी[9], ।
लंकारी[10] जो, तोचि प्रभु कार्यांतीं जसा अलंकारी. ॥ ९०

भैमी चित्तांत म्हणे, 'अगइ! गवसला[11] महाकसाल्याला[12] ।
देह, शिरःस्नात जसा लग्नीं, शोभा पहा कसा त्याला[13]!' ॥ ९१

प्रस्थानीं[14] तो भगवान् मुनि कुरवाळुनि म्हणे नतास[15] मज, ।
'कृष्णा! मेघश्यामा! बा! माझ्या माधवा! मता[16] समज. ॥ ९२

---

१. माझी माता, अनसूया (मागें अ० १, गी० ४६–५२ पहा). २. पतिव्रतांत. ३. अन्वयार्थ–जेविं हरिशील (श्रीकृष्णाचा स्वभाव) [तेविं] सुशील (उत्तमस्वभाव) धरिशील (अंगीकारशील). अर्थात् श्रीकृष्णाप्रमाणें तूंही सुस्वभावाची होशील. येथें रुक्मिणीस दिलेला वर पतिव्रतेस गोड वाटेल व साजेल असाच आहे. यांत अप्रत्यक्ष रीतीनें पतिव्रतेचें वर्तन कसें असावें, तेंही सुचविलें आहे. ४. ऐरावताची स्त्री. ५. त्या सदान गजा=मदमत्त हत्तीला, ऐरावताला. दान=मत्त हत्तीच्या गंडस्थळांतून वाहणारा मद. ६. पर्वतकन्या, पार्वती. ७. उत्तम वररूप दागिन्यांनीं. ८. त्वत्+मातेतें=तुझ्या आईस, रुक्मिणीस. ९. नटविता झाला. १०. सार्थान्वयः–जो प्रभु (रामचंद्र) लंकारी (लंकेचा शत्रु) तो जेविं कार्यांतीं (काम तडीस गेल्यावर, पृथ्वीचा राक्षसभार उतरल्यावर) अलंकारी (लंकेचा शत्रु नव्हे असा) [होय] [तेविं हा मुनि होय]. रामचंद्रांनीं लंकापति रावण मारिला, पण दुष्टांचा संहार केल्यावर, त्याच रामचंद्रांनीं बिभीषणास लंकानाथ केलें; त्याचप्रमाणें दुर्वास्यांनीं सत्व पाहण्याकरितां आम्हां उभयतांस फार छळिलें पण पुढें आमचें सत्व ढळत नाहीं असें पाहतांच आम्हां उभयतांसही वर दिले. स्त्रियांस जात्याच दागिन्यांची हौस असते. तेव्हां प्रसन्न होऊन दुर्वास्यांनीं वररूप अलंकारांनीं रुक्मिणीचा देह भूषित केला, असें स्त्रीजनास प्रिय अशा शब्दांनीं वर्णन केलें आहे. ११. तावडींत सांपडलेला. हें उत्तरार्धांतील 'देह' ह्या नामाचें विशेषण. १२. महाकसाला=अति दुःखद स्थिति. 'महाकसाल्याला गवसला'=अतिशय दुःखद स्थितीच्या फेऱ्यांत पडलेला. १३. धारण करिता झाला. अन्वयः–'अगइ! महा कसाल्याला गवसला देह, जसा लग्नीं (लग्नाचे वेळीं) शिरःस्नात (ज्यास अभ्यंग नाहाण घडलें आहे असा) [देह] [तसा] कसा शोभा त्याला पहा.' 'अगइ' हें आश्चर्यबोधक अव्यय असून स्त्रीजनाच्याच तोंडीं असतें. केकावली 'म्हणे अगइ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप गा!' केका १० पहा. १४. जातेसमयीं. १५. नम्र झालेल्यास. १६. हेतूतें.

आम्ही शिव, यश द्याया भजकांतें, जाहलों असों देही[1]; ।
कृष्णा! नित्य ब्राह्मणभजनीं ऐसीच मति असों दे[2] ही.' ॥ ९३
वदुनि असें, तेथेंचि प्रभु झाला गुप्त; पुनरपि तयातें ।
देखावेंचि म्हणें मी, स्वःस्थातें[3] जेविं सुनर[4] पितयातें. ॥ ९४
तेव्हांचि प्रद्युम्ना! अतिचित्रा अनुभवूनियां महिम्या, ।
त्वन्मातेसह, न[5] सरों देतां अर्धार्धमात्र[6] यामहि, म्यां, ॥ ९५
ब्राम्हण म्हणेल जें, तें सर्व करावेंचि सर्वदा साचें; ।
हें गुप्त व्रत धरिलें; कीं[7], यांतचि इष्ट सर्व दासाचें. ॥ ९६[8]
तदनंतर भैमीसह आलों होवूनि मुदित बहु धामीं, ।
पाहें मुनिप्रसादेंकरुनि चमत्कार उदित[9] बहुधा मी. ॥ ९७
जो काय दग्ध केला होता मुनिनें पदार्थ, जो भग्न, ।
त्यातें अभिनव[10] पाहुनि, झालों बहु विस्मयांत मी मग्न[11]. ॥ ९८
आंत सदय शांत सदा, दिसला बाहेर मात्र कोपनें[12] गा! ।
प्रभु मद्देहा, गेहा, शोभा दे, कुशल जेविं ओप[13] नगा[14]. ॥ ९९
[15]म्यां देखिलें रुचिर, नव, दृढ, वस्तु सकळ, जया विनाशी, तें. ।
[16]जीं उष्णें, तींच करिल नयनें न इतर तयाविना शीतें. ॥ १००
जें पात्र भंगिलें, जो सुरस उडविला, तयांचि[17] सुरसानें ।
तें पात्र पूर्ण झालें; करि कौतुक[18] काय भूमिसुर[19] सानें[20]?' ॥ १०१

---

१. देही जाहलों असों=मानवदेह धारण केला आहे. २ ठेव, राहूं दे. ३. स्व +स्थ=स्वर्गस्थ, मृत. ४. सुशील मनुष्य. ५. न घालवितां. ६. प्रहराचा चवथा हिस्सासुद्धां. ७. कारण. ८. गीति ९५ व ९६ यांचें युग्मक आहे. युग्मकान्वयः—हे प्रद्युम्ना! तेव्हांचि अतिचित्रा महिम्या अनुभवुनियां, अर्धार्धमात्रहि याम न सरों देतां, 'जें ब्राह्मण म्हणेल तें त्वन्मातेसह म्यां सर्वदा साचें करावेंचि' हें गुप्तव्रत धरिलें; कीं, यांतचि दासाचें सर्व इष्ट [असे]. ९. उत्पन्न झालेले, घडून आलेले. १०. नवा झालेला पाहून. ११. गढलेला, गर्क, दंग. १२. रागावलेला, तापट. १३. जिल्हई. १४. अलंकारास. अन्वयः—प्रभु (दुर्वासा) मद्देहा [व] गेहा शोभा दे, जेविं कुशल (हुशार कारागीर) नगा ओप दे (दागिन्यास जिल्हई देतो). १५. सार्थान्वयः—जया (ज्या वस्तूतें) [तो दुर्वासा] विनाशी, तें सकळ वस्तु रुचिर (सुंदर) नव (नवीन) [व] दृढ (बळकट) [असें] म्यां देखिलें. 'वस्तु' हा शब्द संस्कृताप्रमाणें नपुंसकलिंगीच योजिला आहे. १६. अन्वयः—जीं नयनें उष्णें (दुःखाश्रूंनीं) तापलेलीं [आहेत] तींच नयनें तयाविना (दुर्वास्याशिवाय) इतर (दुसरा कोणीहि) शीतें (आनंदाश्रूंनीं गार) न करील. दुःखितांना सुखी करावें असें दुर्वास्यानेंच, इतरांना तें साधणें नाहीं, हा भाव. १७. त्याच. १८. चमत्कार. १९. ब्राह्मण, दुर्वासा. २०. लहानसहान.

तुंडवी, उडवी, पूर्वी कोपोनि न ज्या मनोरमा ल्याला, ।
त्याचि पहाता झालों रम्या फुल्ला गृहांत माल्याला. ॥ १०२
जे पूर्वदग्ध, झाले पर्यंक प्रकट शुचि नवे दांत; ।
विप्रप्रसाद जैसे ते देती, तेविं रुचि न वेदान्त. ॥ १०३
ऐसा परम क्षोभचि झाला परम प्रसाद बा! गा! तो; ।
हा कृष्ण विप्रमहिम्या, इतरांसि म्हणावया 'दबा,' गातो. ॥ १०४
त्यांपासुनि देहानें, वाचेनें, प्रेमयुक्त चित्तानें, ।
विप्रासि रौक्मिणेया! मी पूजितसें सदैव वित्तानें.' ॥ १०५
यापरि कथिलें धर्मा! म्यां प्रद्युम्नासि तेंचि तुज राया! ।
सत्य वदविलें भीष्में विप्रभजनशुद्धमार्ग उजराया." ॥ १०६
रामसुत मयूर म्हणे, 'जाणेल निका मनीं चमत्कृतिला; ।
नुमजुनि कथे! न मानिल तुज, तेविं निकाम नीच मत्कृतिला.'॥१०७

---

१. अन्वयः–ज्या मनोरमा (सुंदर) [माल्याला] पूर्वी कोपोनि [तो] तुडवी [व] उडवी [व] न ल्याला (अंगावर अलंकाराप्रमाणें धारण न करी) त्याचि माल्याला (फुलांना) गृहांत रम्या [व] फुल्ला (टवटवीत) [अशा] पहाता झालों. २. पलंग. ३. प्रकट झाले=उदय पावले, उत्पन्न झाले. ४.हस्तिदंताचे. हें 'पर्यंक' ह्याचें विशेषण. ५. अन्वयार्थः—विप्रप्रसाद (ब्राह्मणांचे प्रसाद, ब्राह्मणांची कृपा) जैसे रुचि (गोडी) देती (देतात) तेविं (त्या प्रकारची) रुचि वेदान्त न (देती). ६. सार्थान्वयः—बा! गा! ऐसा (या प्रकारें) तो [दुर्वास ऋषीचा] परम क्षोभचि (विलक्षण रागच) परम प्रसाद (शेवटीं मोठ्या प्रसादाप्रमाणें) झाला. [म्हणून] हा कृष्ण इतरांसि 'दबा' (ब्राह्मणांपुढें नम्र व्हा) म्हणावया विप्रमहिम्या (ब्राह्मणमाहात्म्यातें) गातो (वर्णन करितो). ७. तेव्हांपासून. ८. रुक्मिणीपुत्रा, प्रद्युम्ना. ९. ह्याप्रमाणें. १०. सार्थान्वयः–विप्रभजनशुद्धमार्ग (ब्राह्मणभक्तीचा पवित्र रस्ता) उजराया (उजळ करण्याकरितां) सत्य. (खरें तें) भीष्में वदविलें. ११. शुद्ध अंतःकरणाचा, सुशील. १२. चमत्कारातें. १३. न+उमजुनि=बोध न झाल्यामुळें. १४. अत्यंत क्षुद्र. १५. मत्+कृतिला=माझ्या ग्रंथास. अन्वयार्थः–रामसुत मयूर म्हणे 'निका मनीं चमत्कृतिला (या कथेच्या कौतुकाला) जाणेल; [हे] कथे! निकाम नीच [मात्र] नुमजुनि, [जेविं] तुज तेविं मत्कृतिला (माझ्या ग्रंथास) [ही] न मानिल (मान देणार नाहीं). जे शुद्ध अंतःकरणाचे म्हणजे अर्थात् भाविक आहेत, त्यांच्या मनावर ह्या दुर्वासकृत सत्वपरीक्षणाचा रम्य ठसा बरोबर वठेल; पण जे हलकट आहेत, त्यांस ह्या कथेपासून बोध न झाल्यानें ते हिला तुच्छ करितील व त्याप्रमाणेंच माझ्या ग्रंथासही न समजल्यामुळें दोष देतील, असा कवीचा आशय. आपली कृति जरा दुर्बोध पण सरस व सुज्ञांस मान्य अशी आहे, असें पंतांनीं या गीतींत ध्वनित केलें आहे. आपल्या कृतीचे गुणदोष पंतांना कळतच होते, असें यावरून स्पष्ट दिसतें.

## अध्याय आठवा.

व्यास म्हणे, "गांगेया! श्रवण करुनि सर्व दानधर्मातें, ।
नृप पावला प्रकृतितें, अमृतें रोगार्त जेविं शर्मातें. ॥ १

त्वां मेघें केला हा गर्जुनि कौंतेय[3]मोर सानंद, ।
बोध दिल्हा पुष्कळ यां, कृष्णा दे जेविं गोरसा नंदें. ॥ २

धर्ममना बोध सुखद झाला, मणिलाभ जेविं उरगमना; ।
आतां आज्ञा द्यावी या कुंतीनंदनासि पुरगमना." ॥ ३

भीष्म म्हणे "स्वपुरातें त्वां सद्गुणहंसमानसा! जावें, ।
स्वपदीं देवेंद्रापरि होउनि बहु पूज्यमान साजावें. ॥ ४

सुश्री, सुकीर्ति, होइल गतिही बरवी; प्रजाचि रंजीव[15]. ।
त्या काळहि कर जोडी, म्हणती वरें[16] विप्र ज्या 'चिरं[17] जीव[17].' ॥ ५

वाढे प्रताप सुकृतें, अल्पहि जो अग्नि, जेविं तो धमनें. ।
लुब्धें धनसंचयसा, संरक्षावा जपोनि बोध मनें. ॥ ६

---

१. अंतःकरणाची मूलस्थिति, मनाचें स्वास्थ्य. प्रकृतीची व्याख्या वामन पंडित अशी करितातः—जे आपली स्वच्छ मती । तेचि म्हणावी **प्रकृती** । ते घाबरी होतां, तिचे होती । विपरीत भाव. ॥ दूरी होतां घाबरेपण । जो स्वस्थ होतो आपण । तो प्रकृतींत पावला हे खूण । अर्जुन सांगे आपली. ॥ स्वस्थ चित्त जालें । तें आपल्या प्रकृतीतें पावलें । तेव्हां मन आटोपलें । जें घाबरें होतें अत्यंत. ॥ (यथार्थदीपिका, अ० ११, ओंव्या ९८८–९९०). २. सुखातें. ३. कुंतीपुत्ररूपी मोर. ४. धर्मराजास. ५. दूध, दहिं वगैरेंस. ६. श्रीकृष्णाचा पिता. श्रीकृष्ण वसुदेवाचा मुलगा, पण नंदानें व यशोदेनें त्यास अगदीं लहानपणापासून वाढविलें होतें. ७. रत्नप्राप्ति. जातिवंत नागाच्या फडेवर मणि असतो व तो फार सतेज असतो. तो सर्व सर्पांस असत नाहीं; तेव्हां ज्यांच्या फणेवर तो असतो, त्यांस त्यामुळें आनंद वाटणें साहाजिक आहे. ८. उरग=उरसा गच्छतीति, छातीनें चालणारा. सर्पांस पाय नाहींत व तो छातीनें सर्पटत जातो, म्हणून त्यास 'उरग' म्हणतात. ९. हस्तिनापुरातें. १०. सद्गुणरूप राजहंसाच्या मानससरोवरा! मानससरोवर असें हंसाचें वसतिस्थान आहे, त्याप्रमाणें तूं सद्गुणांचें माहेर आहेस, असा भाव. ११. आपल्या अधिकाराचे ठायीं अर्थात् सिंहासनीं. १२. पूजित होत्साता, मान्य. १३. शोभावें. अन्वयः—देवेंद्रापरि पूज्यमान होउनि स्वपदीं बहु साजावें. १४. उत्तम लक्ष्मी, मोठें वैभव. 'होईल' या क्रियापदाचे 'सुश्री' 'सुकीर्ति' व 'गति' हे सर्व कर्ते होत. १५. संतुष्ट ठेव. पाठभेदः—प्रजा चिरंजीव. १६. श्रेष्ठ. १७. दीर्घ काळपर्यंत जीवंत रहा. १८. सार्थान्वयः—[अल्पहि] प्रताप सुकृतें (पुण्यानें) वाढे, जेविं जो अल्पही अग्नि, तो धमनें (फुंकण्यानें) [वाढे].

यावास आणुनि घनश्यामास दयासुधारसमयास; ।
व्हावा सहाय घेउनि करवाल जसा सुधार समयास. ॥ ७
होतांचि उत्तरायण ये मज जात्यास बोळेवायास. ।
मुनिहो! या सर्व तुम्ही, स्वपदरजांमाजि घोळवा यास." ॥ ८
भीष्मासि धर्म वंदी भ्रात्यांसह, त्याहि केशवासहित, ।
यत्पदपद्माचा करि मातृशतांहूनि लेश वास हित. ॥ ९
करुनि पुढें गांधारीसह धृतराष्ट्रास, शक्रसम हर्षी, ।
गेला पुरा युधिष्ठिर राजा, सभ्रातृवर्ग, समहर्षी. ॥ १०
प्रेषी स्वस्थानाप्रति सत्कारुनि पौरजानपदलोक; ।
सांत्वुनि हरि स्त्रियांचा दानेंमानेंकरूनियां शोक. ॥ ११
शुद्धें चित्तें वित्तें नमुनि यथायोग्य गौरवि, प्राशी ।
सादर चकोरसा तो कौंतेय सुधांशुगौर विप्राशी. ॥ १२

---

१. सार्थान्वयः–सुधार (उत्तम धारेचा) करवाल (खड्ग) घेउनि जसा सहाय (मित्र) समयास (ऐन प्रसंगीं, वेळेवर) व्हावा (असावा, पाहिजे;) [तसा तूं] दयासुधारसमयास (दयारूप सुधेच्या रसानें भरलेल्या) घनश्यामास (घननीळाला, कृष्णाला) आणुनि यावास (तूं यावेंस अशी माझी इच्छा आहे). 'यावास' ह्या विध्यर्थांत इच्छा व्यक्त होते, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. २. सूर्य मकरराशीस आला म्हणजे उत्तरायण सुरू होतें. तो कर्कराशीस गेला म्हणजे दक्षिणायन लागतें. ३. जाणाऱ्यास अर्थात् इहलोक सोडून जाणाऱ्यास. ४. पाठवणी करण्यास, निरोप देण्यास. ५. यास (मला भीष्माला) स्वपदरजांमाजी (आपल्या चरणधूलींत) घोळवा–अर्थात् तुमची चरणधूली मजवर पडो. हल्लीं प्रचलित असलेला मराठी प्रयोग पहा–'पायधूळ झाडा'. ६. सार्थान्वयः–यत्पदपद्माचा (ज्याच्या चरणकमलाचा) लेश (थोडासा, अल्पमात्र) वास (सान्निध्य किंवा गंध) मातृशतांहूनि (शेंकडों आयांपेक्षां अधिक) हित (कल्याण) करी. ७. पुरगमनाचे वेळीं अग्रस्थान चुलता व चुलती यांस देऊन, त्यांच्या मागून धर्मराज चालूं लागले, ह्यावरून वडिलांविषयीं त्यांचा किती आदर होता, हें व्यक्त होतें. ८. इंद्रासारखा. ९. संतोष पावलेला. १०. स+महा+ऋषि=मोठमोठ्या ऋषींसहवर्तमान. ११. पौर=नागरिक. जानपद=खेड्यांत राहणारे लोक. पौरजानपदलोक=सर्व प्रजाजन. १२. हस्तिनापुरांतील योद्धे कुरुक्षेत्रीं समर करण्यास गेले व तेथें पुष्कळांचा अंत झाला, ह्यामुळें मागें राहिलेल्या त्यांच्या स्त्रिया शोकाकुल झाल्या. अशा स्त्रियांस देणग्या देऊन म्हणजे अर्थात् त्यांच्या पोषणाची तजवीज करून व त्यांचा मोठा सन्मान करून धर्मानें त्यांचें समाधान केलें. राजांनीं प्रजेबद्दल कशी काळजी वाहावी, ह्याचा हा उत्तम मासला आहे. १३. सार्थान्वयः–तो कौंतेय (धर्मराज) [विप्रांतें] शुद्धें चित्तें (मोकळ्या मनानें) नमुनि, वित्तें (द्रव्यद्वारा) यथायोग्य गौरवि

वारी अवृष्टिचा बहु तो भीष्मचि गाधिसुत ऋषी वळसा, ।
ओळे धर्मघन, सुखी होय जन समग्रही कृषीवळसा. ॥ १३
होता पुरीं युधिष्ठिर लोकव्यवहार चालवीत नयें, ।
जो कथिला सर्वज्ञें सद्गतिकीर्त्यर्थ जान्हवीतनयें, ॥ १४
सरतांचि दक्षिणायन शांतनवप्रोक्त समय आठवुनी, ।
साहित्य पुढें चंदनघृतरत्नसदंबरादि पाठवुनि, ॥ १५
गांधारी, धृतराष्ट्र, भ्राते, कुंती, युयुत्सु, युयुधान, ।
याजक, विदुर, जनार्दन, होतो ज्यांचा सभेंत बहुमान, ॥ १६
या सर्वांतें घेउनि, अग्नि पुढें करुनि राज आज्याचे, ।

---

(सत्कार करिता झाला); [व] सुधांशुगौर (चंद्रासारखा स्वच्छ, अर्थात् शीतळ व तापहारक) विप्राशी (ब्रह्मवृंदाचा आशीर्वाद) चकोरसा (चकोरपक्ष्याप्रमाणें) प्राशी. 'चंद्रचकोर' कविसंकेत सर्वप्रसिद्ध आहेच. धर्मराजास चकोरपक्ष्याची, व विप्राशीर्वादास चंद्राची उपमा दिल्यामुळें पंतांनीं 'प्राशी' हें क्रियापद योजिलें आहे.

१. सार्थान्वयः–तो भीष्मचि गाधिसुत ऋषी (तो भीष्म हाच विश्वामित्र, भीष्मरूपी विश्वामित्र) बहु अवृष्टीचा वळसा (अवर्षणाचा फेरा, दुष्काळाचें संकट) वारी (टाळी), [व] धर्मघन (धर्मराजरूपी मेघ) ओळे (वर्षे, पडे); समग्रही जन (अवघे प्रजाजन) कृषीवळसा (शेतकऱ्यांप्रमाणें) सुखी होय. एकदा भयंकर दुष्काळ पडला असतां विश्वामित्रानें प्राणसंरक्षण करण्यासाठीं एका चांडाळाजवळून कुत्र्याची तंगडी मागून घेतली. नंतर त्या ब्रह्मर्षीनें आपल्या कुटुंबासह तें श्वमांस पकवून खाण्यासाठीं तयार केलें. परंतु तें खाण्यापूर्वी देवसंतर्पण यथाविधि करण्याचा संकल्प करून, विश्वामित्रानें ऐंद्राग्नेयविधीनें चरु कढविला व निरनिराळ्या देवांना व पितरांना भाग देण्यास आरंभ केला. पण इंद्रादि देवांना भाग देतांक्षणींच, इंद्रानें पर्जन्य पाडिला, प्रजांचे प्राण वांचले, वनस्पती उगवल्या व दुष्काळाचा वळसा टळला; या गोष्टीवर येथें कटाक्ष आहे. २. प्रजाजनांचा न्याय; अर्थात् प्रजाजनांच्या उत्पन्न झालेल्या तंट्यांची योग्य तडजोड करणें. न्यायकारभार. ३. राजधर्मानें, नीतीस अनुसरून. ४. जो नय. ५. सत्+गति+कीर्ति+अर्थ=मोक्ष व यश यांच्या प्राप्तीस्तव. ६. गंगा-पुत्रानें, भीष्माचार्यानें. ७. दक्षिणायनामध्यें वैकुंठाचीं द्वारें लाविलेलीं असतात, त्यामुळें दक्षिणाय-नांत मरण आल्यास, प्राणी कितीही पुण्यवान् असला, तरी त्यास वैकुंठप्राप्ती होत नाहीं व म्हणू-नच भीष्माचार्य हे दक्षिणायन संपून उत्तरायण सुरू होईपर्यंत शरशय्येवर प्राणोत्क्रमण न होऊं देतां राहिले होते. मागें गीति ८ 'होतांचि उत्तरायण' इ० भीष्मोक्ति पहा. ८. चंदन+घृत+सत् +अंबर+आदि=चंदन, तूप, उत्तम वस्त्रें इत्यादि. ह्या गोष्टी अंत्यविधीच्या वेळीं लागतात. गीति १५, १६, व १७ यांचें विशेषक असल्यामुळें एकच अन्वय करावा. द्वाभ्यां **युग्म**मिति प्रोक्तं त्रिभिः श्लोकै**र्विशेषकम्** । **कलापकं** चतुर्भिः स्यात्तदूर्ध्वं **कुलकं** स्मृतम् ॥ ९. आज्याचे राज=तुपाचे अधिपती (असे अग्नी). पाठभेदः–राजराजाचे.

गेला पाय पहाया [1]गुरुवत्सल धर्मराज [2]आज्याचे. ॥ १७

जाऊनि कुरुक्षेत्रीं त्या श्रीभीष्मासमीप तो पावे; ।

श्रीव्यास नारद निकट ज्याच्या, [3]ज्यांहीं [4]पुंमर्थ [5]ओपावे. ॥ १८

[6]नानादेशसमागत नृपतिमुनि न वदति निकट लेश, तशा ।

पाहे, गमे पिपीलिक त्या गुडराशीस चिकटले शतशा. ॥ १९

[7]उतरुनि धर्म नमी त्यां; जे [8]विपुल [8]अलिप्त, जेविं गगन, मुनी; ।

वदला विनयें ऐसें श्रीगंगानंदनासि मग नमुनी. ॥ २०

“[9]तो हा नमितो, वदतो, पढविशि तूं मनुजदेव कीरा ज्या; ।

आला असे पहा तो, जो प्रसवलि तनुज देवकी, राजा ! ॥ २१

[10]सस्त्रीक ज्येष्ठ[11] तनय आला आहे, [12]कनिष्ठही राया ! ।

नेत्रें उघडूनि पहा राजेंद्रा ! [13]सुज्ञमुकुटहीरा ! या. ॥ २२

---

१. वडील माणसांच्या ठायीं निष्ठा ठेवणारा. २. आजोबाचे, भीष्माचे. ३. नारदादिकांनीं. ४. धर्मार्थकाममोक्ष हें चतुष्टय. ५. द्यावे. ६. सार्थान्वयः–नानादेशसमागत (अनेक देशांतून आलेले) नृपतिमुनि (राजे व ऋषि) [ज्या] निकट लेश (किंचित्‌ही) न वदति, तशा [शरपंजरीं पडलेल्या भीष्माला] (धर्मराज) पाहे, [व] [त्यास] गमे (=वाटे, वाटलें) [कीं] त्या गुडराशीस (भीष्माचार्यरूप गुळाच्या ढेपीस) शतशा (शेंकडों) पिपीलिक (मुंगळे) चिकटले. गुळास जशा मुंग्या लागतात, त्याप्रमाणें ह्या सर्वज्ञात्या भीष्माचार्याजवळ गोळा झालेला नृपगण व मुनिवृंद धर्मराजास दिसला. ७. वाहनावरून उतरून. ८. येथें ‘विपुल’ व ‘अलिप्त’ हे शब्द श्लिष्ट आहेत. विपुल=(१) (गगनपक्षीं) अमर्याद, विस्तृत; (२) (मुनिपक्षीं) विशाल दृष्टीचे किंवा अंतःकरणाचे, ज्यांचे विचार किंवा नजर कोती नाहीं असे. अलिप्त=(१) (गगनपक्षीं) सर्वव्यापी, परंतु कोणत्याही पदार्थांत न मिसळणारें. (२) (मुनिपक्षीं) संसारांत राहणारे, परंतु विषयाधीन किंवा काम्य कर्मांत गुंतलेले नाहींत, असे. ज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायांत भगवद्भक्तांचीं लक्षणें सांगतांना हीच उपमा योजिली आहे व ‘विपुल’ व ‘अलिप्त’ यांच अर्थीं त्यांनीं अनुक्रमें ‘व्यापक’ व ‘उदास’ हे शब्द वापरले आहेतः–व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश। तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ! ॥ (ज्ञानेश्वरी, अ० १२, ओंवी १८०.) ९. सार्थान्वयः–ज्या कीरा (पोपटास) तूं मनुजदेव (नरपति) पढविशि (बोलावयास शिकविलेंस), तो हा (मी धर्मराज) नमितो [व] वदतो. पोपटास जें शिकवावें तें ज्याप्रमाणें तो जसेंच्या तसेंच बोलतो त्याप्रमाणें भीष्माचार्यांनीं जें जें शिकवावें, तें तें अगदीं बरोबर वठविणारे धर्मराज होते. १०. गांधारीसहवर्तमान. ११. धृतराष्ट्र. १२. कनिष्ठही [तनय]=विदुर. धृतराष्ट्र व विदुर हे भीष्माचे पुतणे, व म्हणून मुलांसारखे होत. १३. विद्वानांच्या मुकुटमणे, सुज्ञश्रेष्ठा.

भीम, सिताश्व, नकुळ, सहदेव तुझे नमिति पाय; हेमा जी ।
[1]न म्हणे तवचरणरजोधिक, करिती नमन माय हे माजी. ॥ २३

नृप, मुनि, [2]कुरु, [3]जांगळजन, [4]देवर्षिहि, पातला असे व्यास; ।
आले सेव्य तरुकडे [5]द्विजे जेविं, त्यजुनियां [6]असेव्यास. ॥ २४
हे ऋत्विक् सर्व तुझे आले घेऊनि अग्नि समयास; ।
साहित्य सकळ केलें श्रीकृष्णें, हें सुचेल न [7]मयास. ॥ २५
नेत्रें उघडुनि [8]राजा! आम्हां सर्वांकडे पहा, बोल; ।
[9]तववचनामृतपानीं झाले आहेत कर्ण हे [10]लोल." ॥ २६
उघडुनि नयनें [11]भीष्म, प्रेक्षुनि सर्वांकडे, म्हणे 'धर्मा! ।
आलासि बरा [12]समयीं, वत्सा! मी बहुत पावलों [13]शर्मा. ॥ २७
[14]सित [15]पक्ष, [16]माघ कीं हा? शरशयनीं बहुत जाहलों कष्टी, ।
बापा! वर्ष[16]शतासम म्यां [17]द्व्यूना रात्रि कंठिल्या [18]षष्टी. ॥ २८

१. सार्थान्वयः—जी हेमा (सुवर्णास) तव चरणरजोधिक (तुझ्या चरणधूळीपेक्षां अधिक) न म्हणे [=जिला तुझ्या पायधूळीपुढें सुवर्ण कःपदार्थ वाटतें] [ती] हे माजी (माझी) माय (कुंती) नमन करिती (वंदन करीत आहे). स्त्रीजातीस स्वभावतःच सुवर्ण व अलंकार ह्या गोष्टी अत्यंत प्रिय असतात, तेव्हां स्त्रिया व त्यांच्या प्रियवस्तु ह्यांचा उल्लेख करण्याचे प्रसंगीं पंत ह्याच संबंधाच्या उपमा व दृष्टान्त वारंवार योजितात. (मागें अ० ७ गीति ९० पहा.) २. कुरुदेश किंवा सर्व कुरुकुलोत्पन्न जन. ३. जंगलांतील रहिवाशी. ४. नारद. ५. पक्षी. ६. आश्रय करण्यास अयोग्य अशास. ७. मय हा असुरांचा शिल्पकार (=कारागीर). मयासुर हा अत्यंत कल्पक होता, असें असून, त्याच्याही ध्यानांत ज्या गोष्टी आल्या नसत्या, त्या सर्व गोष्टींची तयारी श्रीकृष्णांनीं केली. ८. भीष्माचार्या! ९. तुझ्या भाषणरूप अमृताचें प्राशन करण्यांत. १०. ज्यांना चट लागली आहे असे, उत्सुक. ११. पाठभेदः—भीष्में. १२. वेळेवर. १३. सुखातें. १४. शुद्ध किंवा शुक्ल पक्ष, पहिला पंधरवडा. १५. माघ महिना. १६. शंभर वर्षांप्रमाणें. १७. द्वि+ऊना=दोहोंनीं उण्या, कमी. द्व्यूना षष्टी=दोन कमी साठ. १८. साठांमध्यें दोन कमी म्हणजे ५८ रात्री भीष्माचार्यांनीं शरपंजरीं पडून घालविल्या. भीष्माचार्य माघशुद्ध अष्टमीस निजधामास गेले. त्यापूर्वी ५८ दिवस ते शरपंजरीं होते व भारतीयुद्धांत प्रथम दहा दिवसपर्यंत ह्यांच्याकडे सेनानायकत्व होतें; ह्यावरून भारतीयुद्धास आरंभ जाहल्यापासून ६८ दिवसांनीं ह्यांचा काल झाला. तेव्हां, भारतीयुद्धास केव्हां आरंभ झाला हें ह्यावरून ठरविण्याजोगें आहे. प्राचीन विषयजिज्ञासूंस हातीं घेण्याजोगा हा विषय आहे व ज्योतिषीवर्गासही, 'चांद्रमास किंवा सौरमास धरून त्या मानानें अधिक महिन्याची व्यवस्था लावणें, तसेंच भारतीयुद्धास प्रारंभ झाल्यादिवशीं असणाऱ्या शुभाशुभ मुहूर्तांची चर्चा करणें, व भारतीयुद्धापासून आजपर्यंत लोटलेल्या काळाचें परिगणन करणें व त्यावरून ग्रहांमध्यें पडलेला फरक पाहणें इत्यादि' गोष्टीसंबंधानें बारकाईनें शोध करण्यास, हें चांगलें साधन आहे.

वत्सा! धृतराष्ट्रा! तूं ज्ञाता, तुज पाठ चारही वेद, ।
भावि[1] कदापि चुकेना, आतां कांहीं करूं नको खेद. ॥ २९
तुजला देवरहस्य[2] व्यासापासुनि असे विदित राजा[3]! ।
सत्सूक्ति[4] सेविल्या त्वां, न मिळोव्या[5] संसृतींत[6] इतरा ज्या. ॥ ३०
हे पांडुचे जसे सुत, धर्में[7] तैसेचि सर्व तव राया! ।
गुरुवत्सल[8] धर्म, समज अचळत्वें तुल्य पर्वतवरा या. ॥ ३१
चिंतामणिची[9] तापा जसि न, करुनि शर्महानि, दे शाला, ।
सत्संगति तसि; न तुझ्या उल्लंघिल धर्म हा निदेशाला[10]. ॥ ३२
पुत्र[11] न ते अतिदारुण खळ तक्षक सर्प पाकवणवेच; ।
तच्छोकें तेजाचा, सुज्ञ असुनि, करिल बा! कवण वेच?' ॥ ३३
इतुकें धृतराष्ट्राला सांगुनि, मग त्यांसि[12] आपगातनय[13] ।

---

१. होणारें, घडून येणारें. २. देवांची गुप्त गोष्ट. ३. धृतराष्ट्रा! ४. उत्तम उपदेश. ५. मिळण्याजोग्या नाहींत, दुर्मिळ आहेत. ६. संसारामध्यें. जो सदुपदेश अन्यजनांस ह्या संसारयात्रेंत सहसा लाभण्याजोगा नाहीं, असा भाव. ७. धर्मशास्त्रदृष्ट्या हे पांडव जरी वस्तुतः पांडूचे पुत्र, तरी धर्मशास्त्रानुरोधानें हे तुझेही आहेत; कारण, तुला पाणी देण्याचा अधिकार धर्मशास्त्रानें ज्याप्रमाणें तुझ्या पुत्रांस प्राप्त होतो, त्याप्रमाणें ह्या पांडवांसही आहे. ८. सार्थान्वयः—धर्म गुरुवत्सल (वडिल माणसांचे ठायीं आदरबुद्धि ठेवणारा) [आहे]; अचलत्वें (स्थैर्यामुळें, पक्षीं धर्मनियमबाह्य आचरण न करण्याच्या दृढनिश्चयावरून) या (ह्या धर्मराजास) पर्वतवरा (पर्वतश्रेष्ठाच्या, मेरुपर्वताच्या) तुल्य(बरोबरीचा) समज. ९. सार्थान्वयः—जसी चिंतामणिची शाला (=घर, इमारत), तसी सत्संगति, शर्महानि (=सुखाचा भंग) करुनि तापा न दे. चिंतामणि हा सर्व चिंता–इच्छा–पुरविणारा मणि आहे. तेव्हां जी इमारत या मणींनीं रचिली आहे, तींत राहणाऱ्याला सुखभंग व संताप हे कधींच शिवणार नाहींत; आणि या सुख देण्याच्या कामांत सत्संगतिही (=सज्जनाचें सान्निध्य, मैत्री) अगदीं हुबेहूब तशीच आहे, हा भाव. अर्थसादृश्यः—(१)प्रीति प्रभुची, चिंतामणिची जसि सर्व काम दे शाला. ॥ मोरोपंती अश्वमेधपर्व, ६।१३८. (२) देती स्त्रियांसि सुख पति जाउनि येऊनि जेविं देशाला । श्रीमुनिकरुणा चिंतामणिरचिता सर्व तेविं दे शाला ॥ मोरोपंती आश्रमवासिपर्व, ६।१६. पाठभेद । 'चिंतामणि चिंता या जसि न करुनि' इ०. १०. आज्ञेला. ११. सार्थान्वयः—ते (तुझे मुलगे) पुत्र न; (त्यांस पुत्र म्हणतांच येत नाहीं. कारण 'पुंनाम नरकात्त्रायतेऽसौ पुत्रः' 'पुं'नामक नरकांतून सुटका करणारा तो 'पुत्र' होय). [ते] अतिदारुण, खळ तक्षक सर्प पाकवणवेच (परिणामीं शुद्ध दावानलाप्रमाणें) [होत]; बा! (हे धृतराष्ट्रा) तच्छोकें (त्यांच्याविषयीं शोक करून) कवण (कोण) सुज्ञ (शहाणा) असूनि, तेजाचा वेच (हानि, नाश) करील? पाक=परिणाम. १२. श्रीकृष्णास. १३. गंगापुत्र, भीष्माचार्य.

नमि, [1]ज्याचे रिपु वसले ज्यासह होऊनि आप गात नय. ॥ ३४
'चालाया, बोलाया देसी जीवांसि तूंचि दे[2]वाद्या! ।
[3]पुतळीस सूत्रधारक कीं वादक शक्ति जेविं दे वाद्या. ॥ ३५
पांडव आहेत तुझ्या पदरीं, म्यां [4]रीति म्हणुनि नि[5]रवावे. ।
[6]आप्तत्व तुजपुढें बा त्रिजगज्जनका! कशास मिरवावें? ॥ ३६
मज [7]भक्तवत्सला! त्वां आज्ञा द्यावी [8]शरीर सोडाया, ।
[9]देसील तूंचि, सुकृत न माझ्या पदरांत सुगति जोडाया? ॥ ३७
[10]हा घेतो जेणें तव नाम, परा मुख न वासु देवा तें. ।
[11]मागेन, भजन सोडुनि, दुसरें तुज सुख न वासुदेवातें. ॥ ३८
[12]उक्त न करुनि, सुयोधन दुर्मति बुडवुनि घरा, बुडालाच. ।

---

१. सार्थान्वयः—ज्याचे (=ज्या कृष्णाचे) रिपु (शत्रुवर्ग) ज्यासह (=ज्या कृष्णासह) आप (=आप्त) होउनी, नय (वर्तन, रीति) गात (स्तवीत) बसले. कृष्णाचे वैरीसुद्धां आपल्या दृढ विरोधी भक्तीनें मुक्त होऊन त्याचे आप्त होऊन बसले, या गोष्टी येथें संधेय आहेत. सर्वसंग्रहाची 'आप' यावर 'उदक, थंड असा भाव' अशी टीप आहे. २. आदिदेवा! ३. सार्थान्वयः— सूत्रधारक (कळसूत्रें चाळणारा) पुतळीस (=बाहुलीस) कीं (किंवा) वादक (वाजविणारा) वाद्या जेविं शक्ति दे, [तेविं] देवाद्या! तूंचि जीवांसि (प्राणिमात्रांस) चालाया बोलाया [शक्ति] देशी. 'चालाया' व 'बोलाया' हीं दोन्ही जीवास लागू होतात, परंतु त्यांपैकीं एकेकच अनुक्रमें 'पुतळी' व 'वाद्य' यांस लागू होतें. आंग्ल कविशिरोमणी शेक्स्पीयर ह्यांनीं आपल्या विख्यात ह्याम्लेटनामक नाटकांत पांचव्या अंकांत अलगुजाविषयीं असेंच ह्मटलें आहे. ४. शिष्टाचार. ५. द्यावे, घालावे. ६. आप्तत्व मिरवावें=नात्याबद्दल डौल, फुशारकी मारावी. तूं जगत्त्रयाचा पिता आहेस व पित्याइतकी मुलाची कळकळ करणारा दुसरा नाहीं; तेव्हां पांडवांच्या हिताची कळकळ तुझ्यापेक्षां माझी काय असणार, असा भीष्मोक्तीचा भाव. ७. भक्तांच्या वाली. ८. देह ठेवण्यास. ९. अन्वयार्थः—तूंचि सुगति देसील (=कृष्णा! तूंच मला सुगति दिलीस तर दिलीस) [नाहीं तर ती मला कांहीं मिळणार नाहीं,] [कारण] सुगति जोडाया (=मोक्ष मिळविण्यापुतें) सुकृत (=पुण्य) माझ्या पदरीं न. १०. सार्थान्वयः—हा (=मी भीष्म) जेणें (ज्या मुखानें) तव नाम घेतों, तें मुख परा देवा (=इतर देवांजवळ) न वासू (=न वेंगाडू, याचना न करूं). कृष्णा! तूं मजवर कृपा करच. ज्या तोंडानें मी तुझें नाम जपतों, त्याच तोंडानें इतरांजवळ याचना करण्याचा प्रसंग न येवो; त्यांत तुला व मला दोघांनांही हीनत्व आहे, हा भीष्माचा भाव. ११. अन्वयः—तुज वासुदेवातें (=तुझ्याजवळ) भजन सोडुनि (भजनाव्यतिरिक्त) दुसरें सुख न मागेन. १२. सार्थान्वयः—दुर्मति (दुष्टबुद्धि) सुयोधन, उक्त न करुनि (तूं सांगितल्याप्रमाणें न वागून; किंवा योग्य आचरण न ठेवून) घरा बुडवुनि (कुलाचा नाश करून) [स्वतः] बुडालाच; ज्या कलशाच्या (घागरीच्या) बुडालाच (तळाशींच) घरा (छिद्र) [आहे], तो (तो कलश) सद्रसा (उत्तम पातळ पदार्थास, पाणी दूध वगैरेंस) कसा धरील?

धरिल कसा सद्रस तो, ज्या कलशाच्या घरा बुडालाच? ॥ ३९
व्यासेंहि नारदेंही तूं मजला मधुरिपो! केळविलास, ।
तन्हिच तुजपुढें शत्रुश्रीचे दुर्जयहि पोकळ विलास. ॥ ४०
नारायणा! त्वदाज्ञा होतां हा, 'जेविं मंडपा वेल, ।
उत्तमलोकासि तुझा सेवक, होऊनि थंड, पावेल.' ॥ ४१
कृष्ण म्हणे, 'या लोकीं, म्हणसी होवूनि सज्ज, न वसूं; तें, ।
रुचलें; जा पाव सुखें भीष्मा! तूं सुज्ञ सज्जन वसूंतें. ॥ ४२
या लोकीं तुज कांहीं शांतनवा! लेशमात्र अघ नाहीं, ।
कामशरांहीं भिन्न प्रभु तूं, वज्राद्रि जेविं न घनांहीं. ॥ ४३
मार्कंडेय तसा तूं पितृभक्त, मुनींद्र वर्णिती बा! हे, ।
यास्तव मृत्यु तव वशीं आनत होऊनि भृत्यसा आहे.' ॥ ४४

१. मधुनामक राक्षसाचा वध करणाऱ्या, श्रीकृष्णा! २. गीतीचा भावार्थः—तूं कोण ही ओळख व्यास, व नारद ह्यांसारख्या महर्षींनीं मला करून दिली; अर्थात् तुझा मोठेपणा, व तुझी ओळख सामान्य जनास होण्याजोगी नाहीं; ह्यावरून अशा ह्या तुजपुढें कोणाचेंही कांहीं चालणार नाहीं, हा निघणारा ध्वनि पंतांनीं उत्तरार्धांत 'तन्हिच=म्हणूनच' अशा शब्दानें स्पष्ट व्यक्त केला आहे. ३. सार्थान्वयः—तन्हिच (म्हणूनच) दुर्जयही (=जिंकण्यास कठिण अशा) शत्रुश्रीचे (शत्रूच्या लक्ष्मीचे) विलास तुजपुढें पोकळ (व्यर्थ) [आहेत]. टीपः—'शत्रुश्री' असा शब्द घातल्यामुळें स्त्रीस्वभावानुरूप ज्या चेष्टा त्या व्यक्त व्हाव्यात म्हणून 'विलास' असा शब्द योजिला आहे. ४. उत्तम लोक ह्या मृत्युलोकाच्या वर आहे, ह्या संकेतास अनुसरूनच ही उपमा दिली आहे. वेलाची गति नेहमीं वर जाण्याची असते. ५. शरीरसंताप व मानसिक दुःख ह्यांपासून मुक्त होऊन किंवा प्राणज्योती विझून. (वेलाच्या पक्षीं) पाण्यानें गार होऊन. ६. सार्थान्वयः—कृष्ण म्हणे, सज्ज होवूनि (आत्मलोकीं जाण्यास तयार झाल्यावर), या लोकीं (मृत्युलोकीं) न वसूं (न राहावें) [असें जें] म्हणसि, तें रुचलें (मला आवडलें); [हे] भीष्मा! तूं सुज्ञ (शाहणा) [व] सज्जन (साधु, सत्पुरुष) जा (इहलोक सोड) [व] वसूंतें सुखें (आनंदानें) पाव. आठ वसूंपैकीं तिसरा जो सोम त्यास शाप झाल्यामुळें तो गंगेच्या उदरीं भीष्मरूपानें अवतरला होता, म्हणून त्यास कृष्णानें इहलोक सोड व 'वसूंतें पाव' असें म्हटलें आहे. ७. थोडेंसुद्धां. ८. पातक. तूं पापापासून अलिप्त आहेस. ९. अन्वयार्थः—जेविं वज्राद्रि (हिऱ्याचा पर्वत,) घनांहीं [भिन्न न], [तेविं] तूं प्रभु (समर्थ) कामशरांहीं भिन्न न. भीष्माच्या अढळ शुकमारुतितुल्य ब्रह्मचर्यावर येथें लक्ष्य आहे. वज्र—हिरा—घणांच्या घावांनीं फुटत नसतो. 'हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं ॥ तोचि मोल पावे खरा । करणीचा होय चुरा. ॥ (तुकाराम). १०. आधीन. ११. नम्र. १२. चाकराप्रमाणें. तूं बापाच्या वरानें इच्छामरणी झाला आहेस, हा गीतीचा भाव. शांतिपर्वांत कृष्णानें भीष्माच्या पितृतोषणाचा व इच्छामरणाचा असा उल्लेख केला आहेः—"तूं छंदमृत्यु शंतनुवरदानेंचि प्रभो! महाभागा!! हें छंदमृत्युकारण पितृतोषण मजहि न घडलें बा! गा! (मोरोपंती शांति० ७।२९.)

आज्ञा देतां देवें, भीष्मा प्रतिपाल्य[1] जे सदा वपुसे[2], ।
पांडव, धृतराष्ट्र, विदुर सर्व सुहृद्वर्ग जे, तयांस पुसे. ॥ ४५
परिसा हो! सर्व तुम्ही, मागतसे भीष्म हा निरोपातें; ।
'लोभें[3] न देवू सत्वा, दे जेविं ग्रीष्म हानि रोपातें. ॥ ४६
रक्षुनि[4] शुद्धयशातें मेळवितें जेविं सत्य, यश तातें ।
तेविं न मेळविलें; हो! हेंचि करी दूर अत्ययशतातें. ॥ ४७
भूतीं[5] दया असोंद्या; व्हा इंद्रियषडरिनिग्रहीं[6] धीट; ।
सोडुनि अन्य पथ धरा निजधर्माचारमार्ग[7] हा नीट[8]. ॥ ४८
चैतन्य[9] सम[10] पहावें, गुरु लघु देहें दिसो करी[11] कीट[12]. ।
ब्राह्मणसत्काराचा येवूं देवूं नका मनीं वीट[13].' ॥ ४९
कथुनि असें, आलिंगुनि धर्मासि, पुन्हा सरिद्वरज[14] राज म्हणे, ।
"बा! प्राज्ञ[15] गुरु[16] ब्राह्मण पूजावे त्वां सदैव राजमणे[17]!" ॥ ५०

---

१. पालन करण्यास योग्य. २. शरीराप्रमाणें. प्राणिमात्राचें प्रेम आपआपल्या शरीरावर असून तो जितकी त्याची जोपासना करितो, तितकी दुसरी कशाचीही करित नाहीं. भीष्माचार्यांस पांडव, धृतराष्ट्र, विदुर हे आपल्या शरीराप्रमाणें अत्यंत प्रिय होते, असा भाव. ३. सार्थान्वयः—जेविं ग्रीष्म (उन्हाळा) रोपातें (नवीन लाविलेल्या वृक्षास) हानि (नाश) दे, [तेविं] लोभ (मायामोह) सत्वा (उत्तम गुणास) न देवू (देवो). लोभानें सत्वाची हेळसांड न होवो. ४. सार्थान्वयः—रक्षुनि (=रक्षण करून) जेविं सत्य शुद्धयशातें (=उत्तम लौकिकाला, सत्कीर्तीला) मेळवितें, तेविं [आपल्या मुलांना रक्षुनि] तातें यश न मेळविलें; हो! हेंचि (=सत्यच) अत्ययशतातें (=शेंकडों संकटांना) दूर करी. रक्षण करण्याच्या कामांत बापाची तर प्रसिद्धी आहेच, पण सत्याची त्यावरही कडी आहे. शेंकडों संकटें गुदरलीं असतां बाप हात टेंकील व आपलें रक्षणकर्तव्य करण्यास असमर्थ होईल; परंतु सत्य अनेक घोर संकटांतूनही लोकांस सुरक्षित पार पाडितें. सर्वसंग्रहपाठः—रक्षुनि शुद्धयशातें मेळविलें इ०. ५. प्राणिमात्रावर. ६. इंद्रिय+षट्+अरि+निग्रहीं=इंद्रियें व कामक्रोधादि जे सहा शत्रु त्यांचें नियमन करण्यांत. इंद्रियदमन व षडरिजय ह्यांसारखी दुर्घट गोष्ट दुसरी नाहीं, तेव्हां येथेंच अंगचें सामर्थ्य दाखविणें विहित होय. ७. आपल्या धर्माप्रमाणें वर्तन ठेवण्याचा रस्ता. ८. सरळ. ९. परमेश्वराचा अंश. १०. सारखेंच. ११. हत्ती. १२. किडा. अन्वयः—करी [व] कीट देहें (शरीरमानानें) [अनुक्रमें] गुरु (मोठा) [व] लघु (लहान) दिसो; [परि] चैतन्य सम पहावें. ४६ उ० अ०, ४७,४८ व ४९ या साडे तीन गीतींत गीतेचें सार भरलें आहे. १३. तिटकारा. १४. सरित्+वरा+ज=नद्यांमध्यें श्रेष्ठ तिजपासून उत्पन्न झालेला, भीष्माचार्य. १५. शहाणे, विद्वान्. १६. उपदेश देणारे किंवा वडील. १७. राजश्रेष्ठा!

सर्वांसि[1] पुसुनि शांतनुसुत तो राहे मुहूर्तभरि[2] उगला[3], ।
फुगला[4] सुखें, मनांत श्रीकृष्णाच्या धरूनि पदयुगला[5]. ॥ ५१
वंदुनि, चिंतुनि चित्तीं, शांतनवें भक्तवत्सला हरिला, ।
ज्या[6] धारणा, तयांच्या ठाईं आत्मा यथाक्रमें धरिला. ॥ ५२
ऊर्ध्व[7] गति प्राणाची करितां आश्चर्य जाहलें मोटें, ।
व्यासप्रमुखमुनींनीं जें पाहुनि घातलीं[8] मुखीं बोटें. ॥ ५३
तो[9] ज्या ज्यातें सोडी तत्काळ विशल्य होय तें अंग, ।
असुंनीं तनुचा तैसा त्या शल्यांनींहि सोडिला संग. ॥ ५४
झालीं क्षणें विशल्यें भीष्माचीं वीररसंसुधापात्रें[10], ।
कृष्णप्रमुखांचींही झालीं रोमांचितें तदा गात्रें. ॥ ५५
भेदुनि मस्तक आत्मज्योति[11] महोल्कातसी[12] शिरे व्योमीं; ।
मुनि[13] वदले "या तेजीं तें आल्हादप्रदत्व, जें सोमीं". ५६
"करुनि[14] प्रकाश गगनीं, मग नीरधरांत, जेविं सवित्याचें ।
मंडळ, अदृश्य झालें तें आत्मज्योति," म्हणति कवि, "त्याचें." ॥ ५७
क्षत्ता[15], युयुत्सु, पांडव, कृष्णागरुचंदनेंचि[16] आशु चिता ।

---

१. सर्वांचा निरोप घेऊन. २. क्षणभर. ३. उगा, स्तब्ध, निःशब्द. ४. आनंदानें तरतरला, समाधानानें तट्ट झाला, संतोषानें ओतप्रोत भरला. ५. चरणद्वयाला. ६. अनेक व्यापृति नाडींशी करून एके ठिकाणीं मनाचा लय करणें आणि श्वासनिरोध करणें ह्या धारणा होत. भीष्मानें योगक्रमानुसार प्रथम व्यापृति नाडींशी केली, नंतर श्वास निरोध केला व शेवटीं समाधी लाविली. ७. प्राणाची ऊर्ध्व गती करितां=ब्रह्मांडीं प्राण नेला असतां. ८. चकित झाले. 'आंगठे मुखीं धरितों' स्त्रीपर्व अध्याय ६, गीति ६३ पहा. ९. अन्वयः-तो (प्राण) ज्या ज्यातें सोडी, तें अंग तत्काळ विशल्य (शरमुक्त) होय. (निरनिराळ्या अवयवांतून प्राण आकर्षण करून, त्या भीष्मांनीं ऊर्ध्वगति देतांच, ते ते अवयव तावडतोब दुःखमुक्त व शल्यमुक्त होऊं लागले;) [जैसा] असुंनीं (प्राणांनीं) तैसा शल्यांनींही (ज्या शरशय्येवर आचार्य होते त्या शरांनींही) त्या तनुचा (भीष्माचार्यांच्या शरीराचा) संग (साहचर्य, प्रेम) सोडिला. १०. शौर्यरूप अमृतानें भरलेलीं भांडीं. हें 'गात्रें' ह्याचें विशेषण. भीष्माचें अंग शल्यमुक्त झालें, पण त्याच वेळीं प्रेक्षकांचीं अंगें रोमांचित होऊन, जणूं काय शल्ययुक्तच दिसूं लागलीं, हा गीतीचा भाव. ११. प्राणतेज. १२. आकाशांतून पडणाऱ्या तेजस्वी तारकेप्रमाणें. १३. अन्वयार्थः-मुनि वदले 'जें सोमीं (चंद्राचे ठायीं) तें आल्हादप्रदत्व (=आनंद देण्याचें सामर्थ्य) या तेजीं (=भीष्माचार्यांच्या आत्मज्योतीचे ठायीं) [असे].' १४. अन्वयः-"गगनीं प्रकाश करुनि मग (नंतर) जेविं सवित्याचें (सूर्याचें) मंडळ (बिंब) तेविं तें त्याचें आत्मज्योति (=प्राणतेज) नीरधरांत अदृश्य झालें," [असें] कवि म्हणति. १५. विदुर. युयुत्सु=धृतराष्ट्राचा दासीपुत्र. १६. काळ्या रंगाच्या अत्यंत सुवासिक चंदनाच्या काष्ठांनीं.

उचिता रचिती, त्या श्रीगांगेयाची तसीच बा! शुचिता.[1] ॥ ५८
रत्नकनकगंधांबरमाल्यांहीं भीष्मदेह तो भावें[2] ।
धर्म, विदुर शोभविती; जेणें[3] सुकृतें उगेंचि शोभावें. ॥ ५९
ज्या पाहुनि मृत्यु म्हणे, 'देतो मज, करुनि हा तप, त्रास'; ।
त्या[4] प्रभुवरी धरी धृतराष्ट्रसुत युयुत्सु आतपत्रास.[5] ॥ ६०
जे[6] झाले माराया ज्या शस्त्रव्रातदातयावरि, ते ।
उडविति धवळें चवरें भीमार्जुन बा! तदा तयावरिते. ॥ ६१
ज्याचे[7] सुतापसां गुण, कटक जसे सेव्य नुत हिमाद्रीचे, ।
त्या प्रभुचीं उष्णीषें धरिती सप्रेम सुतहि माद्रीचे. ॥ ६२
स्त्रीवातस्पर्श[8] नसे गंगेवांचुनि जयास; परि वारा ।
कौरवपतिस्त्रिया[9] सुव्यंजनें[10] घालिति[11] तया सपरिवारा.[12] ॥ ६३
बहु सामगान[13] झालें; वाटे[14] शोभा तसी न यज्ञांत, ।

---

१. पवित्रता. २. भक्तिपुरस्सर, आवडीनें. ३. अन्वयः—जेणें (=ज्या देहानें) सुकृतें (=पुण्यसंचयाचेच जोरावर) उगेंचि (सहज) शोभावें. पुण्यसंचयानें प्राप्त झालेली भीष्माचार्यांची तेजस्विता इतकी होती कीं त्यांचें प्राणोत्क्रमण झाल्यावरही त्यांचा देह तेजस्वी दिसत होता. तेव्हां रत्नकनकादिकांची त्यास जरूरी होती असें नाहीं. परंतु धर्मविदुरांनीं आपल्या स्वतःच्या समाधानार्थ ती गोष्ट केली इतकेंच. भीष्मभक्तिभाग्यांत पंत म्हणतातः—अभ्यंतरींच जिरवी उपरम समयांत तो कवि श्वास । झाला, तरि तत्तेजें न धरिति योगीहि लोक विश्वास. ॥ भीष्मभक्ति० १७५. ४. त्या समर्थ भीष्माचार्यांवर. ५. छत्रातें. ६. सार्थान्वयः—जे [भीमार्जुन] ज्या शस्त्र-व्रातदातयावरी (शस्त्रांचा समुदाय टाकणाऱ्यावर—अर्थात बाणांची वृष्टि करणाऱ्या भीष्माचार्यांवर) माराया झाले (ठार करण्यास धावले) ते[च] (भीमार्जुन) तयावरी (त्या भीष्माचार्यांवर) तदा (=अंत्यविधीच्या वेळीं) धवळें चमरें (शुभ्र चवऱ्या) उडविती (ढाळूं लागले). ७. सार्थान्वयः—ज्याचे नुत (प्रशंसित) गुण, जसे हिमाद्रिचे (हिमालय पर्वताचे) नुत (वाखाणिलेले) कटक (कडे), [तसे] सुतापसां (तपस्विवरांस) सेव्य (ग्रहण करण्यास योग्य; पक्षीं आश्रय करण्यास योग्य) [होते], त्या प्रभुचीं (त्या भीष्माचार्यांचीं) उष्णीषें (मुकुटादि विशेष खुणेच्या वस्तु) माद्रीचे सुतहि (नकुल व सहदेवसुद्धां) सप्रेम (आनंदानें) धरिती. ८. स्त्रियांच्या वाऱ्याचा स्पर्श, स्त्रियांचा यत्किंचित् संबंध. ९. कौरव राजांच्या स्त्रिया, भरतस्त्रिया. १०. उत्तम पंख्यानें. ११. ह्या क्रियापदाचें कर्म पूर्वार्धातील 'वारा' हें नाम होय. १२. मुलांबाळांसह. ह्यावरून भीष्माचार्य हे ब्रह्मचारी असूनसुद्धां मुलांबाळांवर त्यांचें किती प्रेम होतें व त्यांजवर ह्यांचें किती प्रेम होतें हें व्यक्त होतें. १३. सामांचें पठण, सामवेदाचें म्हणणें. १४. जे धर्मज्ञांत (धर्मशास्त्र पारंगत असणाऱ्यांमध्यें) [व] नयज्ञांत (न्यायामध्यें तरबेज असणाऱ्यांमध्यें) वर (श्रेष्ठ) [असे] नारदादि (नारदप्रभृति) जेथें, [त्या] यज्ञांत तशी (भीष्माचार्यांच्या अंत्यविधीच्या वेळीं जशी होती तशी) शोभा न वाटे. 'जेथें' ह्या ऐवजीं

कीं नारदादि जेथें, वर धर्मज्ञांत जे नयज्ञांत. ॥ ६४
करुनि पुरावा[1] कृष्णागरुकर्पूरादिपुण्यगंधाचा, ।
संस्कारिला[2] यथाविधि देह चिताग्नींत सत्यसंधाचा[3]. ॥ ६५
अपसव्य[4] करुनि सर्वहि धृतराष्ट्रप्रमुख सज्जन चितेतें, ।
वाटे गंगेंत करिति यज्ञांतावभृथमज्जनचि[5] ते तें. ॥ ६६
गांगेयास व्यासें, गंगोदक नारदें दिलें, असितें, ।
तेणेंहि[6], सुगति पाउनि, अरि बहु वर्णिति जयाचिया असितें. ॥ ६७
विश्व धवळिलें[7] जेणें स्वयशांहीं चंद्ररश्मिगौरांहीं, ।
त्यासि भरतभार्यांहीं[8] सतिल जल दिलें, तसेंचि पौरांहीं[9]. ॥ ६८
प्रगटे जलदानाच्या अवसानीं[10] भूषणास्यरुचिरहिता[11], ।
करि परिदेवन[12] दीना[13] देवनदी नारदादिमुनिमहिता[14]. ॥ ६९
ती रोदन करित म्हणे, "भारतहो[15]! भूपहो! अहो! मुनिहो! ।
वाटे[16] न जपुनि, न तपुनि, न नमुनि, कोण्ही श्रमी न होमुनि हो. ॥

---

'तेथें' असा पाठ घेतल्यास असा अन्वय करितां येईल—वाटे, तशी शोभा यज्ञांत [ही] न; कीं (कारण) जे धर्मज्ञांत व नयज्ञांत वर [ते] नारदादि तेथें (भीष्मांच्या अंत्य संस्काराचे ठिकाणीं) [होते].

१. पुरवठा. २. भीष्माचार्यांच्या मृतदेहास धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें यथासांग मंत्राग्नि दिला, असा भाव. ३. सत्य (=खरी) प्रतिज्ञा ज्याची अशाचा, बोलणें खरें करणाऱ्याचा, भीष्माचार्यांचा. ४. उलटी प्रदक्षिणा घालून. ५. यज्ञ+अंत+अवभृथ+मज्जन=यज्ञसमाप्तीनंतर जें स्नान करितात तें. हें स्नान अंत्यविधीच्या वेळीं केलें होतें तरी अवभृथासारखें भासलें; एकंदरींत त्या महात्म्याचा अंत्यविधि म्हणजे एक पवित्र यज्ञच भासला, असा भाव. ६. अन्वयार्थः—तेणेंहि (=त्या कृष्णानेंहि) [गांगेया गंगोदक दिलें], जयाचिया असितें (=ज्या कृष्णाच्या तरवारीला) अरि (=शत्रुसुद्धां) सुगति पाउनि (=मुक्ति लाभून) बहु वर्णिती (=अत्यंत स्तवितात). (मागें, गीति ३४ पहा.) ७. शुभ्र केलें. ८. भरतकुलांतील स्त्रियांनीं. ९. नगरवासी लोकांनीं. पौरजनांनीं भीष्माचार्यांस जलाञ्जलि दिला, ह्यावरून त्यांनीं जनानुरञ्जन किती केलें होतें, हें व्यक्त होतें. १०. समाप्तीच्या वेळीं. ११. भूषण+आस्यरुचि+रहिता=अलंकार व मुखावरील टवटवी हीं दिसत नाहींत जिच्या ठायीं अशी. हें 'देवनदी (=गंगा)' या शब्दाचें विशेषण. १२. रोदन. १३. कष्टी झालेली. १४. नारदप्रभृति ऋषिगणांनीं स्तविलेली. १५. भरताच्या कुलांत उत्पन्न झालेल्यांनो! १६. अन्वयार्थः—वाटे, कोणी जपुनि श्रमी न हो (=कोणीही जपविधि करून श्रमी न होवो, जप करून पुण्यसंचयार्थ कोणींही कष्ट करूं नये), तपुनि श्रमी न हो, नमुनि श्रमी न हो, [व] होमुनि (=होम हवन करून) श्रमी न हो. [कारण एवढे श्रम करून पुण्यसंचय केला, म्हणजे शेवटीं सुख प्राप्त होतें, मनुष्याचा अंत आनंदमय होतो असें मुळींच नाहीं. पहा, भीष्म एवढा पुण्यवान् होता तरी पण अखेर त्याचा अंत शत्रूच्या कपटानें हालांतच झाला ना? हा गंगेचा भाव].

जो [1]शुद्धराजवृत्तें संपन्न, धनेंकरूनि [2]यक्षपसा; ।
[3]कोणीहि कवि धराया ज्या न, जसा पारदास दक्ष पसा; ॥ ७१

[4]प्रज्ञेनें [5]वाक्पतिसा, संपन्न जसा महामुनि [6]यमांनीं; ।
[7]मणिनीं [8]शेषशिरोगणसा साजे जो सदा सु[9]नियमांनीं; ॥ ७२

[10]सादर सदा गुरूंचें वृद्धांचें जो [11]संभाजन कराया, ।
ज्या [12]तें [12]विशोभवी बहु, जेविं कवींची सभा जनकराया; ॥ ७३

[13]वदले सुज्ञ, 'त्रिजगीं जोडा गुरुभक्त ज्या न पहिल्याला;' ।
जो गुरुभक्तिरुचिस रवि, परगुरुभक्तित्वचेस अहि त्याला; ॥ ७४

[14]अरिकटकझषकुळीं, स्वव्यसनतमीं, जो महाव्रत तिमि, रवी; ।
ज्याच्या प्रसूपुढें नच यश अमृतफळा महाव्रतति मिरवी. ॥ ७५

---

१. राजाच्या नात्यानें केलेल्या पवित्र आचरणानें. २. कुबेराप्रमाणें. ३. सार्थान्वयः–जसा पारदास (पाऱ्यास) [धराया] पसा (ओंजळ) [दक्ष] (समर्थ) [न], तसा ज्या (ज्या भीष्माचार्यास) धराया कोणीही कवि (सुज्ञ, शहाणा) दक्ष न. मोठमोठ्या शहाण्यांच्याही जो हातीं लागणारा नव्हता, असा भाव. गीति ७१–७६ यांत भीष्माचें सुंदर वर्णन आहे. या गीतींतील सर्व संबंधी सर्वनामांचा संबंध ७६ व्या गीतींतील 'तो (=भीष्म)' या सर्वनामाशीं आहे. ४. बुद्धीनें. ५. बृहस्पतीसारखा. ६. अहिंसादिक इंद्रियदम त्यांनीं. ७. रत्नांनीं. ८. शेष सर्पाच्या मस्तकसमूहाप्रमाणें. शेषास सहस्र शिरें आहेत. तीं जशीं त्यांवरील रत्नांनीं शोभतात त्याप्रमाणें. ९. नियम (=आचारबंधनें) दहा आहेतः–शौचमिज्या तपोदानं स्वाध्यायोपस्थनिग्रहः । व्रत-मौनोपवासं च स्नानं च नियमा दश ॥ १०. सिद्ध, तयार. ११. पूजन, सेवा. १२. तें (=गुरुवृद्धसभाजन) विशेषच शोभा देई. १३. सार्थान्वयः–'ज्या पहिल्याला गुरुभक्त जोडा (वडिलांच्या ठिकाणीं आदरबुद्धि असणारा असा दुसरा बरोबरीचा मनुष्य) त्रिजगीं न' [असें] सुज्ञ (शहाणे) वदले. जो [भीष्मरूप] रवि गुरुभक्तिरुचिस (=वडिलांची भक्ति हीच कोणी एक कांति तिला) त्याला (=स्वीकारिता झाला) [व] जो [भीष्मरूप] अहि परगुरुभक्तित्वचेस (=परगुरुभक्तिरूप त्वचेला, विश्वगुरु जो ईश्वर त्याची भक्ति हीच कोणी एक त्वचा=कात तिला) त्याला (=स्वीकारिता झाला). 'सूर्य जसा कांतिनिधि, तसा जो गुरुभक्तीचा निधि होता; व फक्त सर्पच ज्याप्रमाणें कात अंगावर घालूं शकतो, तद्वत् खरी ईश्वरभक्ति ज्या एकट्यालाच लाभली होती;' हा या गीत्यर्धाचा भाव. १४. सार्थान्वयः–जो महाव्रत (मान्य आहे व्रत=प्रतिज्ञा किंवा निश्चय ज्याचा असा) अरि-कटक-झष-कुळीं (शत्रूंच्या सैन्यरूप मत्स्यसमूहांत) तिमि (देवमासा) [व] स्वव्यसनतमीं (स्वकीयांच्या संकटरूप अंधकारामध्यें) रवि; अमृतफळा (अमृतफळें प्रसवणारी) महाव्रतति (कल्पलता) ज्याच्या प्रसूपुढें (मातेपुढें) यश नच मिरवि (प्रौढी दाखवीत नाहीं). 'तिमि' नांवाचे मोठे मासे लहान लहान माशांस खातात, या गोष्टीवर पूर्वार्धाचा कटाक्ष आहे.

[1]आचार्येंही रामें शस्त्रास्त्रांहीं न जो पराभविला; ।
वधिला शिखंडिनें तो, [2]नवल कसें भंगिलें तृणें पविला! ॥ ७६
हें माझें हृदय मला [3]भारत हो! [4]अश्मसारमय वाटे, ।
परमप्रियपुत्राच्या न विरहशोकेंकरूनि जें [5]फाटे. ॥ ७७
[6]क्षत्र समग्रहि 'हा! हा! करि, हरितां कन्यका, शिरा ज्याच्या ।
तेजें लववी नगरीं, करुनि तुमुल जन्य, काशिराजाच्या; ॥ ७८
ज्यासम बलवान् महिवरि कोणीही ऐकिला न [7]राजन्य; ।
[8]जैसें अमरवरासीं, दुर्घट ज्यासीं तसें नरा जन्य; ॥ ७९
वधिला शिखंडिनें तो, नायकवे सज्जनापयश कानें; ।
[10]शशकानें मथिला हरि, कीं म्हणतां पक्षिपाळ मशकानें; ॥ ८०
जेणें [11]रामगुरु कुरुक्षेत्रीं बहु पीडिला [12]अबहुयत्नें, ।
वधिला [13]क्षुद्रें, [14]कौस्तुभ परिभविला कृत्रिमें कसा रत्नें? ८१

---

१. काशिराजाची मुलगी अंबा इच्या प्रकरणीं प्रतिज्ञाभंग होऊं द्यावयाचा नाहीं ह्याकरितां भीष्माचार्यांस प्रत्यक्ष आपल्या गुरूबरोबर म्हणजे परशुरामाबरोबर युद्ध करावें लागलें; व त्यांत त्यांचा आचार्यहस्तेंही पराभव झाला नाहीं, असे हे महायोद्धे होते. २. अन्वयः–तृणें पविला (वज्रास) कसें भंगिलें? हें नवल. प्रत्यक्ष परशुरामाच्या हातून ज्याचा पराभव झाला नाहीं, त्याचा शिखंडीनें पराभव केला; तेव्हां गवताच्या काडीनें वज्राचे तुकडे कसे केले? हेंच आश्चर्य आहे. ३. भरतकुलामध्यें उत्पन्न झालेल्यांनो! ४. लोहमय. ५. तडके. अर्थसादृश्यः–या दुःखपावकें गावल्गणि! । मी न पावे जीवित्वहानि । निश्चयें वज्राचें पद्मयोनि । हृदय निर्मी हें संजया! ॥ विष, अग्नि, पर्वतपात। करितां दुःख नव्हे शान्त । अद्यापि मातें कृतान्त । कैसा न भक्षी? संजया! ॥ गोपाळकृत कर्णपर्व, १।१५९–१६०. ६. सार्थान्वयः–काशिराजाच्या नगरीं (राजधानींत) तुमुल जन्य (निकराचें युद्ध) करुनि कन्यका (मुली) हरितां (हरण करून नेत असतां), ज्याच्या (भीष्माच्या) तेजें (सामर्थ्यानें, प्रभावानें) समग्रही क्षत्र (स्वयंवरास आलेले सर्व क्षत्रिय) हाहा करी (हाय हाय करूं लागले) [व] शिरा लववी (माना खालीं घाली). टीपः–अंबा, अंबिका व अंबालिका ह्या मुलींचा स्वयंवर येथें अनुसंधेय आहे. ह्या मुलींचा पिता काशिराज. शुभानंदकृत भीष्मपर्व २३।५४–८८ पहा. ७. राजा. ८. सार्थान्वयः–जैसें अमरवराशीं (देवश्रेष्ठ–इंद्र–त्याजबरोबर) तसें ज्याशीं (भीष्माशीं) जन्य (युद्ध) नरा (मनुष्यास) दुर्घट (करावयास कठीण). गीति ७८ व ७९ ह्यांतील 'ज्याच्या,' 'ज्यासम,' 'ज्यासीं' ह्या संबंधी सर्वनामांचा संबंध गीति ८० हींतील 'तो' ह्या दर्शक सर्वनामाकडे. १०. अन्वयार्थः–शशकानें (सशानें) हरि (सिंह) कीं (किंवा) मशकानें (माशीनें) पक्षपाळ (गरुड) मथिला म्हणतां. सर्वसंग्रहपाठः–कीं म्हणतो पक्षिपाळ मशकानें. ॥ ११. गुरु परशुराम. १२. सहज, फार श्रम न करितां. १३. दुर्बळ शिखंडीनें. १४. अन्वयः–कृत्रिमें रत्नें कौस्तुभ कसा परिभविला?=खोट्या रत्नाची ताण कौस्तुभ मण्यावर कशी झाली? गीति ७६,८० व ८१ ह्यांत दिलेले दाखले फारच ठसकेदार आहेत.

तुज[1] वदले पाहुनि तंव साधुसभाजनक विप्र 'शांतनवा ! ।
कोठें पाहूं करिता साधुसभाजन कवि प्रशांत नवा ?' " ॥ ८२
ऐसा विलाप करितां समजावी वासुदेव गंगेतें; ।
मन[2] शुद्धबोधदुग्धें क्षाली, शोकेंकरूनि रंगे, तें. ॥ ८३
"देवि[3] ! नको शोक करूं; शुद्धयशा तो न तव तनय शमला, ।
श्रुत इतर असें करितें सत्कविवाणीस न वतन यश मला. ॥ ८४
उत्तमलोकासि, यशें श्रोत्यांचा हरुनि ताप, गेला गे ! ।
रसिकांसि[4] तव सुतचरित अमृताहुनि गोड आपगे[5] ! लागे. ॥ ८५
भद्रे[6] ! हा वसु येथें शापें होता धरूनि नरतेतें[7]; ।
ठावें तुज, या लोकीं तुच्छ[8] सुखा आदरूनि[9] न[10] रते, तें. ॥ ८६
तदनुमतेंचि[11] करि तुझा[12] हा त्यासीं तेविं जन्य पणतू[12] तें, ।
पुत्राच्या रणमरणें[13] आलें विश्वांत धन्यपण[14] तूतें. ॥ ८७
शुभदर्शने[15] ! सुत तुझा पार्थशरांहींच पावला पतन, ।

---

१. सार्थान्वयः—तुज पाहुनि तंव (=पाहतात तों, पाहतांक्षणींच) साधुसभाजनक (=सत्समाजाचे पोषिंदे) विप्र (=ब्राह्मण) वदले, 'हे शांतनवा ! (=भीष्मा !), नवा (=तुझ्यासारखा दुसरा) साधुसभाजन (=सत्पुरुषांचें पूजन, साधूंचें आदरातिथ्य) करिता (=करणारा) प्रशांत कवि (=शाहणा मनुष्य) कोठें पाहूं ! भीष्मासारखा साधूंस मान देणारा, शांतस्वभावाचा व सुज्ञ दुसरा कोणीच नव्हता, हा ब्राह्मणांचा भाव. २. सार्थान्वयः—शोकें करूनि [जें मन] रंगे (ज्यावर शोकाचा छटा स्पष्ट उमटला होता), तें मन शुद्धबोधदुग्धें (बोधरूपनिर्मल दुधानें) क्षाली (धुवून टाकिता झाला). डाग पडला असतां दूध लावून धुतल्यानें तो जातो हें सुप्रसिद्ध आहेच. गंगा ही स्वभावानें, मनानें व शरीरानें शुभ्र, तेव्हां तिच्या अंतःकरणावर पडलेला शोकरूप डाग श्रीकृष्णानें बोधरूप शुभ्र पदार्थानेंच धुवून टाकिला. ३. सार्थान्वयः—देवि ! (हे भगवति ! गंगे !) शोक करूं नको; शुद्धयशा (पवित्र आहे यश ज्याचें असा) तो तव तनय न शमला, (मृत झाला नाहीं, अंत पावला नाहीं) [कारण] सत्कविवाणीस (उत्तम कवीच्या वाणीस) वतन (माहेर) करितें (करणारें) असें इतर (दुसरें अर्थात् भीष्माचार्यांच्या यशापेक्षां निराळें) यश मला श्रुत न (माझ्या ऐकिवांत नाहीं). सत्कवींची वाणी भीष्माचार्यांच्या यशाचें वतन आहे म्हणजे त्या वाणीवर ह्या यशावांचून इतर यशांचा हक्कच नाहीं. भीष्माचार्यांच्या कीर्तीहून भिन्न विषयच सत्कविवाणीला नाहीं, असा भाव. टीपः—वतन हा अरबी भाषेंतील आहे व त्यांत ह्याचा अर्थ 'स्वदेश' असा आहे. ४. मार्मिकांस. ५. गंगे. ६. हे कल्याणि ! गंगे ! ७. मानवपणातें. नरतेतें धरुनि=नरशरीर अंगीकारून. ८. हलक्या सुखांस, तिरस्कारार्ह अशा विषयोपभोगादि सुखांस. ९. मान देऊन, आस्वादून. १०. रममाण होत नाहीं. ११. त्याच्याच संमतीनें. १२. तुझा पणतू अर्जुन. १३. युद्धांत पडण्यानें. १४. मोठेपण. रणामध्यें जो वीर पडतो त्याच्या आईस 'वीरमाता' हें पद प्राप्त होतें. हें फार थोड्यांच्या कपाळीं असतें. १५. कल्याणकारक आहे दर्शन जीचें अशा, गंगे !

'बत'[1]! न म्हणावें, गेलें होतें, तें साधिलें पुन्हा वतन. ॥ ८८
तुज[2] सुत शोक शिखंडी, सिंहीला शश, कधीं न दे वधुनी; ।
विजयहि न वधी; कीं तो मृत्यु तयाच्या अधीन देवधुनी! ॥ ८९
उद्यतबाणा[3] भीष्मा होती शक्राहि शक्ति न वधाया, ।
कीं तव शुचि[4]कुक्षिभवा घडली परमेशभक्ति नवधा[5] या. ॥ ९०
याच्या शराहुनि अधिक तेजस्वी कवि म्हणेल कां पविला? ।
कीं येणें परिभविला पुष्पशरी[6], वज्रपाणि[7] कांपविला. ॥ ९१
जरि देवता समस्ता मिळल्या[8], करिल्या[9] रणीं न तच्छमना; ।
कीं तो होता ज्ञाता, साक्षात्[10] स्मरहरतसाचि[11] अच्छमना[12]. ॥ ९२
तो स्वेच्छंदेंचि[13] तनु त्यागुनि गेला, परें न वधिला, गे! ।
मृत्युवशा[14] मर्महता[15] न मराया बहु असा[16] अवधि[17] लागे. ॥ ९३
प्रसउनि म्हणती, 'वत्सा! आचर[18], होवूनि वीर, सूचित[19] रे'! ।
तुजसारखी सुदुस्तरसुतशोकाब्धींत[20] वीरसूचि[21] तरे[22]. ॥ ९४
प्रसवश्रम[23] भोगुनिही, सुयश न मिळतां, अवीरसूचि रडे; ।
समरहतसुवीरस्तुतसुतशोकभरें[24] न वीरसू चिरडे." ॥ ९५

---

१. सार्थान्वयः—'बत' (हाय!) न म्हणावें, [जें] गेलें होतें, तें वतन (कायमचा हक्क, वसुत्व) पुन्हा साधिलें. भीष्म हा अष्टावसूंपैकीं एक होता, परंतु शापामुळें त्याचें वसुत्व नष्ट होऊन, तो मानव झाला होता. तेव्हां आतां भीष्माला मरण म्हणजे शापमुक्त होऊन हरपलेल्या वसुत्वाचा लाभच होय, हें उघड आहे. २. अन्वयः—सुत वधुनी, शिखंडी तुज [व] शश (=ससा) सिंहीला कधीं [ही] शोक न दे. [हे] देवधुनी! तो विजयही [तुझा सुत] न वधी; कीं (कारण), तयाच्या (भीष्माचार्यांच्या) मृत्यु अधीन (=तो इच्छामरणी होता). ३. सज्ज केले आहेत बाण ज्यानें अशाला. ४. तुझ्या पवित्र कुशीपासून जन्म झाला आहे ज्याचा अशा याला. ५. नऊ प्रकारची. भक्तीचे नऊ प्रकार येणेंप्रमाणें आहेतः—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन. ६. मदन. हें 'परिभविला' ह्याचें कर्म. ७. इंद्र. ८. एकत्र झाल्या असल्या. ९. तच्छमना रणीं न करिल्या=त्याला मारूं न शकल्या. शमन=मृत्यु. १०. प्रत्यक्ष. ११. शंकराप्रमाणेंच. १२. शुद्ध अंतःकरणाचा. १३. स्वतःच्या इच्छेनें, आपण होऊन. १४. मर्त्यास, मरणाधीनाला. १५. नाजुक जागीं ज्याला घाय लागले आहेत अशाला. १६. भीष्माचार्यांस लागला त्याप्रमाणें. १७. वेळ, काळ. १८. आचरण कर. १९. सु+उचित=अत्यंत उचित अशा प्रकारें. २०. खडतर अशा पुत्रशोकसमुद्रांत. २१. वीरमाताच. २२. पार पडून जाते. अन्वयः—'रे! वत्सा [मुला] वीर होवूनि, सूचित आचर' [असें] प्रसउनि (=जन्म देऊन) म्हणती (=मुलाला म्हणणारी) तुजसारखी वीरसूचि दुस्तरसुतशोकाब्धींत तरे. २३. जिचे पुत्र वीर निपजत नाहींत, तिला प्रसववेदना होतात त्या होऊन, शिवाय अपयश पदरीं येऊन, तिला सर्व जन्म रडण्यांतच काढावा लागतो; अर्थात् तिला दुहेरी दुःख होतें. २४. रणागंणीं पडलेले व महायोद्ध्यांनीं स्तविलेले अशा पुत्रांच्या शोकानें वीरमाता विव्हल होत नाहींत. कारण शूरास योग्य असेंच पुत्राचें रणमरण पाहून त्या दुःख विसरतात.

माळा गडगडाट गगनीं । वायो भ्रष्टी सुसाटें. ॥ ५० ॥ तयापरी **यु**धिष्ठिर । चमूसह **वृ**कोदर । महाप्रतापी **पा**र्थवीर । **मा**द्रीसुत दळेंसीं. ॥ ५१ ॥ **द्रौ**पदीसुत बंधुपंचक । **भै**[1]मी, **सौ**भद्र वीरनायक, । **मच्छपां**चाळ**कै**कयादिक । वीर अमित लोटले. ॥ ५२ ॥ वर्षोनियां बाणधाडी । बुजोनी काढिला **द्रोण** प्रौढी । जैसी सुरासुरांची पडे उडी । दैत्याधिप **ब**ळीतें. ॥ ५३ ॥ सर्वांग रक्तें भरलें पूर्ण । जाणो किंशुक[2] फुलला सुमन । कोपें प्रज्वळिला हुताशन । चाप रोषें वोढिलें. ॥ ५४ ॥ काळविखारी तीक्ष्ण शर । कोटीच्या कोटी सोडिले क्रूर । कीं ते उदेले दर्वीकर[3] । नाशावया सेनेतें. ॥ ५५ ॥ बाणामागें बाणवृष्टी । अस्त्रप्रयोग तयानिकटी । सेना मर्दिली महाहटी । गज, अश्व, रथी निघातें. ॥ ५६ ॥ स्थविर[4] **द्रोण** जाहला तरुण । जाणों वसंतीं बालार्ककिरण । सेनाश्व चपळ फिरती त्राण । मंद म्हणती वारिया. ॥ ५७ ॥ विचित्र मंडळ फिरे रथू । बाणीं दिशा रोधिले पंथू । रुचिर शिरें मुगुटयुक्त । तारामानें रिचवती. ॥ ५८ ॥ भूषित भुजा मंडित शस्त्रीं । खचोनी अपार पडिले धरत्री । खंडविखंड वीरगात्रीं । अहीपरी क्रंदती. ॥ ५९ ॥ दुःखमान सकळ चमू । देखोनी घाबिरा राजा **धर्मू** । वीरश्रीभारें त्यागोनी चमू । **द्रो**णाप्रती तगटला. ॥ ६० ॥ पाठी वीर उसळे शौर्यें । क्रोधें प्रदीप्त **पा**र्थसूर्य । **पा**र्षत[5]वीर अग्रतावर्य । **पांचाळमत्स्यभी**मादि. ॥ ६१ ॥ **अं**तकदूत न सरती परा । तैसें **द्रोणा** वेढिलें निकरीं[6] । रौद्ररण जालें **वा**तकुमरा । आणि **अ**खया ज्यापरी. ॥ ६२ ॥ दैव उणीव तुझें भूपती । **द्रोण** ब्रह्मांड जाळी शक्ती । **पा**र्षतपतंग शौर्य आर्तीं । ग्रासिता जाहला, नरेंद्रा! ॥ ६३ ॥ पांच दिवस तव वाहिनी । रक्षी सुरां **कुं**लिशपाणी[7] । तैसा दुर्योधन परिपाळोनी । सहस्ररथी मारिले. ॥ ६४ ॥ नावाजिक[8] वीर ठळक । मर्दिले, जे का सुरां अटक । शौर्य विक्रम प्रतापार्क । **पां**चाळकूपीं बुडाला. ॥ ६५ ॥ सेनाअक्षौहिणीचे संगें[9] । नासोनी नृपा केला भंग । **द्रोण**शौर्याचें **मे**रुशृंग । **पा**र्षतकुकुटें खंडिलें.' ॥ ६६ ॥ ऐकोनी साशंक **अं**बिकांसुत[10] । कल्पांत भाविता जाहला सत्य । म्हणे, '**सं**जया! अघटित मात । सांगसी **द्रोण** मर्दिला. ॥ ६७ ॥ हेंची आश्चर्य माझिये मनीं । शैलभें[11] ग्रासिला देव तरणी[12] । कीं वडवाग्नी दावाग्नि-

---

१. भीमपुत्र (घटोत्कच). २. पळस. ३. सर्प, नाग. ४. वृद्ध. (अध्याय ८ श्लोक ९ पहा.) ५. धृष्टद्युम्न. ६. निकरानें, आवेशानें. ७. इंद्र. ८. नांवाजलेले, नामांकित. ९. संग=संघ, समुदाय. १०. धृतराष्ट्र. ११. पतंगानें. १२. सूर्य.

वदनीं । विबुड[1] जाहला स्पर्शतां. ॥ ६८ ॥ कुक्कुटें शोकिला[2] सागरू । कीं मेषथडके खचला **मेरू** । ना तो **फ**णींद्र विषाचा तरू । मुंगीमुखीं हरपला. ॥ ६९ ॥ तैसी जाहली **सं**जया पैरी[3] । **द्रो**ण प्रतापाचा महागिरी । ज्याची युद्धाची कैसरी[4] । दिवौकसां[5] अचोज. ॥ ७० ॥ च्यान्ही वेदपारंगत । दशग्रंथ मुखोद्गत । षडंग संहिता शास्त्रसंमत । संपन्न विद्या सर्वही. ॥ ७१ ॥ तपें समान **गा**धिनंदन । क्षमे **व**सिष्ठ दुजा जाण । शमदमनेमें **अ**त्रिमान । इंद्रियजित तुष्टात्मा. ॥ ७२ ॥ धनुर्विद्या अस्त्रप्रयोग । जाणों भूतळीं **र**मारंग । सर्व वाहिनीं[6] आरूढ सांग । सर्वास्त्रभेदीं कूसता[7]. ॥ ७३ ॥ जितक्रमा सहित आशा । ज्ञानी पंडित सदा तोषा । समरांगणीं अजयदशा । नाहीं स्वप्नीं पाहिली. ॥ ७४ ॥ सर्वलक्षणी गुणवर्धन । प्रतापतेजें **श**चीरमण । सेनाश्वरथीं विभ्राजमान । वेगवाणी तीव्रता. ॥ ७५ ॥ प्रभिन्न धनु असतां पाणी । कैसा वश जाहला कदनीं ? । काळविखारी[8] भूपश्रेणी । कोठें हरपली जाण पां ? ॥७६॥ संग्राम सागरींचा महापूर । **द्रो**णनौका कवळोनी थोर । दुर्योधनभूपतिभार । पैलपारा लोटला. ॥७७॥ दैव हीन आमुचें देखा । **मत्स्यपां**चाळें भ्रष्टली नौका । संततिवृद्धीची पताका । शोकसमुद्रीं बुडाली. ॥ ७८ ॥ वांचविता पदार्थ दुर्योधना । आतां नाहीं, बाळका ! प्रवीणा ! । खेदभरतें **कु**रुनंदना । दाटोनी, पडे धरेतें. ॥७९॥ धूळ लिंपिली सर्व गात्रीं । गळत्या लागल्या उभय नेत्रीं । श्यामता अंतली वक्त्रीं । निस्विन्न[9] जाहला सर्वांग. ॥८० ॥ 'अहा !' कार तये संधी । अमित मिळाली लोकमांदी[10] । राजगृहीं शोकवृद्धी । व्योम जाहलें अपुरतें. ॥ ८१ ॥ हृदय पिटोनी राजपत्नी । भावी जगडोल[11] जाहला अवनीं । राजसंपदा शोकजीवनीं । बुडाली मानी मानसें. ॥ ८२ ॥ वृद्ध साधू चतुर गुणी । सांवरूनि भूप धरिला पाणी[12] । नेत्रीं स्पर्शोनी गुलाबपाणी । अंचळानिळा वारिती[13]. ॥ ८३ ॥ सावध होऊनी राजेश्वर । श्वास घाली महाथोर । जैसा खंडित दर्वीकर[14] । उल्का वमी विषाच्या. ॥ ८४ ॥ **वै**शंपायन म्हणे, 'नराधीशा ! । समयीं जाहली ऐसी दशा' । विगत मानसें पुत्रआशा । खंडूनी, बोले नरेंद्र. ॥ ८५ ॥ म्हणे, "**सं**जया ! वीरवेळसा[15] । वारुनी **पां**चाळ शिरकला कैसा ? । भूपपुरुषार्थ कोळसा । **पां**डवीं केला मज वाटे. ॥ ८६ ॥ **भी**मार्जुनाचा दुःसह कोप । पाहोनी

---

१. लहान रोपडें. २. शोषिला. ३. प्रकार. ४. कौशल्य. ५. देवांस. ६. सैन्य. ७. युक्ति, तयारी. ८. काळसर्पाप्रमाणें विषारी (अत्यंत प्रतापी). ९. घामाघूम. १०. लोकांचा समुदाय. ११. भूकंप. १२. हातांनीं. १३. पदरानें वारा घालावयास लागले. १४. सर्प. १५. वीरांचें कोंडाळें, योद्धयांचा गराडा.

कृतांत पावे ताप । माद्रीनंदन नराधिप । शौर्यें सौभद्र आगळा. ॥ ८७ ॥ द्रौपदीतनय पांचजण । सात्यकी विक्रमी प्रतापवान । महावीर विक्रमी घन । मत्स्य, पांचाळ, कैकय. ॥ ८८ ॥ घटोत्कच राक्षसेंद्र । बळप्रवीण वीरभद्र । मागधसृंजयादि नरेंद्र । अमित वीर प्रतापी. ॥ ८९ ॥ हेंही असो केतुली प्राप्ती ? भीमार्जुन दुःसह शक्ती । ज्यांचे बळाची अतर्क्य शक्ती । चोज मानिती सुर पैं. ॥ ९० ॥ वीर विक्रमी समरांगणीं । कोण कैसे भिडले कदनीं ? । निबिड मिठी वीरश्रेणी । कोण्हें कोण्हा वारिलें ? ॥ ९१ ॥ तैसे आमुचे दळीं । वीर प्रख्यात [1]आतुर्बळी । कर्ण, वृषसेन दुजे तळीं[2] । शुंभनिशुंभ जाण पां. ॥ ९२ ॥ कृप, कृतवर्मा, सोमदत्ती, । भगदत्तराज, अमोघशक्ती । ज्याच्या [3]गजाची प्रबळशक्ती । भीम मानी दरारा. ॥ ९३ ॥ फाल्गुनसमान अश्वत्थामा । सर्व विद्येची पावला सीमा । बाळक भूरिश्रव्याच्या संग्रामा । त्रास भूप मानिती. ॥ ९४ ॥ संशप्तक पांच बंधू । समरीं सुर पावती खेदू । राक्षस अलंबु प्रसिद्धू[4] । मायामय अतर्क्य. ॥ ९५ ॥ त्रिगर्त, सैंधव जयद्रथ, । विंदानुविंद, अवंतीनाथ, । मम तनय [5]नागायुत । दुर्योधन बळियाढा. ॥ ९६ ॥ यांहीवेगळी विक्रमी सेना । राजे बळिष्ठ नव्हे गणना । द्रोण प्रतापाचा राणा । विद्यागुरु क्षत्रियां. ॥ ९७ ॥ महावीर संग्रामजेठी । काळही [6]देवोनी निघे पाठी[6] । तयातें लावोनी बारा वाटी । सांगसी द्रोणा मर्दिलें.॥९८॥ या कारणें संजया ! गुणी ! । दैव बळिष्ठ [7]सर्वांगुणीं । वृथा [8]यत्नकडसणी । [9]अदृष्ट श्रेष्ठ विश्वातें. ॥ ९९ ॥ आग्रही थोर दुर्योधन । बळें क्षत्रियां आणिलें मरण । श्रीकृष्णमाया[10]विंदाण । ब्रह्मादिकां नेणवे. ॥ १०० ॥ लीलाविग्रही पूर्णावतारी । परब्रह्म आनंदलहरी । षडैश्वर्य भगवान् हरी । शौरी, मुरारी, मुकुंद. ॥ १०१ ॥ धराभार उतरावया । प्रगटलासे देवकार्या । मानवी रूपाची धरूनी [11]छाया । वृष्णिकुळीं विराजे. ॥ १०२ ॥ बाळपणीं अगम्य लीळा । अमित वैरी वोपिले काळा । पूतना विषारी, विषांचा गोळा[12] । शोषूनि, केली

---

१. अति बलाढ्य. २. भूतळीं, पृथ्वीवर. ३. भगदत्त गजयुद्ध करण्यांत मोठा पटाईत असून, त्याच्याजवळ शिकविलेले हत्तीही पुष्कळ असत. ४. मागें पृ. ५ टीप २० पहा. ५. दहा हजार हत्तींसारखा बलिष्ठ. ६. पाठ दाखवून, रणांतून पराङ्मुख होऊन. 'पाठ देणें' हा शब्दसमूह पंतांनीं वारंवार योजिलेला आहे. 'ऐसें म्हणतचि, देउनि पाठ कृतघ्नासि, विधि पळाला, हो !' ॥ १।६ विनायकमाहात्म्य. ७. सर्व प्रकारें. ८. यत्नाची धडपड. ९. दैव. १०. हरीच्या मायेची लीला. ११. शोभा किंवा देखावा. १२. पूतनेनें आपल्या स्तनांत विष भरिलें होतें; तेव्हां तिच्या स्तनाला उद्देशून 'विषाचा गोळा' हे शब्द कवीनें योजिले आहेत.

निर्जीव. ॥ १०३ ॥ अघ, बक, काग, वत्सासुर, । मर्दिला मल्ल बळिष्ठ असुर । कुवलय हस्ती पाडिला निसुर । पुन्हा नुठे यावया. ॥ १०४ ॥ विमलार्जुना दीधली मुक्ती । वणवा ग्रासिला प्रभिन्न शक्ती । काळ काळिया विगत गती । रमणीक द्वीपा धाडिलें. ॥ १०५ ॥ कंसराज भोजपती । केशी धरूनि मारिला क्षिती । शिशुपाळाची केली शांती । राजसूययज्ञीं अशस्त्रीं.[1] ॥ १०६ ॥ सौभदैत्य मायाकारी । रची नगरें वायोधारी । निर्मूळ केला नवलपरी । जो असाध्य देवांतें. ॥ १०७ ॥ हंस, डिंबक आपेंआप । मर्दोनी वारिला जगाचा ताप । जरासंधप्रतापदीप । भीमहस्तें मालविला. ॥ १०८ ॥ कासीक, कौशल्य, अंग, वंग, । मागध, पौंड्रिक, कालिंग, । नामें सांगतां मानस व्यंग[2] । अमित क्षत्रिय मर्दिले. ॥ १०९ ॥ तेवीस अक्षौहिणी सेना । मागधआश्रित आणिली रणा । शाल्ववीर प्रतापराणा । सहसेना मारिला. ॥ ११० ॥ भौमासुर सुरनायक । सेनेसह मर्दिला देख । कन्या पर्णिल्या सोळासहस्रक । लावण्यगुणीं आगळ्या. ॥ १११ ॥ खांडव वोपोनी तोषला वन्ही । चक्र[3] लाधला विश्वदळणी । स्वर्गभूषण सुरतरू[4] गुणी । श्रेष्ठ इंद्रापासाव आणिला. ॥ ११२ ॥ पाताळवासी पांचजन्यू । असुरप्रतापी तेजभानू । मर्दोनी, आणिला पांचजन्यू । शंखवर्य तिहीं लोकीं. ॥ ११३ ॥ सुरां असाध्य साधिलीं कर्मे, । करूनी अकर्ता, न पवे श्रम, । नरनारायण द्विधा नाम । एक रूप जाण पां. ॥ ११४ ॥ तोची हा पार्थाचा सारथी । दैवें जोडला अनन्य भक्ती । सर्व ऐश्वर्य विजयशक्ती । ज्याचे पदीं विराजे. ॥ ११५ ॥ नरावतार विजयी पार्थू । सदा फळीं इच्छिला अर्थू । समरांगणीं अपर्णाकांतू[5] । जेणें बाहीं[6] तोषविला. ॥ ११६ ॥ निवातकवच, जंबुदैत्य, । कालकेय, पौलोम दानवनाथ । वासवा धाक असाध्य कृत्य । पार्थें हेळें[7] मर्दिला. ॥ ११७ ॥ कृष्ण फाल्गुनाचा प्राण । हरीआत्मा श्वेतवाहन । जैसा वत्स धेनु अनन्य[8] । धेनु वत्स ज्यापरी. ॥ ११८ ॥ पुष्प,[9] परिमळ नव्हे भिन्न । शर्करा, गोडी

---

१. शस्त्ररहित असूनही. २. कोतें किंवा व्याकुळ. ३. खांडववनदहनसमयीं अग्नीनें प्रसन्न होऊन कृष्णास वज्रनाभ नामक चक्र व कौमोदकी नामक गदा दिली–अशी कथा आहे. [मुक्तेश्वर-आदिपर्व अध्याय ४९ पहा.] ४. पारिजातक. ५. शंकर. ६. बाहूंनीं, बाहुबळानें, मल्लयुद्धानें. ७. लीलेनें. ८. एकच, भेदभावरहित. ९. वर्णनसादृश्यः–कीं दीप प्रकाश दोघेजण । नामें वेगळीं, परी एकत्र जाण । तेवीं एकनाथ आणि जनार्दन । नव्हती भिन्न सर्वथा. ॥ १८३. कीं कपूर सुगंध एक पाहीं । कीं द्रवत्वनीरासी द्वैत नाहीं । ना तरी पुष्प मकरंद एके ठायीं । निज प्रीतीनें नांदती. ॥ १८४. भक्तिविजय अ० ४६. तशाच भक्तिविजयांतील ४५ व्या अध्यायांतील १२५-१२८ या ओंव्याही ताडून पाहण्यासारख्या आहेत.

कैचीं दोन? । हेम, कांती द्विधाभान । रत्न, कीळ वेगळी? ॥ ११९ ॥ तयापरी ऐक्यता पाहीं । भारातीत करावया मही । प्रगटले, जैसा मारदाही[1] । अंत करी त्रिपुरातें. ॥ १२० ॥ धर्म धार्मिक धर्मराजू । धर्मीं निरत धर्मात्मजू[2] । अधर्मघातें तेजःपुंजू । सदाचारी तपस्वी. ॥ १२१ ॥ तो जरी क्षोभल्या बाळका! । रक्षा[3] करील धरणी देखा । स्वप्रभक्रोधाग्नी स्फुरितां शिखा[4] । भीष्मद्रोण वृद्ध दग्धले. ॥ १२२ ॥ येऱ्हवीं प्रतापअर्का[5] । कोण जिंकी समरीं देखा । सुरां असाध्य, मानवलोकां । गणी कोण? बाळका! ॥ १२३ ॥ हीनबुद्धी मम नंदन । बळें त्यांहीं वांच्छिलें कदन । सकळ वीरांसी आणिलें मरण । संतती माझी बुडाली. ॥ १२४ ॥ असो. आजन्म शोकचिंता । भाळीं लिहुनी गेला धाता । द्रोण प्रतापाचा सविता । तळा कैसा आणिला? ॥ १२५ ॥ हें सविस्तर वर्तमान । अवंचकभावें[6] करीं कथन । जें ऐकतां तृप्तती श्रवण । देखिलें वाटे नेत्रातें. ॥ १२६ ॥ द्रोणजीविता घालितां उडी । कोणें कैसी वारिली धाडी? । उभयवीरांची मिठी गाढी । क्षयाची वाढी अतर्क्य. ॥ १२७ ॥ आदिअंत[7] युद्धलाघव । तूतें बाळका! विदित सर्व । वक्तयांमाजी तुझी ठेव[8] । नाहीं चतुरा! दुसरी.' ॥ १२८ ॥ ऐसीं रायाचीं प्रश्नोत्तरें । पुढां ऐकिजे प्रीति चतुरें । विनवी नरहर मोरेश्वर । सादर श्रोतीं ऐकिजे. ॥ १२९ ॥

---

## अध्याय तिसरा.

संजय म्हणे, "राजाधिराजा! । भारतकुळवंशध्वजा! । पुसिलिया प्रश्ना चित्तें ज्या । सादर श्रोतीं ऐकिजे. ॥ १ ॥ तव नंदनें द्रोणाचार्या । सेनाभिषेक केला, राया! । थोर उत्साह तया समया । अनर्घ्य[9] वस्तु अर्पिल्या. ॥ २ ॥ भावें जोडूनियां कृतांजळी । मस्तक न्यासिला पदकमळीं । [वदे विनयें, 'गुरुजी! बळी!] । मी किंकरू आज्ञेचा. ॥ ३ ॥ संग्रामसागरीं[10] मथितां बुद्धीं । भीष्मअजयविष पातलें संधी । तया हरणा कृपानिधी । तूं शंकर आमुतें. ॥ ४ ॥ सोसोनी उल्बण[11] उठाउठी । यशःश्रीरत्नें वोपी मुगुटीं । तुझिया विक्रमा आड-

१. मदनदहन कर्ता (शंकर). २. यमाचा मुलगा. ३. राख. ४. ज्वाळा. ५. प्रतापसूर्यास. ६. कापट्यरहित वृत्तीनें, सचोटीनें, कांहीं चोरून न ठेवितां. ७. मूळापासून अखेरपर्यंत, अथपासून इतिपर्यंत. येथें मूळांतील अकरावा अध्याय संपतो. ८. तऱ्हा, ठेवण, पद्धति. ९. अमूल्य, अमोलिक. १०. बुद्धया केलेल्या संग्रामरूपी सागराच्या मंथनानें भीष्मपराभवरूपी विष उत्पन्न झालें असतां, तें त्वां दयानिधीनें प्यावें; कारण तूं आम्हांला शंकरच आहेस हा ओंवीचा भावार्थ. ११ संकट, विपत्ति.

काठी । करूं धूर्जटी शंके पां. ॥ ५ ॥ सुरां अशनिपाणी । जळचरांतें समुद्रगुणी । भूतां सकळां चक्रपाणी । वनस्पतीतें चंद्रमा; ॥ ६ ॥ कर्मासी आश्रय वेद एक । दृष्टीतें तेज प्रदीप्त अर्क । सर्वसंपत्ती त्रिपुरांतक । तेवीं तूं आम्हां जाण पां.' ॥ ७ ॥ राजमुखींची ऐकोनी गोष्टी । हर्षानंदें भरली सृष्टी । प्रसन्नता मुखसंपुटीं । सुधारवें अनुवादे. ॥ ८ ॥ म्हणे, 'राजया! इच्छित अर्थू । सांगसी ते पुरवीन आर्तू । देवां अटक मनोरथू । पूर्ण करीन सांग पां.' ॥ ९ ॥ हर्ष पावोनी दुर्योधन । भाळीं स्पर्शिले उभय चरण । म्हणे, 'स्वामिया! प्रतापवान । धरूनी धर्म मज देईं. ॥ १० ॥ विघड न होतां रणीं काया । प्रतापें जिणोनी देईं बाह्या.' । द्रोणें भावी, सदयता राया । वीरक्षयाची पातली. ॥ ११ ॥ मनीं बरवी धरिली बुद्धी । सल्य करूं पावे ते संधी । गुरु म्हणे, 'ऐश्वर्यनिधी! । कारण मातें निवेदीं.' ॥ १२ ॥ राजा वदे प्रसन्न चित्तें । 'पुनरपि द्यूत खेळोनी त्यांतें । वना धाडूनियां निरुतें । अकंटक राज्य अनुभवूं.' ॥ १३ ॥ द्रोणें ऐकोनी त्याची वाणी । महा अकल्याण मानिलें मनीं । 'सुधा पाजितां उबगोनी । इच्छा इच्छी कांजीतें. ॥ १४ ॥ विनाशकाळ पावतां बळें । देखतां निधान झांकिती डोळे । फणी भावोनी कांचनमाळे । त्यागोनी रंजु अपंगी. ॥ १५ ॥ चौदंतें लोभला मागे खर । धनदासनीं उठे शिरें । उतरूनी वांछी पाथर । तेवीं दुर्योधन अभागी.' ॥ १६ ॥ ऐसें भावोनी द्रोणाचार्य । म्हणे, 'मागीतलें काय? । भुवनत्रयींचें सर्व राज्य । मागतां देतों सामर्थ्यें. ॥ १७ ॥ हें तंव अघटित, न घडे मही । सूर्य अस्तू पावे पूर्व केहीं? । गंगावोघ सागरडोहीं । मुरडुनी मूळा आक्रमी? ॥ १८ ॥ हिमालयाअंगीं तापज्वर । अग्निसी बाधी शीत खैर । मोडसी सागरा न मिळे नीर । हें अघटित, नरेंद्रा ! ॥ १९ ॥ ऐसी हे घडे कवणे काळीं? । एकत्र धर्म, किरिटी, वनमाळी, । असतां असाध्य चंद्रमौळी । इतरां पाड कायसा? ॥ २० ॥ फणी मिनतां कोट्यानकोटी । सुपर्णा घालों सकती मिठी । कीं मत्त गजाची

---

१. इंद्र. २. आवड, कामना. ३. प्राप्त होण्यास कठिण असा, अलभ्य. ४. शरीरास कांहीं अपाय न होतां. ५. बाहुबळानें. ६. राया [दुर्योधनाला] वीरक्षयाची सदयता पातली [असें] द्रोण भावी (=मानी, समजला)=दुर्योधनाला रणांत होणाऱ्या वीरनाशासंबंधानें दया उत्पन्न झाली, असें द्रोणास वाटलें. ७. धर्मास धरून आणण्याचें कारण. ८. त्रासून, कंटाळून. ९. द्रव्याचा ठेवा. १०. दोरी. ११. ज्याला ऐरावत मिळाला आहे असा. ऐरावतादि दिग्गजांना चार चार सुळे आहेत, असें समजतात. १२. मागतो. १३. शिर उठणें=कपाळ उठणें, त्रास येणें. १४. पत्थर, धोंडा. १५. केव्हां. १६. दंव. १७. मोडशी (अजीर्णामुळें होणारा विकार) झाली असतां समुद्रास प्यावयास पाणी मिळणार नाहीं, हें अघटित होय. १८. गरुडास.

पाहोनी दृष्टी । केसरी मानी दरारा? ॥ २१ ॥ विपरीत हेंही घडे राया ! । पार्थजिकणीं आशा वायां । शब्द गुंतला तुझिया कार्या । नसतां जिष्णु, सिद्धता. ॥ २२ ॥ वीरमंडळीं विक्रमी घन । वेगळा फोडिजे श्वेतवाहन । धरून देईन कुरुनंदन । निश्चयेंसीं नरेंद्रा !' ॥ २३ ॥ गुरुमुखींची ऐकतां गोष्टी । दुर्योधना आल्हादकोटी । सेना सज्ज कडकडाटी । संग्रामातें लोटले. ॥ २४ ॥ द्रोणाभिषेकसर्वचरित । दूतीं धर्मासीं केलें श्रुत । साशंक अंतरीं बांधवातें । बोलता जाहला; नरेंद्रा ! ॥ २५ ॥ म्हणे, '[१]भारद्वाज सेनापती । जाहला, भासे अवघड चित्तीं । त्यांचिया विक्रमा स्थिति[२] क्षिती । सर्वास्त्रभेदी जाणपां. ॥ २६ ॥ भार्गवविद्येची मांदुस[३] । उघडतां, प्राप्त सर्व त्रास; । कैसा करील रमाधीश? । हें सर्वथा नेणवे'. ॥ २७ ॥ अर्जुन म्हणे, 'गुणसंपन्ना ! । कासया खेद करिसी मना? । शैलें[४] उफाळतां रणकंदना । कुलिश[५] मानी भयातें? ॥ २८ ॥ नवरत्नकळा प्रदीप्त कांती । आहाळोनी[६] सूर्य पडे क्षिती? । वडवानळ दुःसहशक्ती । समुद्र होय कोरडा? ॥ २९ ॥ प्रचंड वातें वाडेंकोडें । उन्मळोनी मेरु धरे पडे । हलाहल विष प्राशितां गाढें । शंका शंकर पाविजे ! ॥ ३० ॥ तैसियापरी महाराया ! । किमर्थ चिंता करिसी वांया; । मत्पुरुषार्थ, विक्रमी बाह्या[७] । जाणोनी नेणें[८] कां होसी? ॥ ३१ ॥ हेंही असो; त्रिभुवनप्रभू । विजयश्रीचा सोलींव स्तंभू । विराटतरूचा कोमळ कोंभू । मायारंभ जेथूनी; ॥ ३२ ॥ आनंदाचें आनंदवन । विक्रमाचें ठेवणें पूर्ण । ऐश्वर्याचें शोभायतन । जनार्दन विश्वात्मा; ॥ ३३ ॥ स्वयंभु, शंभु, आराध्यमूर्ती । निगमागमा नये व्यक्ती । सहस्रमुखें वर्णितां कीर्ती । अंत अ[९]नंता असाध्य; ॥ ३४ ॥ ऋषिमुनि देव मं[१०]घवा । विनीत पदीं भोगिती विभवा । तो रमाधव सारथी देवा[११] ! । रक्षक रथीं माझिया ॥३५॥ असतां, कायसी जया वा[१२]णी ? । किमर्थ चिंता अंतःकरणीं ? । मज वेगळें फोडितां कदनीं । पर्याप्त[१३] भीम[१३] द्रोणातें. ॥ ३६ ॥ सात्यकीप्रताप बृहद्भानू । अभिमन्यू तुरी वीरांचें भा[१४]नू । ज्यांचिया विक्रमा तेजिष्ठ भानू । साम्य नये; नरेंद्रा ! ॥ ३७ ॥ माद्रीसुतादि बळिष्ठ भूप । देखोनी काळ पावे ताप । धृष्टद्युम्न क्षया[१५]ग्निरोप । द्रोणनिधना प्रदीप्त. ॥ ३८ ॥ मी तव निकरें

---

१. द्रोण. २. मर्यादा, प्रतिष्ठा. ३. पेटी. मागें अ० १, ओं० १४४, पहा. ४. पर्वत. ५. इंद्राचा वज्र. ६. पोळून, भाजून. ७. बाहु, भुजदंड. ८. अज्ञान. ९. शेषाला. १०. इंद्र. ११. धर्मराजा ! १२. कमतरता, न्यून. १३. भीम द्रोणाला पुरे पडेसा आहे. १४. भान, बुद्धि किंवा तेज. १५. प्रलयाग्नीचें रोप (=बालस्वरूप).

द्रोणाचार्या । सहसा युद्ध न करीं, राया ! । प्राणांतींही न मारीं तया । पांडु, तूं, तेवीं मज द्रोण. ॥ ३९ ॥ ईश्वर गुरु द्विधा व्यक्ती । नाहीं नाहीं, अवनीपती ! । द्रौणीहून लालनप्रीती । करूनी विद्या अर्पिल्या. ॥ ४० ॥ माझिया विक्रमें तोप त्यातें । आनंदसमुद्र पावे भरतें । नयन झांकी देखोनी मातें । दृष्टी लागेल म्हणोनी. ॥ ४१ ॥ त्यातें करितां आन बुद्धी । केवीं पुढारे पाय संधी ? । जैसा भ्रमर स्नेहवादी । मरोनी पद्मा संरक्षी. ॥ ४२ ॥ ना ते पक्षिणी आत्मज बाळां । रक्षितां वश्य पारध्या काळा । कीं दुग्धीं स्पर्शितां अग्निज्वाळा । जळोनी पाणी त्या रक्षी. ॥ ४३ ॥ तैसिया परी धर्मराया ! । अधर्म न शिवे माझी काया । परी जयश्री तुझिया बाह्या । कृष्णाश्रयें निश्चय.' ॥ ४४ ॥ पार्थमुखघनगर्जना । भूपमयूर नाचती रणा । वाद्य, किंकाट, घोष, गर्जना, । करूनी युद्धा लोटले. ॥ ४५ ॥ पर्वत पर्वतां आदळती । कीं सागर सागरां फुपाटती । ना ते सिंह केसरी झेंपावती । तेवीं युद्धा तेंगटले. ॥ ४६ ॥ पदाति वीर पदातिया । अश्वारूढ अश्वारिया । हस्तिपा हस्तीप ताडिती राया ! । रथी रथिया निघातें. ॥ ४७ ॥ द्रोणें रक्षिली न भंगे चमू । तैसाच फाल्गुन न पवे श्रमू । कर्ण पुरुषार्थ महाभीमू । रणमूर्ध्नीं लोटला. ॥ ४८ ॥ शर वर्षोनी तीक्ष्णधारी । बुजोनी सेना काढिली समरीं । द्रोणाचार्य प्रतापगिरी । सेनाअग्रीं शिरकला. ॥ ४९ ॥ प्रळयघनाची तीव्र वृष्टी । तैशा मोकलिल्या बाणकोटी । दुःसह मानोनी जगजेठी । धृष्टद्युम्न थडकला. ॥ ५० ॥ येरयेरां संघट्टणी । बाणीं भरली पूर्ण अवनी । आहाळोनियां वासरमणी । पडों पाहे तळातें. ॥ ५१ ॥ क्रोधारूढ द्रोणाचार्य । जाणों ग्रीष्मींचा दीप्त सूर्य । ना तो वसंतीं वणवावर्य । जाळी तृणा ज्यापरी. ॥ ५२ ॥ क्रोधें प्रदीप्त अनळ । शरौघमाळा स्फुलिंगमाळ । [वीरगिरींचे कराया शकळ] । वज्रापरी उसळती. ॥ ५३ ॥ भयचकित पांडवसेना । निरुत्साह अर्दितमना । चाप चिकीर्षे पुनःपुनः । काळमेघासारिखें. ॥ ५४ ॥ पदाति, वाजि, वारण, रथी, । खिळोनी बाणीं, पाडिले क्षिती । जाणों शिळापृष्ठीं प्रेतापक्षिति । तेवीं वृष्टी शरांची. ॥ ५५ ॥ अमित वीर तया तळा । क्षया आले नृपशार्दूळा ! । धडमुंडांकित धराबाळा । जाणों शारदी शोभली. ॥ ५६ ॥ युगांतकाळीं भूतक्षय । करी तैसा द्रोणाचार्य । रक्तप्रवाहनदीवर्य । खळखळाट लोटली. ॥ ५७ ॥ अमर्षवेग उसळे जळ ।

---

१. दोन निरनिराळ्या मूर्ती. २. अश्वत्थाम्यापेक्षां ज्यास्त. ३. लढण्याच्या प्रसंगीं, आणीबाणीच्या वेळीं. ४. भिडले. ५. माहुतास. ६. रणांगणाच्या अघाडीस. ७. भाजून, पोळून. ८. त्रस्तचित्ता. ९. प्रचंड किरणांचा वर्षाव. १०. पार्वती, दुर्गादेवी. ११. रागाचा आवेश.

क्रव्यादमेळ उभयकूळ । बळ फुपाट फेण तुंबळ । वीरवृक्ष उन्मळती. ॥ ५८ ॥ कीं ते सरस्वती ताम्रवर्णी । गज, अश्व, रथ, आवर्त गुणी । कवचपद्म राजित किरणीं । शरौघ नक्र तळपती. ॥ ५९ ॥ वीरेंशीसीं केश सुंदर । तेची शेवाळ दाट घोर । मेदमांसकर्दम थोर । वाळू हस्ती जाण पां.॥ ६० ॥ सपिच्छ शर मकराकृती । उसळोनी बळें उल्हाळ घेती । ढाल कच्छप विरुळे कांती । घंटा दर्दुर अपार. ॥ ६१ ॥ श्वापदगणांचे संघाट । क्षत्रसंन्यासीपक्षीं सुभट । पिशाच ब्रह्मराक्षस भट्ट । प्रयोगातें सांगती. ॥ ६२ ॥ ऐसें रौद्ररण कर्कश । भ्याडां भयनशीळ, वीरां तोष, । पाहोनी भूप वीरश्रीघोष । करुनी, पुढां लोटले. ॥ ६३ ॥ एकवटल्या चमू दोन्ही । जाणों संगमीं एकत्र पाणी । कीं खंड वस्त्र जोडितां गुणीं । एकत्र होय ज्यापरी. ॥ ६४ ॥ ऐसियापरी येरयेरां । वीर निकरें पेटले मारा । द्वंद्वयुद्धाचा उंबारा । रथी रथिया थडकले. ॥ ६५ ॥ जैसीं गंजिफांचीं पानें । टाकितां उचलीत विचक्षण । गांवगुंडीचे डाव मांडितां जाण । उचली गारुडी ज्यांपरी. ॥ ६६ ॥ तयापरी महाराजा! । वीर वीरश्री पिटोनी भुजा । रणीं लोटती विजयभाजा । पर्णावया आवडी. ॥ ६७ ॥ उसळोनी शकुनी होतां पुढां । सहदेव वांहोनी मेढां । शर वर्षोनी अग्निदाढा । अश्वसारथी मर्दिले. ॥ ६८ ॥ विंशती धावोनी भीमसेना । वीस बाण अर्पिले वज्रसमाना । न कंपत उभा भीमराणा । मेषथडके हेमाद्री. ॥ ६९ ॥ सक्रोध द्रोण प्रेरितां रथू । पुढां लोटला पांचाळरथू । परस्परें शरीं पंथू । बुजोनी व्योमा साधिलें. ॥ ७० ॥ अद्भुत युद्ध दोघां जणां । जाहलें आश्चर्य देवगणा । भीम भीमपुरुषार्थराणा ।अश्वसारथी मर्दिले. ॥ ७१ ॥ शाल्वें धांवतां कैवारा । नकुळें केलें आडवारा । युद्ध जाहलें दोघां वीरां । देवदैत्यांसारिखें. ॥ ७२ ॥ नकुळ उसळे शरसंधानीं । ध्वजाश्वसूत पाडिला धरणीं । जैसा खगेंद्र विशाळ फणी । त्रिखंडें करी चपेटें. ॥ ७३ ॥ तैसिया [परी] पुरुषार्थ घन। करुनी शंख स्फुरिला त्राणें । काळयापरी फुपाटमान । कृपाचार्य उसळला. ॥ ७४ ॥ धावोनी पुढां धृष्टकेतू । सत्तर बाणीं गौतमसुतू । ताडिला शोभला मयूरकेतू। जेवीं सपिच्छ साजिरा. ॥ ७५॥ न गणोनी कृपें उसण्याघाई । बाण सोडूनी भेदिले हृदयीं । जाणों वारुळांत शिरकले

---

१. राक्षससमूह. २. (नदीच्या) दोन्ही थडी (किनारे). ३. नदी. ४. वीरांच्या मस्तकीं. ५. बेडूक. ६. दोऱ्यानें शिवलें असतां. ७. कडाका, धामधूम. ८. मुठीचे खेळ, एकाद्या गांवांतील मंत्री व फिरस्ता गारुडी यांचे झगडे. ९. वरावया. १०. धनुष्याची दोरी ओढून. ११. वज्रासमान. १२. साहाय्यार्थ. १३. आडकाठी. १४. तीन तुकडे. १५. जोरानें, आवेशानें. १६. अत्यंत तांतडीनें.

अही । तेवीं वक्षीं रिघाले. ॥ ७६ ॥ सेनापती **पा**चाळराज । लोटला **सु**शर्मराजबीज । शर वर्षोनी तेजःपुंज । **पां**चाळसिंहें ताडिला. ॥ ७७ ॥ येरू प्रज्वळोनी क्रोधराशी । तोमर ताडिला जानुदेशीं । जैसी डळमळी पादपासी । नागधडक[2] बैसतां. ॥ ७८ ॥ **वै**कर्तन विक्रमी **क**र्ण । महाप्रतापी जैसा अग्न । पुढारतां **म**त्स्य **पां**चाळ जाण । तगटते[3] जाहले निघाता. ॥ ७९ ॥ अद्भुत युद्ध तये काळीं । तीव्र माजली रणधुमाळी । **क**र्ण प्रतापाचा [4]हेळी । आच्छादिलें तयातें. ॥ ८० ॥ **शि**खंडीवीर शिखंडीत्राणें । उसळतां **भ**गदत्त रोषें पूर्ण । आडवोनी विंधिले बाण । **का**ळदंडासारिखे. ॥ ८१ ॥ येरें हांसोनी शरवृष्टी । स्यंदन भंगिला उठाउठी । **भ**गदत्तराज जगजेठी । भंगिता जाहला तयातें. ॥ ८२ ॥ **घ**टोत्कच राक्षसेंद्र । त्यातें **अ**लंबु थडके रुद्र । उभयतां वीर बळसमुद्र । मायामयी पुरुषार्थी. ॥ ८३ ॥ **ग**जेंद्र**न**क्राची [6]धुमाळी । पूर्वी जाली जैसी जळीं । आश्चर्य वीर उभयतां दळीं । चोज मानिती मानसें. ॥ ८४ ॥ **ल**क्ष्मण [7]क्षत्रदेव । युद्धा मिनले लघुलाघव । जैसे **हि**रण्यकश्यप **र**माधव । पूर्वी युद्धा मिनले. ॥ ८५ ॥ राजनंदन **पौ**रव नामा । पुढारतां अग्निप्रतिमा । **सौ**भद्रवीर प्रतापगरिमा । लोटुनी शरा वर्षला. ॥ ८६ ॥ येरें वाहोनी चाप प्रौढी । बाण सोडिले अग्निधाडी । **सौ**भद्रसंधानें देशधडी । करुनी क्षणें टाकिलें. ॥ ८७ ॥ **अ**भिमन्युवीर क्रोधानळीं । तीक्ष्ण वर्षोनी बाणजाळीं । ध्वजच्छत्रचाप पाडिलें तळीं । वृक्षशाखेसारिखें. ॥ ८८ ॥ क्रोधें प्रदीप्त अग्निशिखा । तैशा **पौ**रव सांडी उल्का । सप्त नाराच रुक्मरेखा । सूताश्वबळें ताडिले. ॥ ८९ ॥ पावक क्षोभे शिंपितां घृत । कीं सिंह सुसाटे लागतां क्षत । ना तो फणिवर लागतां हस्त । ग्राहकही प्राणाचा; ॥ ९० ॥ तैसा **सौ**भद्र क्रोधवर्धन । बाण सज्जला धनुष्य घन । धारामुखीं डळमळी अग्न । स्फुलिंगकण विखुरले. ॥ ९१ ॥ जाणों **शं**मनें[9] प्रेरिला दूतू । तैसा उठिला सुसाट वातू । वीर दचकले संग्रामधूर्तू । निवारूं भूप विसरला. ॥ ९२ ॥ **कृ**तवर्मा कुशळहस्ती । बाणद्वय सोडूनी निगुती । भंगोनी शरकोदंड क्षिति । खंडूनी धरे पाडिला. ॥ ९३ ॥ चापच्युत **अ**भिमन्युवीर । क्रोधें पेटला वैश्वानर । वोढूनी खड्ग पुसोनी धार । टाकोनी उडी धांवला. ॥ ९४ ॥ जैसा केसरी वारणावरी । चपेट करी क्रोधलहरी । तैसा **सौ**भद्र उडूनी शिरीं । रथाधुरीं बैसला.

---

१. झाडास. २. हत्तीची थडक. ३. भिडते. ४ सूर्य. ५. मोराप्रमाणें डौलानें व त्वेषानें. ६. धुडगूस, दांडगाई. ७. क्षत्रदेव हा शिखंडीचा मुलगा. त्यास दुर्योधनपुत्र लक्ष्मण यानें मारिलें. ८. बाण. ९. यमानें.

॥ ९५ ॥ नखाग्रघात खड्गधारा । ताडुनी सारथी केला पुरा । पुढां शिरकोनी राजेश्वरा ! । भूप केशीं कवळिला. ॥९६॥ अंतकदूत मृत्युकाळीं । शिखा कवळोनी आसुडी बळी । कीं कंसचूडा वनमाळी । धरुनी पाडी तळातें. । ॥ ९७ ॥ तयापरी वीरगुंठी । धरूनी आफळी भूतळवटीं । प्राणपंचकीं उठाउठी । पितृगृह वरियेलें. ॥ ९८ ॥ 'अहा' कार कौरवमेळीं । दु:सह मानिलें वीरीं सकळीं । सैंधवराज उसळोनी दळीं । बाणजाळीं वर्षला. ॥ ९९ ॥ अभिमन्युवीर तेजिष्ठ हिरा । शर खंडुनी खड्गधारा । अश्वसारथी धांवोनी त्वरा । कृतांतघरा धाडिलें. ॥ १०० ॥ जयद्रथें टाकोनी उडी । चर्म खड्ग कर्षिलें प्रौढी । धांवतां रोषें बहु तांतडी । सौभद्र त्यातें थडकला. ॥ १०१ ॥ येरयेरां ताडिती घाव । गती विगती लघुलाघव । थरकमरक विद्याविभव । चोजकर सुरांतें. ॥ १०२ ॥ अर्जुनासमान आर्जुनी । टाळोनी घाव घातला मूर्ध्नी । चांचरी जातां सांभाळुनी । सौभद्रातें ताडिलें. ॥ १०३ ॥ शरभ शरभांची कंव । कीं गंडभैरवा गंडभैरव । ना ते मृगेंद्रा मृगेंद्रा हैव । चपेट तेवी दोघांतें. ॥ १०४ ॥ रणरंगधीर पार्थसुत । खड्गचर्म केला भस्मीभूत । क्रोधें प्रदीप्त जयद्रथ । शक्ती रोषें टाकिली. ॥ १०५ ॥ जाणों कृतांताची भगिनी । कीं ते खगेंद्रअरीची जननी । तेजें दिशा डवरिल्या गुणीं । लक्षिली चक्षीं सौभद्रें. ॥ १०६ ॥ ताडुनी शस्त्र दोहींकडे । करुनी टाकिले भूमी गाढे । जाणों खगेंद्रपाणी फडे । खंडतां मही उतरले. ॥ १०७ ॥ 'भला भला' इहीं शब्दीं । स्तवोनी लोटली वीरमांदी । विराट, द्रौपद गजस्कंदीं, । भीमसेन, सात्यकी; ॥ १०८ ॥ धृष्टकेतु, शिखंडी, युधिष्ठिर, । कैकय, पार्षद, माद्रीकुमर, । द्रौपद्रीनंदन, भैमी, वीर । सहस्रशा लोटले. ॥ १०९ ॥ कौरववीरांची महादाटी । भीमसेना आवेशकोटी । गदा वाहोनी मुष्टी । वीरांमाजी शिरकला. ॥ ११० ॥ प्रतिबिंब न साहे केसरी ॥ कीं स्वजाती गजा गज वैरी । ना ते द्विजें द्विजांची थोरी । साहों न सकती ज्यापरी; ॥ १११ ॥ तैसा भीमाचा उत्कर्ष । न साहोनी करून रोष । गदा पडताळोनी नरेश । शल्यराजा धावला. ॥ ११२ ॥ गिरिवज्राची थडक । तैसे आदळले एकमेक । घाव घालिती त्राणें अचूक । यमसदना न्यावया. ॥ ११३ ॥ गदा मंडळें उडे

---

१. वीराची शेंडी. (गुंठी=बुचडा.) २. ढाल. ३. अभिमन्यु. ४. घेरी, चक्कर. ५. पकड, डावपेंच. ६. सिंहासिंहाची लढाई. ७. अस्त्रविशेष. ८. सर्पांची आई. ९. झांकल्या. १०. वीरसमूह. ११. इ. स. १७८० च्या सुमारास आपल्या समाजांत व राज्यांत किती फाटाफूट झाली होती हें ह्या दृष्टांतावरून सुस्पष्ट होतें.

पिच्छबाणी[1] । थरकसरक फेरे गगनीं । घायें घाव टाळोनी झणी । येरयेरां ताडिती. ॥ ११४ ॥ सर्वांग जाहलें रुधिरमय । न कंपत ताडिती, वांछिती जय । जयातें जैसी पडती सोय । निकरें गदा हाणिती. ॥ ११५ ॥ तव येउनी पडती मही । पुन्हा झगटती शौर्यें पाहीं । फूत्कारिती जैसे अही[2] । टाकिती उल्का विषाच्या. ॥ ११६ ॥ तरुण वृषभांची झुंझारी । एकमेकां सारिती खुरीं । सर्वांग क्षतें पूर्ण रुधिरीं । परी न सरती ज्यापरी. ॥ ११७ ॥ **भीम**-**सेन** प्रतापराशी । गदा वोपिली भूपशीर्सीं । चांचरी येउनी, धरेसी । स्पर्शता जाहला महींद्र. ॥ ११८ ॥ रोषें **द्रोण** वाहोनी[3] मेढा । रणांगणीं लोटला पुढा । बाणीं शिरांचा जाला सडा । रांगोळ्या शवें अपार. ॥ ११९ ॥ उठा-वले **पां**डवभार । क्रोधार्णवा भरतें सैरे[4] । शरलाटा उसळती क्रूर । भंगावया **द्रो**णातें. ॥ १२० ॥ **इं**द्रसमरीं **ब**ळीपाठीं । निबिड दानवांची जैशी मिठी । कीं **रा**घवयुद्धीं **रा**वणनिकटीं । राक्षसथाटी[5] अपार. ॥ १२१ ॥ तैसियापरी **द्रो**णामागें । मिनलीं वीरांचीं महादांगें[6] । जैसें अधर्मास अघें[7] । पाठीलाग **न** सोडी. ॥ १२२ ॥ असो; **द्रोण** क्रोधानळीं । थडकोनी वर्षे बाणजाळीं । वीर वीर आणिले तळीं । रोष **धर्मा** नावरे. ॥ १२३ ॥ रथ लोटूनी सेनेसहित । अर्पिले बाण **गुरू**तें शत । येरू न कंपत हर्षयुक्त । खंडी धनुष्य हातींचें. ॥ १२४ ॥ चक्ररक्षक राजनंदनीं । **द्रो**णाचार्य पूजिला बाणीं । **गुरु**वर्य प्रतापाचा तरणी । विगत केलें तयांतें. ॥ १२५ ॥ सेना भ्रष्ट विगतदशा । पाहोनी वीर लोटले तोषा । बाणजाळीं भरल्या दिशा । मार्ग मार्गणा[8] दिसेना. ॥ १२६ ॥ एकेची वेळीं सर्वही वीर । **द्रो**णाचार्या करिती प्रहार । सूर्यगणित[9] **शि**खंडीवीर । अर्पी बाण **द्रो**णातें. ॥ १२७ ॥ **द**शग्रीवनेत्रांच्या[10] गणना । **उ**त्तमौजा ताडी प्रभिन्न बाणां । इंद्रियद्विगुण**शि**ववदना[11] । **न**कुळें शरा विं-धिलें. ॥ १२८ ॥ ऋषिसंख्या[12] **स**हदेव वीर । अर्पिता जाहला बाण घोर । **स्वा**मिभुजांचे[13] द्विगुण शर । **ध**र्मराजें विंधिले. ॥ १२९ ॥ **द्रौ**पदीनंदन सिंह तरुण । गुणसंख्या[14] अर्पिले बाण । **सा**त्यकी वीर हुताशन । नक्षत्रगणना[15] समर्पी. ॥ १३० ॥ **म**त्स्यराज शंकरभुजा[16]–। गणित वोपी बाण वोजा । जैसा अशनी न गणी विजा–। वृष्टी करितां सामर्थ्य. ॥ १३१ ॥

---

१. ससाण्यासारखी. २. सर्प. ३. धनुष्याची दोरी ताणून. ४. स्वैर, यथेच्छ. ५. गर्दी. ६. मोठीं अरण्यें. दांग=वन, अरण्य. ७. पापें. ८. बाणास. ९. बारा. १०. वीस. ११. १०×२×५= शंभर. १२. सात. १३. कार्तिकस्वामीच्या हातांच्या दुप्पट, चोवीस. १४. सहा. १५. सत्तावीस. १६. दहा किंवा अठरा.

तयापरी शरसंधान । वारुनी द्रोण विंधिला बाण । चतुरंग सेना खिळोनी घन । धरा शवें भरियेली. ॥ १३२ ॥ गुरुवर्य पेटला महामारीं । कोण्ही समोर नये समरीं । युगांतकाळ भाविला वीरीं । धर्म क्रोधें धडकला. ॥ १३३ ॥ सिंह चपेट करी वारणा । तैसें उसळोनी ताडिला बाणा । द्रोण प्रतापी वीरराणा । कुशळास्त्रप्रेरणीं. ॥ १३४ ॥ लघुलाघव नेतपर्वणी । तीक्ष्ण शर सोडुनी क्षणी । रथांग भेदूनियां गुणी । नीडभरणीं पाडिले. ॥ १३५ ॥ धरा आततां युधिष्ठिरें । वीर लोटले महा निकरें । मार्ग रोधिला शरांच्या पूरें । धंजों कृतांत सरेना. ॥ १३६ ॥ विराट, द्रुपद, कैकय, कृत, । सात्यकी, शिबी, व्याघ्रदत्त, । सिंहसेन आणि पांचाळसुत । वीर अनेक विंधिती. ॥ १३७ ॥ सहस्रावधी शरसंधान । द्रोणाचार्या ताडिती बाण । येरें वारोनी सिंहसेन । सकुंडल शिर उडविलें. ॥ १३८ ॥ व्याघ्रदत्त व्याघ्रसरी । ताडुनी पाडिला धरेवरी । वीर सर्व त्रासिले समरीं । जे अजिंक्य काळातें. ॥ १३९ ॥ किलकिलाट तये समयीं । घोर माजला शब्द महीं । कौरव नाचती पिटोनी बाही । कार्य साधलें म्हणोनी. ॥ १४० ॥ वदती, 'द्रोणें सत्यपणू । केला, गवसिला कुरुनंदनू । विजयी जाहला प्रतापभानू । द्रोणाचार्य गुरुवर्य'. ॥ १४१ ॥ पांडवदळीं 'हा! हा!'कारू । 'मुंगीनें ग्रासिला' म्हणती 'मेरू । कीं कुकुटें शोषिला सागरू । अग्नि पतंगें प्राशिला; ॥ १४२ ॥ ना तो हिमालयासी उकाडा । सूर्य जाहला हिमा वैरपडा । वृकें धांवतां पसरूनी दाढा । काळ भयें पळाला.' ॥ १४३ ॥ ऐशा तर्कांच्या उतरडी । उतरती चढविती नानाप्रौढी । द्रोणशरांची मिठी गाढी । जीवोदार सर्वही. ॥ १४४ ॥ तव आनकदुंदुभिजामात । सखा क्षीराब्धिसुताकांत । धनुर्धरांमाजी रणपंडित । जाणों भार्गव दुसरा. ॥१४५॥ काळखंज आंतुर्बळी । वधोनी, तोषला चंद्रमौळी । विजया बाह्या सर्वकाळीं । आरोग्य अग्नि ज्यासंगें; ॥ १४६ ॥ तो गांडीवधन्वा विजयरथू । देखतां,

---

१. हत्तीस. २. बांकदार. ३. चाक. ४. रथाच्या गाभाऱ्यांत. ५. स्पर्शतां. ६. (त्या बाणांच्या जुंबाडांत) घुसण्याला प्रत्यक्ष काळही पुढें पाऊल घेईना. ७. बर्फांत गुरफटलेला, बर्फांत सांपडलेला. ८. वसुदेवाचा जामात (अर्जुन). ९. लक्ष्मीकांत (कृष्ण). १०. बलाढ्य. ११. श्वेतकी नामक एका प्रख्यात राजानें असंख्य यज्ञ केले. ह्या यज्ञांत अनेक वर्षें घृतधारा सेवन केल्यामुळें अग्नीस जाड्य आलें व तो अगदीं निस्तेज झाला. व्याधिनिर्मुक्त होण्यास काय उपाय करावा, हें विचारण्यासाठीं अग्नि ब्रह्मदेवाकडे गेला, तेव्हां ब्रह्मदेवानें 'खांडव वन भक्षण करून अग्नीनें आपलें जाड्य निरस्त करावें' असा उपाय सांगितला. पण तें वन इंद्ररक्षित अस-

जाहला अकस्मातू । वीरां उत्सवो, भयांचा वातू । निमोनी, हर्षे नाचती. ॥ १४७ ॥ जैसे शरपंजरीं कपी पडले । ते द्रोणाद्रिकीळें[1] जिवंत जाहले । अब्धि मथितां विषें आहाळले[2] । देखोनी सुधा टवटवी; ॥ १४८ ॥ कीं तो दिनमणी पूर्वे कळा । पसरतां, हर्षे पद्मिणी उज्ज्वळा । ना तें इंदुमंडळ देखतां डोळां । चातक[3] तोषे ज्यापरी. ॥ १४९ ॥ तैसा उल्हास तये काळीं । होतां पावला किरीटै[4]माळी । वीर मर्दिले बाणजाळीं । शवांच्या पौळी[5] अपार. ॥ १५० ॥ रक्तनदीची खळखळाट । उसळोनी समुद्रा पुसे वाट । रौद्र रणाची सांगतां गोष्ट । अंगा शाहारें येतसे. ॥ १५१ ॥ प्रभिन्नद्विप खंडमुंड । पडिले बीभत्स, ताडिती सोंड । हेम तुकितां मोल गाढ । अमित वारू विखुरले. ॥ १५२ ॥ कुंडलें मंडित शिरसिसाळें[6] । जाणों शोभती रातोत्पळें । वीरबाहुभूषणें कीळें । हिणाविती ग्रहांतें. ॥ १५३ ॥ करुनी चमूचा गौरव । धडकला जेथें द्रोणराव । हस्तक्रिया लघुलाघव । बाणीं व्योमा आच्छादिलें. ॥ १५४ ॥ दश दिशा व्यापिल्या शरीं । निबिड अंधार पडला समरीं । वीरसंज्ञा हरपली पुरी । कोण्ही कोण्हा धरीना. ॥ १५५ ॥ विगतपुरुषार्थ वीरमांदी । निघोनी गेली जैयाची[7] बुद्धी । भूप निघाले मागिले पदीं । सांभाळोनी आपणा. ॥ १५६ ॥ पांडवचमू आल्हाद थोर । दुंदुभी पिटोनी गाजती तुरें । रथ स्वीकारोनी युधिष्ठिरें । चाप पाणी कर्षिलें. ॥ १५७ ॥ केतु[8]वदनीं रवी पडिला । तो दानप्रवाहें मुक्त जाहला । कीं शक्तीनें लक्ष्मण ग्रासिला । उगळिला[9] वेल्ली[10] मारुती. ॥ १५८ ॥ तयापरी अरिष्टशांती । विजयी जाहला सुभद्रापती । तंव अस्ता पावला गभस्ती । माघारला गुरुवर्य. ॥ १५९ ॥ धर्मराज हर्षवर्धन । आवरूनि युद्ध, आक्रमी सदन । शिबिरा पावोनी उभय

---

त्यामुळें अग्नीस दुष्प्राप्य होतें–यामुळें अग्नि अर्जुनास शरण गेला व अर्जुनाच्या साहाय्यानें, इंद्र युद्धास आला असतां, त्याचा प्रतीकार करून, तें वन पंधरा दिवस यथेच्छ भक्षण करून व्याधिनिर्मुक्त झाला–अशी कथा आहे. (मुक्तेश्वर–आदिपर्व–अ० ४९ पहा.)

१. द्रोणगिरीच्या तेजानें. २. पोळले. ३. येथें 'चकोर' असा पाठ असावयास पाहिजे. कारण चकोर व चंद्र यांचें कविसमयांत सख्य आहे, परंतु चातक व चंद्र यांचें नाहीं. तथापि हीच चूक मोरोपंतांनींही निदान दोन ठिकाणीं तरी केली आहे. (१) नंद महाभाग जसा चातक चन्द्रा तसा जया सेवी । (हरिवंश १३।१). (२) टकमक पहात होते प्रभुमुखचंद्राकडेचि चातकसे. । (विराटपर्व ७।९८). ४. किरीटी, अर्जुन. ५. थर, ढीग, राशी. ६. शिर=सिसाळें=मस्तक. ७. जय मिळविण्याची उमेद. ८. केतू नामक ग्रहाच्या तोंडांत. ९. बाहेर काढिला. १०. संजीवनी नांवाच्या वेलीच्या योगानें.

सैन्य । विश्रामलें विश्रामीं. ॥ १६० ॥ प्रथम दिवसाचा वृत्तांत । जाला कथिला संकलित । पुढील कथेचा चरितार्थ । सज्जनीं पान करावें. ॥ १६१ ॥ श्रीगुरुभीमराजजलधर । कृपास्वात्युदक वाक्कर्दळीभार । कर्पूरनरहरीमोरेश्वर । कथासुगंध अर्पितू. ॥ १६२ ॥

---

## अध्याय चवथा.

**व्या**सकृपेचें **नं**दनवन । वक्तयांमाजी शिरोरत्न । चातुर्यसिंधु गुणनिधान । सृष्टी दृष्टी देखणा; ॥ १ ॥ तो **सं**जय म्हणे, 'पवित्र भूपा! । त्रिशतकरवंशा (?) कुळदीपा! । पुढील प्रसंग ऐक बापा! । शतपुत्रांच्या निवाडें. ॥ २ ॥ वाहनें लावोनी विश्रामा । **द्रोण** पातला राजधामा । सन्मानुनी द्विजसत्तमा[२] । उत्तमासनीं पूजिलें. ॥ ३ ॥ भूपवृंद सभासदनीं । सहित आप्तबंधुश्रेणी[३] । **द्रोणा**चार्य गौल्यता[४] वाणी । बोलता जाहला **कु**रूतें. ॥ ४ ॥ म्हणे, '**दु**र्योधना! ऐश्वर्यनिधी! । आजी **धर्म** धरिला होता युद्धीं । परी **फा**ल्गुन पातला तये संधी । **का**ळचक्रासारिखा. ॥ ५ ॥ जैसी खगेंद्राची पडतां उडी । फणींद्रसेना देशधडी । ना ते अनंगाची पडतां धाडी । तपाच्या कोडी ढांसळती. ॥ ६ ॥ कीं तों **भा**र्गवाचें येतां ठाणें । भूप लंघिती दिशांचीं रानें । ना तो सबळ क्रोध वर्ततां त्राणें[५] । बुडे विवेकसमुद्रीं. ॥ ७ ॥ तयापरी वीर **अ**र्जुन । भंगी सैन्य न लगतां क्षण । महाप्रतापी विक्रमी घन[६] । युद्धीं सुरेशा असाध्य. ॥ ८ ॥ म्यां तव तूतें केला नेमू । नसतां **पा**र्थ धरीन **ध**र्मू । तो तंव पावला होता क्रमू । परी **फा**ल्गुनें भंगिला. ॥ ९ ॥ आतां तरी राजया! समरीं । फोडुनी **पा**र्थ नेइजे दुरी । वीरविक्रमें तुझ्या भारी । निर्वीरधरा मज वाटे.' ॥१०॥ **द्रो**णमुखींची ऐकोनी वाणी । भूप खळबळे अंतःकरणीं । शौर्यसमुद्रा भरतें दुंणी[७] । क्रोधलाटा उसळले. ॥११॥ जैसा सिंह उफाळोनी बाहे । फोडुनी रव उभा राहे । तैसा **त्रि**गर्ता क्रोध न साहे । [गंभीरवाणी अनुवादे.] ॥ १२ ॥ जुंझार जाहला जरी एडका[८] । गजा परी सारील थडका ? । हेमंतीं शीताचा कडाका । बाधा बाधिजे रवीतें ? ॥ १३ ॥ वृश्चिकनांगी तीक्ष्ण विष । कुलिशधारा पावे नाश ? । कीं दर्दुराचा [श्रवुनी घोष] । दामिनी पळे माघारी ? ॥ १४ ॥ तयापरी न पवोनी भया । युद्धा करीन विजयी बाह्या । मत्पुरुषार्थ

---

१. येथें मूळांतील सोळावा अध्याय संपतो. २. द्विजश्रेष्ठास (द्रोणाचार्यास). ३. श्रेणी=जमाव, तांडा. ४. माधुर्ययुक्त वाणीनें. ५. जोरानें, आवेशानें. ६. अगाध, अलोट. ७. दुप्पट. ८. मारका, धाका टक्कर देणारा.